# भारतीय साम्राज्य.

## उत्तरार्ध.

## पुस्तक दहावें.

# संस्कृत भाषेचा इतिहास.

१ आर्यदेश व तत्संबंधी वृत्तान्त. २ आर्य लोक व त्यांचे बुद्धिवैभव. ३ आर्येतिहास व भूगोल. ४ आर्यशास्त्र व कला. ५ आर्यशासन पद्धति व संस्था. ६ आर्यगृहस्थिति, नीति, शौर्य, व उन्नति. ७ भरतखंडांतील मुख्यधर्म. ८ भरतखंडांतील जातिवैचित्र्य. ९ भरतखंडांतील नानाविध भाषा.

[भाषाशास्त्र व मनोरंजन.]

या ग्रंथांचे कर्ते


**नारायण भवानराव पावगी.**



शके १८२२.

**किंमत २॥ रुपये.**

॥ श्री ॥

सद्गुरुचरणारविंदीं

नमन करून

ही

ग्रंथरूपी

यथाशक्ति व यथामति केलेली

अत्यल्प

# देशसेवा

## नारायण भवानराव पावगी

यानें

आपल्या दयितआर्यभूमीच्या ठिकाणीं

असलेल्या अत्युत्कट

**प्रीत्यर्थ**

सकल

**आर्यभगिनींस व आर्यबांधवांस**

प्रीतिपूर्वक

अत्यादरानें समर्पिली असे.

# प्रस्तावना.

संस्कृतं नाम दैवी वागन्वाख्याता महर्षिभिः ।

( काव्यादर्शः दंडी. )

भाषासु मुख्या मधुरा दिव्या गीर्वाण भारती ।

( सुभाषितम्. )

भारतीय साम्राज्य मालिकेंत, पुस्तक पहिलें आर्यदेश व तत्संबंधीं वृत्तान्त; पु० २ रें आर्यलोक व त्यांचें बुद्धि-वैभव; पु० ३ रें आर्येतिहास व भूगोल; पु० ४ थें आर्य-शास्त्र व कला; पु० ५ वें आर्यशासनपद्धति व संस्था; पु० ६ वें आर्यगृहस्थिति, नीति, शौर्य, व उन्नति; पु० ७ वें भरतखंडांतील मुख्य धर्म; पु० ८ वें भरतखंडांतील जातिवैचित्र्य; पु० ९ वें भरतखंडांतील नानाविध भाषा; यांसंबंधीं अवश्य तो विचार झाला. सबब, प्रस्तुतच्या १० व्या पुस्तकांत, संस्कृत भाषेचा इतिहास देण्याचा आमचा विचार आहे.

जी संस्कृत भाषा दैवी असल्याविषयीं, मोठमोठे कवी देखील अगदीं निश्चयपूर्वक लिहितात; जिचा महोदधि अपरंपार भरलेला असल्याकारणानें, त्याचा लेशमात्रही कोठें ठावच लागत नाहीं; आणि जिच्या वाङ्मय सागरांतून तरून जाण्याचे कोणाचेंही सामर्थ्य नाहीं; त्याच भाषेचा सवि-स्तर इतिहास मजसारख्या मूकानें, पंगूनें, व मंदमतीनें लिहि-ण्याचें मनांत आणिल्यानें, एक प्रकारचा विशेष प्रमाद व निःसीम धृष्टता केल्यासारखेंच निःसंशय होत आहे.

परंतु, अशा प्रकारचा समग्र, किंबहुना थोडाबहुत तरी इतिहास, आमच्या **प्रिय महाराष्ट्र** भाषेंत अवश्य झाला पाहिजे, अशी **श्री सद्गुरूचीच** संपूर्ण इच्छा असल्यामुळें, **तोच** मजला निमित्तमात्र करून, हें अति महत्वाचें कार्य या नम्र **सेवकाकडून** करवीत आहे. सबब, त्याबद्दलचे सर्व **श्रेय** त्या **जगन्नियन्त्या मंगलमूर्तीकडेसच** आहे, यांत तिळमात्रही संदेह नाहीं.

**मूकं करोति वाचालं पंगुं लंघयते गिरिम् ।**
**यत्कृपा तमहं वंदे परमानन्दसद्गुरुम् ॥**

असो. ह्या कार्यानिमित्त मजला जे जे **मूलग्रंथ** उपलब्ध झाले, त्या सर्वांचा मी यथामति आणि यथावकाश उपयोग केला असून, या कामांत **पौरस्त्य** व **पाश्चात्य** पंडितांनीं जे जे ग्रंथ लिहिले आहेत, त्यांचाही माझ्या हातास लागल्याप्रमाणें मी यथेष्ट लाभ घेतला आहे. सबब, ह्या सर्वांचे आणि अन्य **वैदिक, शास्त्री,** व **पंडित,** इत्यादींचे मी अगदीं कृतज्ञतापूर्वक बहुत उपकार मानतों.

**संस्कृत** भाषेचें उत्पत्तिस्थान **भरतखंडच** असल्याबद्दल, किंबहुना अखिल **आर्यांची** व **मानवी** प्राण्याची **जन्मभूमि आर्यावर्त्तच** असल्याविषयीं, आम्ही आपल्या " **भाषाशास्त्रांत,** " आणि **भारतीय साम्राज्याच्या** नवव्या पुस्तकांत, आमच्या अल्प समजुतीप्रमाणें, अवश्य तो विचार केला आहे. शिवाय, " **भारतांचें भरतखंड अथवा आर्याक्रमणाचा मिथ्याप्रवाद** " यांत, म्हणजे **भारतीय साम्राज्याच्या** सोळाव्या **पुस्तकांत,** एतद्विषयक साद्यन्त विचार

करण्याचेंही आम्हीं योजिलें आहे. सबब, प्रस्तुत पुस्तकांत, ह्या संबंधाचा ज्या ज्या ठिकाणीं प्रश्न उद्भवला, त्या त्या ठिकाणीं, फक्त पूर्वदिग्‌दर्शन करूनच, आम्हीं निर्वाह केला आहे. (पुढील पान ६१-६२-२९७ पहा.)

आतां, प्रस्तुतविषय निःसंशय अतिगहन व बहुत रसाळ आहे, हें कोणालाही कबूल केलें पाहिजे. परंतु, त्या मानानें विचार केला म्हणजे, ग्रंथकर्त्याची विद्याविहीनता आणि अपात्रता तत्काळ दिसून येते. तेव्हां, अशा स्थितींत, सांप्रत ग्रंथांत असंख्य दोष, अनेक प्रमाद, व अतर्क्य मतिभ्रम, हे पदोपदीं दृग्गोचर होतील, यांत लेशमात्रही शंका नाहीं. सबब, मदज्ञानजन्यमूढतेसंबंधीं, वाचकांनीं आपलें अंतःकरण उदार करून, या सेवकाचे सर्व अपराध पोटांत घालण्याविषयीं, माझी सविनय प्रार्थना आहे. कारण,

**देवादिदेव सद्‌गुरुनाथ । त्याच्याचि कृपेनें वाढला ग्रंथ ।**
**मी तो मंदमती निश्चित । तुह्मी वृत्तान्त जाणतसा ॥**
**जैसी तैसी आरुषवाणी । सादर होवोनि ऐका श्रवणी ।**
**जेवी बालक बोले बोबड्या वचनीं । ऐकोनि जननी संतोषे ॥**

शेवटीं, ज्या श्री सद्‌गुरूच्या सतत प्रेरणेनें व नितान्त कृपाकटाक्षानें हा ग्रंथ पुरा झाला, त्याचे अहर्निशीं परम उपकार मानून, आणि त्याच्या चरणारविन्दीं शिरसाष्टांग प्रणिपात करून, ही प्रस्तावना पुरी करतों.

मुक्काम पुणें. मंगळवार. आश्विन शुद्ध १०. शके १८२३. विजयादशमी. प्लवनाम संवत्सरे.

**नारायण भवानराव पावगी.**

---

# अनुक्रमणिका.

——✻:०:✻——

# भारतीय साम्राज्य.

## उत्तरार्ध.

# पुस्तक दहावें.

# संस्कृत भाषेचा इतिहास.

## भाग ५७ वा.

### संस्कृत भाषेचें श्रेष्ठत्व आणि पौराणत्व.

आमच्या एकंदर भाषांच्या विषयीं आमचें प्रस्तुतचें शोचनीय औदासिन्य.

आमच्या एकंदर भाषांच्या संबंधानें, आम्हीं सांप्रतकाळीं जें औदासिन्य दाखवीत आहोंत, आणि तद्विषयक हल्लीं आम्हीं ज्या शिथिलतेचें यथेष्ट अवलंबन केलें आहे, त्यांचा केवळ क्षणभरच विचार केला, म्हणजे आम्हांला आमच्या पूर्वजांचा दीर्घोद्योग अगदीं मूर्तिमंत दृष्टिगोचर होतो; व त्यांच्या त्या अतीव दीर्घ परिश्रमाचें विलक्षण कौतुक आणि महदाश्चर्य वाटतें. इतकेंच नव्हे तर, ह्यासंबंधानें त्यांचे ते भगीरथ प्रयत्न पाहून, त्यांच्यांत व आमच्यांत केवळ जमीन अस्मानाचें अंतर आहे. असें

आम्हांला तत्क्षणींच भासमान होतें; व ही गोष्ट आम्हांला निष्प्रांजल रीतीनें लागलीच कबूलही करावी लागते.

ह्या भाषांबद्दल, मग ती संस्कृत असो अगर प्राकृत असो, त्या प्रत्येकीविषयीं, आमच्या पूर्वजांनीं जे अश्रांत परिश्रम केले आहेत, त्याची खरोखरच हल्लींच्या काळीं, आम्हांला कल्पना देखील होण्यासारखी नाहीं. सबब, त्याबद्दलची थोडीबहुत हकीकत येथें देण्याचा प्रयत्न केल्यास, तो अकालिक होणार नाहीं असें समजून, तद्विषयक दोन शब्द लिहिण्याचें मी साहस करतों.

तद्विषयक आमच्या पूर्वजांचे प्रयत्न.

आतां, संस्कृत भाषेचा समग्र इतिहास लिहावयाचें मनांत आणिलें तर, हल्लीं भारतीय साम्राज्याची जी पुस्तकमाला या सेवकानें सुरू केली आहे, तशी दुसरी एक मालाच बनून, तींत ह्या पुस्तकासारखीं अनेक पुष्पें ओंविलीं, तरी देखील ती माला पुरी व्हावयाची नाहीं. आणि कालाच्या मानानें पाहूं गेलें तर, मजसारख्या अल्पधीनें लिहिलेला अशा प्रकारचा इतिहासही शेवटास जाण्याचा वानवाच. कारण, परवशतेनें हा सेवक बहुतेक अन्य कार्यालाच वाहिल्यासारखा झालेला आहे! इतकेंच नव्हें तर, सेवकधर्माची इतिकर्तव्यता बजाविण्यांतच बहुतेक काल, आणि तोही अमूल्य असा जात असल्यामुळें, एका क्षणाची सुद्धां मालकीच्या हक्कानें फुरसूद मिळण्यास मजला मोठी

मजसारख्याकडून, संस्कृत भाषेचा समग्र इतिहास लिहिला जाण्याची अशक्यता, व त्याची कारणें.

मारामार पडते. तेव्हां, अशा अडचणींत, जी गोष्ट प्रस्तु-तच्या स्थितीवरून मजला वरीच दुःसाध्यशी वाटत आहे, तिचा अंगीकार करण्यांत कांहीं एक मतलब नाहीं असें मनांत येऊन, संस्कृत भाषेच्या इतिहासासंबंधी साद्यन्त ऊहा-पोह करण्याच्या भानगडींत न पडतां, फक्त तद्विषयक संक्षिप्त विवेचन किंवा दिग्दर्शन मात्र करण्याचें मीं येथें योजिलें आहे.

आतां, प्रस्तुत पुस्तकांतील भिन्नभिन्न विषयांचें यथार्थ निरूपण व्हावें यासाठीं, त्याचे एकंदर तेरा भाग खालीं लिहि-ल्याप्रमाणें पाडले आहेतः—

प्रस्तुत पुस्तकाचे तेरा भाग, आणि त्यांतील विषयनिरूपण.

१ संस्कृत भाषेचें श्रेष्ठत्व आणि पौराणत्व. २ वैदि-कग्रंथोदधि, त्याचें उत्पत्तिस्थान, महिमा व काल, यां-विषयींचें विवेचन. ३ ऋग्वेद. ४ यजुर्वेद. ५ साम-वेद. ६ अथर्वणवेद. ७ वेदांगें. ८ वेदकालीन आचार विचार, सामाजिक स्थिति, विद्याभिवृद्धि, आणि मानसिक उन्नति. ९ काव्यें, नाटकें, कल्पितकथा व कादंबरी. १० व्याकरणशास्त्र. ११ धर्मशास्त्र. १२ वेदान्तशास्त्र. आणि १३ इतरशास्त्रें व नानाविध कला.

तथापि, ह्या सर्व विषयांचे, थोडक्यांत फक्त तीनच वर्ग करतां येण्यासारखे आहेत. अर्थात्, ते विशेष सोयीचे, उपयुक्त, व अर्थबोधक असल्यामुळें, तेही येथें नमूद करतों. १ वैदिक-

त्याची वर्गवारी, व

ग्रंथोदधि. २ लौकिकग्रंथसंपत्ति. आणि ३ शास्त्र विषयकग्रंथभांडार.

वैदिकग्रंथोदधींत, दोन पासून आठ पर्यंतच्या भागांचा अन्तर्भाव होतो. लौकिकग्रंथसंपत्तींत, नवव्या भागांत नमुद केलेल्या गद्यपद्य ग्रंथावलीचें वर्णन आहे. आणि शास्त्रविषयकग्रंथभांडारांत, दहा पासून तेरा पर्यंतच्या भागांतील विषयांचें विवेचन आहे. मात्र, वर्गभेदक संज्ञा प्रत्येक भागाच्या शिरोभागीं दाखल केली असून, भागाचे आंकडे चढत्या अनुक्रमानेंच असल्या कारणानें, ते भारतीय साम्राज्याच्या नवव्या पुस्तकाच्या पुढील शेजेनें, अंक ९७ पासून सुरू झाले आहेत.

चढता शेजानुक्रम.

असो. ज्या संस्कृत भाषेच्या अवलोकनानें, मोठमोठे पाश्चात्य विद्वान देखील सकौतुकाश्चर्य माना डोलवितात; जिचा गुणोत्कर्ष पाहून, आमच्या आर्यपूर्वजांच्या बुद्धिवैभवाची त्यांजला धन्यता वाटते; आणि जिच्या ग्रंथोदधींचें अनंतत्व मनांत आणून, ते सविस्मय तोंडांत बोटें घालतात; त्या भाषेविषयीं आम्हांला कांहींच गौरव वाटू नये, अथवा तद्भाषाविषयक थोडाबहुत इतिहासही आमच्या भाषेंत उपलब्ध नसावा, ही खरोखरच अति शोचनीय स्थिति होय. सबब, ही मोठी उणीव मनांत येऊन, ती यथामति पुरी करण्याच्या हेतूनें, संस्कृत भाषेचा सांक्षिप्त इतिहास देण्याचा विचार ह्या अल्पधीनें केला आहे; आणि भार-

संस्कृत भाषेच्या इतिहासाची आवश्यकता.

तीय साम्राज्य मालिकेंत, तत्संबंधीं स्वतंत्र पुस्तकपुष्पच गुफण्याचें योजिलें आहे.

मागील पुस्तकांत, भरतखंडांतील नानाविध भाषांचें दिग्दर्शन केलें असून, त्यांत व दुसऱ्या पुस्तकांत, संस्कृत भाषेचाही थोडाबहुत वृत्तान्त दिला आहे. परंतु, त्यात ह्या भाषेच्या संबंधानें अवश्य तेवढी साद्यन्त हकीकत आलेली नाहीं. सबब, ती येथें जरा विस्तारानें देण्याचा विचार केला आहे.

कार्यमहत्व, व त्या मानानें माझें निर्बलत्व.

आतां, हें काम किती महत्वाचें आहे, तें मी जाणून आहे. इतकेंच नव्हें तर, तें केवळ माझ्या शक्तीबाहेरचेंच असल्या कारणानें, तें कसें व कितपत पार पडेल, याविषयीं देखील माझें मन फारच साशंक होत आहे. तथापि, वाचकांच्या सहिष्णुतेचा, आणि त्यांच्या थोर व उदार अंतःकरणाचा भरंवसा वाटून, ही अत्यल्प देशसेवा या मंदमतीनें कशी-बशी आणि भीतभीत सादर केली आहे. सबब, फक्त मजवर अनुग्रह होण्यासाठींच, तिचा हंसक्षीरन्यायानें स्वीकार व्हावा, अशी माझी सविनय प्रार्थना आहे.

संस्कृतग्रंथोदधि.

अस्तु. ह्या भूगोलावरील सर्व भाषांचें अवलोकन करून, त्या सर्वांत उत्तम भाषा कोणती असा प्रश्न आपल्यापुढें आला; अथवा, ह्या सर्वांपैकीं पहिल्या पंक्तीला कोणाला बसवावें,

---

१ भारतीय साम्राज्य, उत्तरार्ध, पुस्तक नववें.

२ भारतीय साम्राज्य, पूर्वार्ध, पु. २ रें. भाग १२।१३।१४.

असें कोणीं आपणांस विचारिलें; किंवा, त्यांच्या गुणावगु-णांची चर्चा करून, श्रेष्ठपद कोणास द्यावें अशाबद्दलचा ऊहापोह सुरू झाला; तर, प्रथमतः संस्कृताकडेसच बोट दाखवून, ह्या भाषेलाच अत्युच्च स्थान देणें भाग पडेल.

त्याचें महत्व.

कारण, ही भाषा जितक्या अंशानें मोहक आहे, तितक्याच अंशानें ती परिपक्व दशेप्रत ही पोहोंचलेली आहे. आणि ती तशा स्थितीला आणण्यासाठीं केवळ उत्तमोत्तम कविकुल-परंपरेनें आपलीं आयुष्येंच्या आयुष्येंही खर्ची घातलीं आहेत. त्यामुळें, ज्ञानाच्या प्रत्येक शाखेंत, आर्यनिर्मित संस्कृतग्रंथोदधि हा जणूकाय पूर्णत्वानें भरलेला महासा-गरच आहे, असें सहजीं दिसून येतें.

त्यासंबंधानें पाश्चात्य पंडितांचें मत.

एके ठिकाणीं, सर. विल्यम् जोन्सनें असें म्हटलें आहे कीं, आर्यहिंदूंचें ज्ञानभांडार अपरंपार भरलेलें असून, जिकडे जि-कडे म्हणून नजर फेंकावी, तिकडे तिकडे अनंतत्वाशिवाय दुसरा भासच होत नाहीं. इतकेंच नव्हें तर, भरतखंडाच्या मानानें इतर सर्व देशांशीं तुलना करून पाहिलें असतां, भरतभूशिवाय इतर कोणत्याही देशांतील ग्रंथसंपत्ति, जी अतिशय मोठी म्हणून नांवाजली जाते, ती देखील, अगदीं क्षुद्रवत् व चिमुकलीशी भासते. किंबहुना, एकाद्या प्रचंड तोयराशीपुढें लहानसा तडाग जसा किंपदार्थ दिसतो; अथवा ह्या भूगोलाच्या मानानें एकादें बेट जसें केवळ तुच्छ-वत् वाटतें; किंवा सिन्धु, गंगा, ब्रह्मपुत्रा, इत्यादि नद्यांपुढें

एकादा ओढा जसा निव्वळ जलधारेप्रमाणें भासतो; त्याचप्रमाणें, भारतीयग्रंथोदधीपुढें इतरांची अवस्था होते[1].

सर मॉनियरचा अभिप्राय.

ह्याचप्रमाणें, **सर. मॉनियर विल्यम्स्**[2] यांचा देखील अभिप्राय आहे. ते असें म्हणतात कीं, संस्कृतग्रंथोदधीचा परिमल व तदतिरेक, ह्यांची पाश्चात्यांस कल्पना देखील व्हावयाची नाहीं.

भट्ट मोक्षमुलरचें मत.

सुप्रसिद्ध भट्ट मोक्षमुलर यांचा असा अभिप्राय आहे कीं, कोणतीही जिज्ञासा संस्कृत भांडारानेंच परिपूर्ण व तृप्त होण्यासारखी आहे[3].

---

१ सर जोन्स म्हणतो:—

"Wherever we direct our attention to Hindu Literature, the notion of infinity presents itself; and surely the longest life would not suffice for a single perusal of works, that rise and swell protuberant, like the Himálayas, above the bulkiest compositions of every land, beyond the confines of India."

२ हा असें लिहितो कीं,

"An adequate idea of the luxuriance of Sanskrit Literature can with difficulty be conveyed to occidental scholars."

( Indian Wisdom. )

३ हा म्हणतो,

"Take any of the burning questions of the day—popular education, higher education, parliamentary

( पुढें चालू )

आमचें भरतखंड ही एक अपूर्व पुराणभूमि आहे. कारण, तींत सर्व कांहीं परिपूर्ण असल्यामुळें, शास्त्राचीं सर्व अंगें व कलासमुदायांच्या सर्व शाखा येथेंच उदयास येऊन, त्या विकासाप्रत पावल्या आहेत. काव्यें आणि नाटकें, गद्य व पद्य, न्याय आणि व्याकरण, साहित्य व संगीत, ज्योतिःशास्त्र आणि भूमितिशास्त्र, अंकगणित व बीजगणित, वैद्यशास्त्र आणि नीतिशास्त्र, वाद्यकला व नाट्यकला, शिल्पकला आणि पटनिर्माणविद्या, चित्रकला व रागकौशल्य, वास्तुविद्या आणि यंत्रकला, पाकशास्त्र व गंधद्रव्यक्रिया, लेखनकला आणि द्यूतचातुर्य, इत्यादींचें हिंदुस्थान हें केवळ माहेरघरच आहे. ह्याशिवाय, आत्मज्ञान किंवा वेदांतविषय, धर्मशास्त्र आणि व्यवहारज्ञान, भाषाशास्त्र व भूगर्भ-

भरतभूमि म्हणजे शास्त्रकलांचें भांडार.

---

( मागील पृष्ठावरून पुढें चालू. )

representation, codification of laws, finance, emigration, poor-law, and whether you have any thing to teach and to try, or any thing to observe and to learn, India will supply you with a Laboratory *such as exists no where else.* That very Sanskrit.* * * will open before you *large layers of literature,* as yet almost unknown and unexplored, and allow you an insight into strata of thought *deeper than any you have known before,* and rich in lessons that appeal to the deepest sympathies of the human heart." ( What can India teach us ? P. P. 13-14. Edition 1883. )

सदरह अवतरणांतील इतालिक वर्ण आमचे आहेत. ( ग्रंथकर्ता. )

शास्त्र, प्राणिविद्या आणि उद्भिद्विद्या, यांतहीं आर्यपूर्वजांनीं पुष्कळ परिश्रम केले आहेत.

अशा प्रकारच्या भगीरथ प्रयत्नांनीं, आमच्या पूर्वज

त्याचा फैलाव.

ऋषींनीं संस्कृत भाषेचें अत्युत्तम लालनपालन केलेलें असल्यामुळें, तिच्या सुकीर्तीचा परिमल सर्वत्र पसरून, तदामोद ग्रहणार्थ ह्या भूमंडलावरील प्रत्येक राष्ट्र आपली उत्कट लालसा दाखवूं लागलें. त्यांच्याच दीर्घोद्योगानें हा गीर्वाणप्रसाद त्या परकीयासही लवकरच लाभला. इतकेंच नव्हे तर, ह्या दुर्लभ मिष्टान्नाची अपूर्व रुचि त्यांजला भासमान होऊन, त्यांनीं तें सर्वांस मिळे अशी एकदम तजवीज केली.

आतां, ह्या आर्यभाषेला संस्कृत हें नांव कसें, केव्हा, व

आर्यभाषेला संस्कृत नांव पडण्याचें कारण.

कां पडलें, याविषयींचें कुतूहल प्रथमतःच उत्पन्न होण्याचा संभव आहे. सबब, तत्संबंधीं थोडीशी हकिकत सांगितली असतां ती अप्रासंगिक होणार नाहीं असें समजून, ती येथें पूर्व इतिहासासहित यथावकाश देतों.

आर्यभाषेच्या संबंधानें अनेक भाषाकोविदांची हल्लीं

जी सुसंस्कृत झालेली, तीच संस्कृत भाषा होय

जी चर्चा सुरू आहे, तिजवरून असें अनुमान करण्यास बलवत्तर कारण मिळतें कीं, आपापल्यांत परस्परांचे विचार प्रदर्शित करण्यासाठीं, आमच्या ऋषिवर्य आर्यपूर्वजांनीं कांहीं विशेष संज्ञा मुद्दाम ठरविल्या असाव्यात; आणि त्याअन्वयें, एक सर्वसाधारण आर्यभाषा प्रथमतः प्रचारांत आली

असावी.[1] तदनंतर, प्रसाद व गांभीर्य, माधुर्य आणि पद-लालित्य, इत्यादिविषयीं नैसर्गिक लालसा आणि तीव्र इच्छा उत्पन्न होऊन, ती आपोआपच बळावत चालली. त्याकारणानें, तिच्यांत शब्दजालरत्नांची हळूं हळूं परंतु एकसारखी नवीन भर पडत जाऊन, तिला विलक्षण सौन्दर्य सहजींच प्राप्त होत गेलें. पुढें, अनेक कविरत्न मुकुटमणि, आणि विद्वान पंडितसमूह, इत्यादींनीं तिची अहोरात्र सेवा करून, तिजवर अत्युत्कृष्ट अलंकार चढविण्याचें मनांत आणिलें. इतकेंच नव्हे तर, तिला अत्युच्चस्थानापन्न करण्याचा त्यांनीं जणूकाय विडाच उचलला. त्यामुळें, त्यांच्या ह्या भगीरथ प्रयत्नास सर्वतोपरि संपूर्ण यश येऊन, ही आर्यभाषा अगदीं परिपक्व दशेप्रत पोहोंचली.

अशा रीतीनें, अनेक विद्वज्जनांच्या अव्याहत श्रमानें तिजवर चांगले संस्कार घडून आल्यानें ती सुसंस्कृत झाली, आणि लावण्याची केवळ खाणच बनली. म्हणून हिला संस्कृत असें नामधेय पडून, जी आर्यभाषा अपभ्रष्ट होऊन अनलंकृत स्थितींत राहिली, तिला प्राकृत म्हणूं लागले.

व अनलंकृत ती प्राकृत भाषा होय.

तथापि, संस्कृत हें अन्वर्थ नामधेय पडण्यापूर्वीं, ह्या अपूर्व भाषेला काय म्हणत असत, व तिला कोणती संज्ञा

---

१ भाषेची उत्पत्ति व तिचें उद्गमस्थान, याविषयींचा ऊहापोह भाषाशास्त्रांत आम्हीं तपशिलवार केला आहे.

होती, हें कळणें फारच आवश्यकतेचें आहे. सबब, तिकडेच आपण क्षणभर वळूं, आणि त्या संबंधाचा कांहीं दाखला मिळाला तर पाहूं.

ज्या भाषेला आम्हीं हल्लीं **संस्कृत** म्हणतों, अथवा तिचें मूळ, व पहिलें नांव.[1] जिला ह्या पृथ्वीवरील सर्व राष्ट्रें **संस्कृत** या सुविश्रुत नामधेयानेंच ओळखतात, ती अति प्राचीन काळीं, किंबहुना आमचा जन्म होऊन आम्ही उदयास आल्यापासूनच, आमची व्यावहारिक भाषा होती. आणि म्हणूनच, **आर्यावर्तांत**

---

[1] **संस्कृत** ही व्यावहारिक भाषा असल्याविषयीं, आम्हीं **भारतीय साम्राज्याच्या** नवव्या पुस्तकांत, यथास्थित ऊहापोह केला आहे. सबब, वाचकांनीं कृपा करून आपलें लक्ष्य तिकडे पुरवावें. ( पान ९७ ते १२८ पहा. )

ह्या संबंधानें **भट्टभांडारकरांचे** विचारही येथें थोडक्यांत देतों. ते म्हणतात कीं; आह्मा **भारतीयांची** संस्कृत हीच मूळपासूनची व्यावहारिक भाषा होय.

" Sanskrit must have been a spoken language. And, independently of this consideration, there is positive evidence that Sanskrit was a spoken language. " P. 326. " Hence Sanskrit must have been in the times of those two grammarians ( Kâtyâyara and Patanjali ), a spoken language. " P. 327. " It is evident from the whole passage, that Sanskrit was then a spoken language, though some of its verbal forms had fallen into desuetude. " P. 328.

" I am at a loss to see why some scholars should

( पुढें चालू )

अगर विस्तृत भरतखंडांत, ती आम्ही अहर्निशीं बोलत असूं, व यच्चावत् व्यापार तिच्यांतच चाले, याविषयीं तिळमात्र देखील शंका नाहीं. मात्र, त्यावेळीं तिला संस्कृत हें प्रौढ आणि अन्वर्थ नांव प्राप्त झालें नव्हतें; व तत्समयीं तिची तशी योग्यताही नव्हती. अर्थात्, वेदकाळीं, तिला फक्त वाक् हीच सामान्य संज्ञा असावी, असें वाटतें; आणि अनेक प्रमाणांवरून देखील तें तसेंच असल्याचें दिसतें.

---

( मागील पृष्ठावरून पुढें चालू. )

find it so difficult to believe that Sanskrit was a vernacular. If its declensions and conjugations are considered too complicated for the language of every day life, it must not be forgotten that such a fact did not prevent the ancient languages of Europe from becoming spoken languages." P. 328.

"The only differenco is that Sanskrit has had the most perfect grammarians in the world, who observed all the facts of their language, and laid them down as unchangeable facts, and it is this which gives that language a stiffened appearance." P. 328.

"Now, it is clear from all this, that correct words, i. e., Sanskrit, was spoken in those days by all." P. 328. ( Dr. Bhândârkar's Sanskrit and Prakrit lectures. R. A. S. Society. Bombay Branch. vol. XVI. 1885. )

ह्यावरून, संस्कृत ही व्यावहारिक भाषा असल्याविषयींची वाचकांची खात्री होण्यासारखी आहे.

ऋगुवेदांतल्या दहाव्या मंडलांत खालीं लिहिलेला ऋचार्ध असून, त्यांत "मी भाषण करतों" 'वाचः प्रथमं मसीय' असें अग्नीनें म्हटलें आहे. अर्थात् ही वाचा म्हणजे नेहेमींची तत्कालीन प्रचारांतील भाषा होय. आणि तिलाच वाक् ही त्यावेळीं सामान्य संज्ञा असे, अशी माझी अल्प समजूत आहे.

भाषामंज्ञक वाक् शब्दाचा उपयोग.

" तदेद्य वाचः प्रथमं मसीय. १३ (ऋ. मं. १० अ.४.)

हल्लीं आपण बोलत असलेल्या भाषेला जशी मराठी, महाराष्ट्री, किंवा प्राकृत, अशी संज्ञा आहे, त्याचप्रमाणें वेदकालीन आर्यभाषेला ( म्हणजे वैदिक संस्कृताला ), वाक् हीच सामान्य संज्ञा होती, असें मला वाटतें. इतकेंच नव्हे तर, ह्या प्रतिपादनाच्या पुष्टीकरणार्थ आणखीही बलवत्तर प्रमाण मिळतें.

ह्या संबंधानें, ऋगुवेदाच्या पहिल्या मंडलांतील ऋचा विशेष महत्वाची आहे. सबब ती येथें नमुद करतों.

त्याचें प्रमाण.

चत्वारिवाक् परिमिता पदानि
तानिविदुर्ब्राह्मणाये मनीषिणः ।
गुहात्रीणि निहतानेङ्गयन्ति
तुरीयंवाचो मनुष्यावदन्ति ॥ ४९ ॥

(ऋ. अ. २ अ. ३ व २२ मं. १ अ. २२ सू. १६४).

भावार्थः—वाचेचीं चार रूपें सांगितलीं असून, विद्वान ब्राह्मणांस तीं माहीत आहेत. ह्यांपैकीं तीन गुप्त

असल्यामुळें, तीं कोणाच्या लक्षांत येत नाहींत. आणि फक्त राहिलेलें जें वाणीचें चवथें रूप, तें मात्र मनुष्यें बोलतात.

ह्या ऋचेंत, "वाचो मनुष्या वदन्ति," हे शब्द खचितच ध्यानांत ठेवण्यासारखे आहेत; आणि जी भाषा मनुष्यें बोलतात म्हणून सदरहू ऋचेंत वर्णन आहे, ती भाषा त्यावेळीं व्यवहारांत होती, असें समजणें भाग पडतें. हिलाच आर्यभाषा किंवा वैदिकसंस्कृत म्हणतात; व हिलाच वाक् हें त्यावेळचें भाषासंज्ञक सामान्य नांव असावें, असें वाटतें. कारण, तिला वाचा अशीच संज्ञा दिली असल्याचें सदरहू ऋचेंत सांगितलें असून, ही गोष्ट "वाचो मनुष्यावदंति," या पदांवरून चांगली व्यक्त होते.

ऋग्वेदांतील.

वेदकालीन समाजाची, निदान प्रथमची तरी, खचितच बाल्यावस्था होती. त्यामुळें, त्यांच्या व्यावहारिक भाषेला देखील कायमचें स्थैर्य किंवा प्रौढता आली नव्हती, असें म्हणण्यास हरकत नाहीं. आणि म्हणूनच, तिला कोणतेंही विशेष नांव पडलें नसावें; व "वाक्" किंवा "वाचा" हेंच तिचें सामान्य आणि नेहमींच्या परिपाठांतलें नांव असावें; असें मानण्यास बलवत्तर कारण मिळतें. अर्थात्, पाणिनीच्या वेळीं प्रचारांत असलेल्या संस्कृत भाषेला ज्याप्रमाणें "भाषा" अशी संज्ञा होती, त्याचप्रमाणें वेदकालीन ऋषी हे त्यांच्या वेळीं प्रचारांत असलेल्या भाषेला "वाक्" म्हणत, असें दिसतें.

यजुर्वेदांत देखील "वाक्" शब्द केवळ तत्कालीन

यजुर्वेदांतील. भाषासंज्ञकच असल्यामुळें, त्याचा तसा उपयोग केल्याचें चांगलें व्यक्त होतें. कारण, त्या भाषेचें व्याकरण सांगण्याविषयीं, आमच्या त्यावेळच्या ऋषींनीं इन्द्राची प्रार्थना केल्यावरून, त्यानें त्यांस तें प्रकट केलें होतें; व ती गोष्ट तशी असल्याबद्दल योग्य प्रमाण सुद्धां मिळतें.

" कृष्णयजुर्वेदांतील ऐन्द्रवायवग्रहब्राह्मणांत, एके ठिकाणीं खालीं लिहिल्याप्रमाणें उल्लेख आढळतो:—

**वाग्वै पराच्य व्याकृताऽवदत् । ते देवा इन्द्रमब्रुवन्निमां नोवाचं व्याकुर्विति । सोऽब्रवीद्वरं वृणै । * * तामिन्द्रो मध्यतोवक्रम्य व्याकरोत् । तस्मादियं व्याकृता वागुच्यते ।** इत्यादि. ( ६-४. )

सामवेदांतील त्याचप्रमाणें, **सामवेदांत** देखील **वाक्** शब्द तत्कालीन भाषासंज्ञकच असल्याचें दिसतें.

**कदु प्रचेतसे महे वचो देवाय शस्यते ।**
**तदिध्यस्य वर्धनम् ॥ २ ॥**

( २ अ० १२ ख० ३ प्र० १ अर्द्ध ४ द० ६ ऋ० )

**अयमु ते समतसि कपोत इव गर्भधिम् ।**
**वचस्त च्चिन ओहसे ॥ ९ ॥**

( २ अ. ७ ख. २ प्र. २ अर्ध ९ द. १ ऋ. )

व अथर्वणवेदांतील. अथर्वणवेदांत तर, याहीपेक्षां बलवत्तर प्रमाण उपलब्ध होतें; आणि त्यावरून, "**वाक्**" शब्द तत्कालीनवाचेचाच संज्ञक होता, असें वाटतें.

मधुमन्मे निक्रमणं मधुमन्मे परायणम् ।
वाचा वदामि मधुमद्भूयासं मधुसँदृशः ॥ ३ ॥
( अथर्वणवेद. १. ३४. )

कारण, सदरहू ऋचेंत "**वाचावदामि**," म्हणजे "त्यावेळीं प्रचारांत असलेल्या आर्यभाषेंत किंवा वैदिकसंस्कृतांत बोलतों," असें सांगण्याचा भावार्थ दिसतो. नाहींपेक्षां, ("**वाचा**"=वाचेनें=तत्कालीन व्यावहारिक भाषेनें हा शब्द घातल्याशिवाय देखील) नुसत्या **वदामि** ( म्हणतो ) शब्दानें कार्यभाग होण्यासारखा आहे.

गीः शब्दाचा व्यावहारिक उपयोग.

**वाचे**प्रमाणेंच "**गीः**" शब्द देखील तत्कालीन व्यावहारिक भाषेचाच संज्ञक असे, यांत शंका नाहीं. कारण, त्यावरूनच **गीर्वाण** हें भाषेचें नांव पडलें आहे; आणि **गीर्वाण** म्हणजे **संस्कृत** भाषा होय, असें समजतात. अर्थात्, **वैदिक संस्कृताला** ज्याप्रमाणें **अन्वध्यायम्**, **छन्दस्**[२], **निगम**, **मंत्र**, आणि **ब्राह्मण**, अशीं नांवें आहेत, त्याचप्रमाणें **वेदकाळीं** प्रचारांत असलेल्या भाषेलाही मुख्यत्वेंकरून "**वाक्**" व कधींकधीं "**गीः**" अशी संज्ञा दिल्याचें दिसतें. यासंबंधानें, ऋग्वेदांत खालीं लिहिल्याप्रमाणें आढळून येतें.

---

१ हें नांव **यास्कानें** दिलेलें होय. निरुक्त (१-४), व पुढील पान ( १९ ) पहा.

२ हें **पाणिनीच्या अष्टाध्यायींत** सांपडतें. पुढील पान ( २० ) पहा.

**यथा वामत्रिऽश्विनागीर्भिर्विप्रोऽअजो हवीत् ॥ २८॥**
(ऋ. अ १. अ ३. मं ८. अ ५.)

**गिरःस्तोमासऽईरते॥२९॥**(ऋ. अ १.अ ३. मं ८. अ. ६.)

**सा**मवेदांत सुद्धां, "**गीः**" शब्दाचा व्यावहारिक वाचा म्हणूनच उपयोग केला असल्याचें दिसतें. कारण, त्यांतील ऋचांत, गिरेनें स्तवन करीत असल्याचें ठिकठिकाणीं वर्णन आहे, व त्यावेळची **गीः** किंवा **वाक्** ही **संस्कृत** होती, म्हणजे **वैदिक संस्कृत** होती, याविषयीं बिलकुल शंका नाहीं. (मागें पान ११।१२ व पुढें पान २१।२२ पहा).

**सा**मवेदांतील कांहीं उतारे वाचकांच्या सोईसाठीं, येथें थोडक्यांत देतों.

**अग्ने त्वां कामये गिरा ॥ ८ ॥**
(१ अ. १ ख. १ प्र. १ अर्द्ध. १ द. ८ ऋ.).

**यजिष्टमंजसे गिरा ॥ २ ॥**
(सदर. २ द. ३ ऋ.)

**त्वं त्वा गोपवनो गिरा जनिष्ठदग्ने अंगिरः।**
(१ अ. ३ ख. १ प्र. १ अर्द्ध ३ द. ११ ऋ.)

**इन्द्राय मद्वने सुतं परिष्टोभन्तुनोगिरः**
(२ अ. ५ ख. २ प्र. ९ अर्द्ध. ९ द. ७ ऋ.)

**गीर्वणः पाहि नः सुतम् ।**
(ऐन्द्रपर्व, कलकत्ता आवृत्ति. पान १०४)

**इन्द्रंगीर्भिस्तविषमा विवासत ॥ २ ॥**
(ऐं. प. क. आ. पा. २११)

उपोषुश्रृणुहीगिरोमघवन्माऽतथाइव ॥ ८ ॥

( ऐं. क. पा. २३४ )

असो. वेदकालानन्तर, ह्या भाषेंत थोडासा फरक पडत चालला; व त्यामुळेंच तिला काठिण्य येऊन, ती सामान्य जनांस समजेनाशी झाली. तथापि, शनैः शनैः थोडें बहुत रूपान्तरें होऊन जी भाषा सिद्ध झाली, तीच लोकांची व्यावहारिक भाषा बनल्याकारणानें, तिच्यांत आणि वैदिक भाषेंत थोडा विशेष मानणें, किंवा कांहीं निराळ्या संज्ञेनें दोहोंत भेद करणें भाग पडलें; व त्याच योगानें, वेदकालीन भाषेचें एक नांव, आणि वेदकालानन्तर प्रचारांत असलेल्या भाषेचें एक नांव, असें पृथक् पृथक् नामकरण अमलांत आलें.

वेदकालानन्तर व्यावहारिक भाषेचें नांव.

ही गोष्ट बहुत ग्रंथांवरून, व अनेक ऋषिप्रमाणांवरून सिद्ध होण्यासारखी आहे. सबब, तिकडेच आपण क्षणभर वळूं, आणि त्यासंबंधाचा अवश्य तो दाखला वाचकांपुढें ठेवूं.

यास्क ऋषीच्या वेळीं वैदिक भाषेला अन्वध्यायम् म्हणत, व ऋषि मजकूर हे ज्या व्यवहारिक भाषेचा उपयोग करीत, तिला "भाषा" हें रूढ आणि प्रचारांतलें नांव असे. ही फोड वेदकालीन भाषेंत दिसत नाहीं, व त्यावेळीं अन्य भाषा प्रचारांत देखील नव्हती. पुढें, कालान्तरानें, वेददुर्बोधत्वामुळें व्यवहारिक भाषा निराळीं झाली, आणि सदरीं निर्दिष्ट केलेली वैदिक व व्यावहारिक भाषेचीं नांवें आपोआपच प्रचारांत आलीं.

वेदभाषेचें व व्यावहारिक भाषेचें यास्कानें ठरविलेलें नांव.

ही गोष्ट निरुक्तावरून स्पष्ट दिसते; आणि वेदकाठिण्यामुळें त्याच्या अर्थावबोधाची खरी आवश्यकता असल्याचेंही त्यावरूनच व्यक्त होतें. कारण, त्यांत असें म्हटलें आहे कीं,

**भाषायां चान्वध्यायम् ॥ ( १–४ ).**
**अथापीदमंतरेण मंत्रेष्वर्थप्रत्ययोनविद्यते ।**
**अर्थमप्रतियतोनात्यंतं स्वरसंस्कारोद्देशः ।**

( १-१९ निरुक्त. )

व्यावहारिक भाषेचें गमायण कालीन नामधेय,

पुढें, कालान्तरानें, ह्या व्यावहारिक भाषेला शनैः शनैः बरेंच मनोहरत्व येऊं लागलें, व तिची सौंदर्यकळा देखील शुक्ल चंद्रमाप्रमाणें फांकत चालली. त्यामुळें, तिच्या रमणीयतेला अधिकाधिक तेज येऊन, ती सहजींच अलंकृत झाली, आणि रामायणकालीं तिला संस्कृत हें अन्वर्थ नामधेय पडलें.

ह्याचें प्रत्यक्ष प्रमाण आपल्याला रामायणांतच दिसून येतें, व तत्कालीन व्यावहारिक भाषेची संज्ञा संस्कृत असल्याचें त्यावरूनच व्यक्त होतें. कारण, अरण्यकांडांत, इल्वल नामक क्रूर राक्षसानें ब्राह्मणाचें रूप धारण करून, तो संस्कृत बोलावयास लागला, आणि नंतर त्यानें ब्राह्मणांस श्राद्धकर्म करण्यास बोलाविलें, असें वर्णन आहे.

**धारयन् ब्राह्मणं रूपं इल्वलः संस्कृतं वदन् ।**
**आमंत्रयति विप्रान्स श्राद्धमुद्दिश्यनिर्घृणः ॥ ९६ ॥**

( रामायण, अरण्यकांड, सर्ग ११ वा. )

आतां, लौकिक, भाष्य, व भाषा, हीं गीर्वाण भाषेची

व तदनन्तर आजपर्यंत चालत आलेलें नामधेय.

नांवें जरी प्रसिद्ध आहेत; आणि शास्त्रीय ग्रंथांत तीं विशेष प्रचारांत असल्याचें जरी दिसतें; तरी एकंदर व्यवहारांत संस्कृत हेंच नांव ज्यास्त मशहूर आहे, व तेंच अद्यापिही चालतें.

पाणिनीच्या अष्टाध्यायींत मुद्रां प्रचारांत असलेल्या

ह्या भाषेचें पाणिनी-च्या वेळचें नांव.

व्यावहारिक भाषेला, "भाषा" अशी संज्ञा दिली आहे, व वैदिक भाषेला छन्दस् म्हटलें आहे.

विभाषा छन्दसि । ( १-२ )
छन्दसि सहः । ( ७ ४ )
भाषायां सदवसश्रुवः ( ७-६ )

तथापि, त्याला संस्कृत शब्द हा क्वचितच अभ्यस्त

संस्कृत शब्दाशीं पाणिनीची अभ्यस्तता.

होता. आणि पाणिनीय शिक्षेंत तर संस्कृत शब्दाचा उपयोग प्राकृत शब्दाच्या मुकाबल्यानेंच केलेला आढळतो.

त्रिषष्टिश्चतुःषष्टिर्वा वर्णाः शंभुमते मताः ।
प्राकृते संस्कृतेचापि स्वयं प्रोक्ताः स्वयंभुवा ॥
( पाणिनीय शिक्षा. )

---

१ ही गोष्ट प्रमाणसिद्ध असल्याकारणानें, ती वेबरसारख्या अति तीक्ष्ण गुणदोष विवेचकास सुद्धां कबूल करणें भाग पडलें. तो म्हणतो,

"Panini is familiar with the word Sanskrit, but does not use it in this sense; though the Paniniya Sikshá does so employ it, in contradistinction to Prakrit."

( Weber's History of Sanskrit Literature.

कात्यायनकृत[1] शुक्लयजुः प्रातिशाख्यांत, वैदिक भाषेला छन्दस् अशी संज्ञा असून, त्या ऋषीच्या वेळीं प्रचारांत असलेल्या भाषेला लौकिक किंवा भाष्य, अशी संज्ञा असल्याचें दिसतें.

कात्यायन कालीन त्या भाषेची संज्ञा.

**स्वरसंस्कार योश्छन्दसि नियमः ॥१॥** (अध्याय १ ला).
**लौकिकानामर्थपूर्वकत्वात् ॥ २ ॥** ( अध्याय १ ला ).
**अथकारं भाष्येषु ॥ १९ ॥** ( अध्याय १ ला ).

सदरीं " विभाषा, " " भाषायाम्, " " भाष्येषु, " इत्यादि जीं पदें नमुद केलीं आहेत, त्यांचा[2] अर्थ व्यावहारिक किंवा प्रचारांतली भाषा असल्याविषयीं, आम्हीं पूर्वीच सांगितलें असून, भट्ट भांडारकर देखील त्याचा अर्थ तसाच करतात.

भाषा म्हणजे व्यावहारिक भाषा.

---

१ कात्यायनाचा काल इ. स. पूर्वी चवथें शतक असल्याविषयीं, भट्ट भांडारकर यांचा अभिप्राय आहे. ते म्हणतात, " I am therefore inclined to accept the popular tradition which refers Kātyāyana to the period of the Nandas, i. e., to about the first quarter of the fourth Century. "
( Dr. Bhandarkar's Sanskrit and Prakrit Lectures. R. A. S. Bombay Branch. vol. XVI. 1885. P. 340 ).

२ ह्यासंबधानें ते असें म्हणतात कीं, "Now, since Bhâshâ, or the ordinary Sanskrit, is thus distinguished from the dialect of the Vedas, it must be the language in use at the time when these writers lived. " Bhasha, " as used by them, is a proper name, but

( पुढें चालू )

ह्या सर्व गोष्टींचा योग्य आणि सूक्ष्म विचार केला, म्हणजे आपल्याला एवढी गोष्ट अगदीं निर्विवादपणें कबूल करावी लागते कीं, देशावरून, लोकांवरून, अगर राष्ट्रांवरूनच भाषेला नांव पडतें; अथवा, तन्नाम संज्ञकच त्यांच्या भाषेचें नामधेय असतें; म्हणून जें कित्येक प्रतिपादन करतात, तें सर्वांशीं खरें नसून, भाषेचीं ही अशा प्रकारचीं देशसंज्ञक व राष्ट्रसूचक नांवें, तिला मागाहूनच प्राप्त होतात, यांत संशय नाहीं.

देशावरून किंवा राष्ट्रावरूनच भाषेला नांव पडतें, हें सर्वांशीं सिद्ध नाहीं.

याबद्दलच्या दाखल्याचें प्रत्यक्ष उदाहरण भरतखंडांतलेंच घेतलें, तर असें दिसून येईल कीं, आमच्या आर्य, वैदिक, गीर्वाण, किंवा संस्कृत भाषेचें प्रथमचें नांव वाक् अथवा गीः असें होतें. ( मागें पान १३ ते १७ पहा ). तदनन्तर, ही थोडीशी प्रचारातीत होऊन तिला काठिण्य आल्यावर, तिच्या ऐवजीं

त्याचें प्रमाण.

---

( मागील पृष्टावरून पुढें चालू. )

in later Sanskrit, it acquired a generic signification and meant language generally. The root from which the word is derived signifies "to speak," wherefore the original sense of the word as a proper noun must have been the "speech" or "the spoken language." And because this was its signification, it afterwards came to denote "explanation." P. P. 326/327. ( Dr. Bhandarkar's Sanskrit and Prakrit Lectures. vol. XVI. 1885. Royal Asiatic Society, Bombay Branch. )

अन्य व्यावहारिक भाषा बनली. त्यामुळें, पहिलीला अन्व-ध्यायम्, छन्दस्, निगम, मंत्र, ब्राह्मण, वेद, अशी संज्ञा पडून, दुसरीला भाषा, विभाषा, भाष्य, लौकिकी, व्यावहारिकी, असें म्हणूं लागले. ( मागें पान १८ ते २१ पहा ). पुढें, ह्या पुराणतम व पवित्र भाषेवर कालान्तरानें नानाविध अलंकार चढून, ती सुसंस्कृत झाली. आणि ह्याच कारणानें तिला संस्कृत हें अन्वर्थ नामधेय पडलें.

तद्विषयक मॉक्समुलरचा अभिप्राय व त्यांचें प्रामाण्यराहित्य.

तथापि, ह्या संस्कृत संज्ञेसंबंधानें, खुद्द मॉक्समुलरचा अभिप्राय कांहीं निराळाच असल्याचें दिसतें. कारण, हा असें म्हणतो कीं, गीर्वाण भाषेला संस्कृत हें जें नांव पडलें, तें ती भाषा विशेष अलंकृत

---

१ ह्यानें आपल्या " अनभ्यस्त बोधक संस्कृत व्याकरणांत " असें लिहिलें आहे कीं, *Sanskrita* (संस्कृत) means what is rendered fit or perfect. But Sanskrit is not called so because the Brahmans, or still less, because the first Europeans who became acquainted with it, considered it the most perfect of all languages. *Sanskrita* means what is rendered fit for sacred purposes; hence purified, sacred. A vessel that is purified, a sacrificial victim that is properly dressed, a man that has passed through all the initiatory rites or *Samskâras*; all these are called *Samskrita*. Hence the language which alone was fit for sacred acts, the ancient idiom of the Vedas, was called *Samskrita*, or the sacred language."

( Max Muller's Sanskrit Grammar for Beginners. 1866. )

किंवा फारच परिपूर्णतेस आल्याच्या योगानें नव्हे. तर, ती यज्ञयागादि क्रियार्थ अत्यन्त पवित्र मानलेली असल्यामुळेंच तिला **संस्कृत** हें नामधेय प्राप्त झालें. परंतु, ह्या प्रतिपादनास कसलें देखील प्रमाण आहेसें वाटत नाहीं. इतकेंच नव्हे तर, **संस्कृत** म्हणजे **दैवीवाक्**; अर्थात जिच्यांत **देव** बोलतात, ती भाषा होय; असें दिगन्त विख्यात **संस्कृत** कविवर समजतात, व सुप्रसिद्ध वाक्पंडितही मानतात.

**दण्डी**नें एके ठिकाणी म्हटलें आहे :—

**संस्कृतं नामदैवी वागन्वाख्यातामहर्षिभिः ।**

(काव्यादर्श.)

यापमाणें, संस्कृत भाषेला वेळोवेळीं जीं नांवें देण्यांत आलीं; अथवा ज्या नामकरणानें ती महशूर झाली; त्यापैकीं, देशाचे, लोकांचें, अगर राष्ट्राचें वाचक असें एक नांव देखील नाहीं, असें कोणाच्याही लक्षांत सहजीं येण्यासारखें आहे.

संस्कृत, प्राकृत, गाथा, छन्द, इत्यादि भाषांचीं नांवें देशावरून पडलेलीं नव्हेत, असा प्रत्यक्ष पुरावा.

**प्राकृत** भाषेचें देखील असेंच असून, तिचें **प्राकृत** हें भाषासंज्ञक नांव देशावरून, लोकांवरून, किंवा राष्ट्रावरून मुळींच पडलेलें नाहीं, ही गोष्ट प्रमाणसिद्ध असल्यामुळें, कोणासही कबूल केली पाहिजे.

**पालि** आणि **गाथा** नामक भाषा, व या दोहींपेक्षां पुराणतर जी **छन्द** भाषा, यांचेंसुद्धां याचप्रमाणें आहे; आणि ह्या तिन्ही भाषांचीं नांवें देशावरून, लोकांवरून, किंवा राष्ट्रावरून बिलकुल पडलेलीं नाहींत.

आतां, संस्कृत भाषेचें अवलोकन केलें, म्हणजे त्याबरोबरच तिच्यांतील अनेक गुण आपल्या हृत्कमलांत जणूकाय मूर्तिमंतच उभे राहतात. तिच्या चारुतेनें आपणांस अत्यानन्द होतो. तिच्या माधुर्यानें आपलें मन अगदीं वेधून जातें. तिच्या मोहकत्वानें आपल्या काळजाला धक्का पोहोंचतो. तिच्या प्रौढतेनें आपल्याला खरोखरीचा आल्हाद वाटतो. तिच्यांतील प्रसादानें आपला जीव थक्क होतो. तिच्यांतील ओजस पाहून आपलें मन विस्मय पावतें. तिच्यांतील व्यंजकत्वानें आपल्याला केवळ गुदगुल्याच होतात. आणि तिच्यांतील रसवत्तेनें आपल्या हृदयाला निव्वळ पाझरच सुटतो.

संस्कृत भाषेंतील गुणसमुदाय

आमच्या अति पूज्य वेदकालीन ऋषींनीं संस्कृत भाषेला जन्म देऊन तिचें फारच उत्तम प्रकारें संगोपन केलें. इतकेंच नव्हे तर, अनेक शास्त्रें आणि अनन्त कला, इत्यादि महत्वाच्या विषयांचें प्रतिपादन ह्याच भाषेंत करण्याचा त्यांनीं दृढ निश्चय केलेला असल्यामुळें, गांभीर्य व अर्थव्यंजकता, हे श्रेष्ठ गुण तिला सहजीं प्राप्त झाले. पुढें, पाणिनीसारख्या अति कुशल लेपकारांनीं संस्कृत शब्दजालरत्नांची अप्रतीम आणि मनोवेधक रचना करून, त्यांचें एक टुमदार, परंतु भव्य, अत्युज्ज्वल, मनोवेधक, दिव्य, व सुरम्य असें रत्नखचित कनकमय गृहच बनविलें. त्यामुळें, ही शब्दरत्नें सुवर्णसूत्रांच्या अपूर्व कोंदणांत योग्य ठिकाणीं बसलीं

तिजवर अनेक कविरत्नांनीं चढविलेले अलंकार.

जाऊन, ही इमारत फारच तेजोमय भासूं लागली. त्याकारणानें, ह्या नरव्याघ्र पाणिनीची जेवढी म्हणून तारीफ करावी, तेवढी थोडीच म्हणावयाची. अर्थात्, ज्यानें केवळ विलक्षण लाघवचमत्कृतीनें भारतीयांची जगद्वंद्य संस्कृत भाषा शब्दरूपजलानें शुद्ध करून, तिचें नियमन अवघ्या ३९८३ सूत्रांतच केलें, त्याचें बुध्द्यैश्वर्य खरोखरच धन्य होय!

कालिदासादि कवींनीं केलेले उपकार.

अस्तु. पाणिनीनंतर कालिदास, भवभूति, इत्यादि कविवरमुकुटमण्यांनीं सदरहू रत्नखचित गृहांत भरजरीचे गालीचे पसरून काव्यदोहन केलें, आणि अति मधुर वाङ्नवनीत काढिलें. कित्येकांनीं गद्यपद्य शास्त्रोदधीचें मंथन केलें; व कांहींनीं साहित्यादि शास्त्रकलांच्या असंख्य पेट्या भरून, त्या त्यांत व्यवस्थित रीतीनें मांडून ठेविल्या. दंडीसारख्या निपुण मतिषट्पदांनीं तर त्यांत मधुकुंभच रिचविले; आणि आपल्या सुमनोहर व मधुरतम गुंजारवानें, पदलालित्याची अगदीं रेलचेल व कमाल करून सोडली. आणि बाणा-

बाणासारख्यांनीं तिजला आणिलेलें मनोवेधकत्व.

सारख्यांनीं आपल्या रसिक वाणीच्या लावण्य पुष्पमाळा गुंफून, त्या ह्याच तेजोमय रत्नगृहांत व मणिमय मंदिरांत ठिकठिकाणीं मनोवेधक रीतीनें टांगून ठेविल्या. त्याकारणानें, त्याचा रमणीय आमोद आणि उज्ज्वल प्रकाश ह्या भूतलावर सर्वत्र पसरून, त्याच्या त्या अपूर्व दर्वळानें व दीप्तीनें, पाश्चात्य आणि पौरस्त्यांचें कुतूहल एकदम जागृत झालें.

संस्कृतभाषेचें मोहकत्व अगदीं थोडक्यांत वर्णन कराव-
संस्कृत भाषागुणनिधान. याचें असल्यास, भवभूतीची मालतीला उद्देशून असलेली उक्ति खरोखरच विशेष रीतीनें लागू पडण्यासारखी आहे. सबब, तिजवर वाचकानें आपलें लक्ष्य पोहोंचविल्यास, ह्या भाषेच्या श्रेष्ठत्वाचें रहस्य त्यांच्या ध्यानांत सहजीं येईल; व ह्या उक्तींतील पंक्ती संस्कृताला लाविल्यानें, त्यांची सार्थकताही भासेल.

सारामणीयकनिधेरधिदेवतावा
सौन्दर्यसारसमुदायनिकेतनंवा ।

अशा प्रकारें, ही संस्कृत भाषा अगदीं परिपक्व दशेप्रत पावली असल्यानें, तिची रचना विलक्षण आणि अलौकिक आहे; व यामुळेंच तिचें श्रेष्ठत्व कोणासही बिनतोड कबूल करावें लागतें. शिवाय, गांभीर्य व माधूर्य, अर्थव्यंजकता आणि प्रौढता, मार्दव व प्रसाद, उदात्तता आणि चारुता, ओजस व पदलालित्य, इत्यादि गुणांत तिची बरोबरी करणारी पौरस्त्य किंवा पाश्चात्य देशांत एकही भाषा नाहीं. इतकेंच नव्हे तर, शब्दभरण्याच्या संबंधानें विचार केला तरी देखील, संस्कृत भाषेचें पाऊल पुढेंच असल्याचें दिसतें; आणि या बाबतींत तिची सर्वांवर तान आहे, असेंच म्हणावें लागतें. आतां, ग्रीक व लाटिन या दोन प्राचीन भाषा युरोपांत अगदीं प्रमुख आहेत; आणि त्या तशाच प्रकारच्या असल्याबद्दल लोकही त्यांजला मान देतात. परंतु, त्यांजला देखील, संस्कृत भाषेच्या दीप्तीपुढें

निमूटपणें हात टेंकून, निव्वळ हारच पतकरावी लागते, हें जास्त सांगावयास नलगे.

संस्कृत भाषेची इतर भाषांशीं तुलना.

अस्तु. ह्यासाठींच, अनेक भाषाकोविदांनीं या भूतलावरील अखिल भाषांचें परीक्षण करून, शेवटीं परस्पर तुलनेनें त्यांनीं असें कायमचें निदान ठरविलें आहे कीं, पूर्णत्व आणि अर्थगौरव, या संबंधानें संस्कृत भाषा ग्रीक भाषेपेक्षांही विशेष श्रेष्ठतर असून, ती अत्युच्च पदवीस पात्र आहे. त्याचप्रमाणें, अर्थबाहुल्य व शब्दप्राचुर्य, यांविषयीं जर विचार केला तर, लाटिन् भाषेपेक्षां सुद्धां संस्कृत भाषेची महत्वी निःसंशय जास्त आहे. फार तर काय सांगावें पण, त्या दोहोंपेक्षां देखील संस्कृत भाषा विशेष सुसंस्कृत असून, हिची रचना कांहीं अपूर्व आहे. आणि शब्दमार्दव व अर्थमाधुर्य, यांत तर तिचें वर्चस्व सर्व भाषांवरच आहे. इतकेंच नव्हें, तर ती निःसंशय अनुपम आणि अपूर्व आहे, असेंही त्यांस कबूल करावें लागतें.

संस्कृत भाषेविषयीं पाश्चात्यांचा अभिप्राय.

संस्कृत भाषेच्या वैभवाविषयीं, आम्हीं पौरस्त्यांनीं व त्यांतही विशेषतः भारतीयांनीं विशेष गौरवानें लिहावें, यांत तर कांहींच नवल नाहीं. परंतु, पाश्चात्य देशांतील नामांकित पंडित सुद्धां तिचा वारंवार स्तुतिपाठ गातात, हें विशेष रीतीनें ज्यास्त ध्यानांत ठेवण्यासारखें आहे. यासाठीं, वाचकांच्या अवलोकनार्थ सदरहू पाश्चात्य

पंडितावलींतील कित्येक मुकुटमण्यांचे प्रत्यक्ष उद्गारच येथें थोडक्यांत देतों, म्हणजे त्यांवरून त्यांची सहजींच खात्री होईल.

सुविख्यात इतिहासकार लॉर्ड एल्फिन्स्टन याचें असें म्हणणें आहे कीं, संस्कृत भाषेतील पदलालित्यामुळें तिच्यांतल्या सौष्ठवगुणाचें जणूकाय स्वभावतःच पोषण होतें. इतकेंच नव्हे तर, त्या योगानें तिचें स्वरमार्दव कायम राहून, तिची चारुता स्वयमेव भासते. दुसरे असें कीं, तिच्यांतील ओजस गुणानें शब्दांचें काठिण्य सहजीं नाहींसें होऊन त्यांस आपोआप माधुर्य येतें; आणि संस्कृताच्या उत्कृष्टतेचें मुख्य कारण हेंच असून, अशा तऱ्हेची रचना किंवा खुबी अन्यत्र कोठेंही दृष्टिगोचर होत नाहीं.

एलफिन्स्टनचें मत.

ह्याच भाषेच्या संबंधानें याहीपेक्षां जाडा विद्वान आणि नांवाजलेला इतिहासकार डाक्तर सर विल्यम[2] हण्टर, याचा असा अभिप्राय आहे कीं, आशियाखंडांत अथवा हिंदुस्थानच्या उत्तरेस, आर्यभाषेच्या ज्या शाखा प्रचारांत आहेत, त्यापैकीं संस्कृत हा सर्वांत उत्कृष्ट आणि सुविख्यात होय.

हण्टरचें मत.

---

१ एल्फिन्स्टनकृत हिंदुस्थानचा इतिहास भाग १ ला.

एलफिन्स्टन म्हणतो,

१ " Among many marks of *high polish*, ( of Sanskrit ), is one which must have particularly promoted the *melody* of its versification. "

२ हा म्हणतो, " But Sanskrit was only *the most famous* of several Aryan dialects in the North. "

( Dr. Hunter's Indian Empire. )

आतां, संस्कृतभाषेचें मर्म जाणणारे आणि तिच्याशीं परिचय असणारे असे जे पाश्चात्य पंडित, त्यांचें एतद्विषयक काय मत आहे, तें पाहूं.

भट्ट मोक्षमुलर हे असें म्हणतात कीं, संस्कृत भाषेंत कोणत्याही प्रकारची व्यंगता अथवा कसलेंही गौणत्व नसून, ती खरोखरच विशेष परिपूर्णतेस आलेली आहे. इतकेंच नव्हे तर, तिच्यापासून मानवी जातीचा जो म्हणून इष्ट कार्यभाग होणार आहे, तसा ग्रीक किंवा ल्याटिन, अथवा अन्य कोणत्याही भाषेपासून खचितच होऊं शकणार नाहीं.

मोक्षमुलरचा अभिप्राय.

ह्याच भाषेच्यासंबंधानें अमेरिकेंतील संस्कृतचे प्रोफेसर व्हिट्नें हे असें म्हणतात कीं, संस्कृत भाषेचें अति प्राचीनत्व;

प्रोफेसर व्हिट्नेचें मत.

---

१ "We find Sanskrit as *a perfect literary language*, totally different from Greek and Latin." P. 25.

"Sanskrit Literature, if studied only in the right spirit, is *full of human interests, full of lessons which even Greek could never teach us.*"

( What can India teach us ? 1882. )

२ "Its ( Sanskrit's ) *exceeding age*, its *remarkable conservation of primitive material* and *forms*, its *unequalled transparency of structure*, give it an *indisputable right to the first place* among the *tongues* of the Indo-European family."

( Whiteny's Language and the Study of Language. 1867. P. 4. ).

तिच्यांतील शब्दांच्या आणि धातूंच्या मूळरूपाचें विलक्षण रीतीनें झालेलें संगोपन; त्यामुळें, तिला भाषाशास्त्राच्या संबंधानें आलेलें महत्त्व; तिच्यांतील अलौकिक प्रसाद; आणि तिचें अपूर्व माधुर्य; इत्यादि गुणांनीं ती विशेषच अलंकृत असल्या कारणानें, तिला निःसंशय श्रेष्ठत्व आलें; तसेंच, ह्या अखिल जगांतील एकंदर सर्व भाषांत ती अग्रणी होऊन, तिला अनुपम वर्चस्व प्राप्त झालें. इतकेंच नव्हे तर, ती ह्या भूमंडलावरील प्राचीन व अर्वाचीन भाषात निर्विवादपणें पहिल्या प्रतीची ठरली आहे.

आमच्या संस्कृत भाषेच्या संबंधानें पिक्टेट् याहीपेक्षां विशेष गौरवानें लिहून, तो असें म्हणतो कीं, ही सर्वोत्कृष्टच भाषा आहे.[१]

पिक्टेट्चा अभिप्राय.

[१] While thus augmenting in numbers and in prosperity, that *prolific* race was labouring to create for itself, as a powerful means of development, a language *admirable* by its *richness*, its *force*, its *harmony*, and the *perfection* of its forms; a language in which were *spontaneously reflected all its impressions*, not merely its mild affections and its simple admiration, but also its *nascent aspiration* toward a higher world; a language *abounding in images*, and intuitive ideas, bearing within it in germ all the future affluence, both of the *most sublime poetry* and of the *most profound reflection*. At first one and homogeneous, that language, *already perfected to every* high degree, served as

( पुढें चालू )

सर. विल्यम् जोन्सचा अभिप्राय.

सर विल्यम्[1] जोन्सनें तर संस्कृत भाषेला अगदीं अत्युच्च शिखरावर चढवून, जणूकाय सेवाधर्माला जागरूक होऊन तिच्या चरणकमलांच्या प्रक्षालनार्थच, ग्रीक व लाटिन, इत्यादि नामांकित प्राचीन भाषांस, तिच्या पायांजवळच त्यानें उभे केल्याचें भासमान होतें.

आर्यांचें पाश्चात्यांनीं केलेलें गौरव.

असो. ज्यांनीं आपले आदिविचार वेदनिर्झरांत. प्रकट केले; ज्यांनीं आपलीं आयुष्येंच्या आयुष्यें तत्वविवेचनांत खर्चिलीं; जे धर्माच्या नैसर्गिक आणि पुराणतम स्थितींचे केवळ दर्पणच होऊन राहिले; जे मानवी धर्मशास्त्राचें भाजनच झाले; ज्यांनीं आपलें बुद्धिसामर्थ्य शास्त्रान्वेषण

---

( मागील पृष्ठावरून पुढें चालू. )

common instrument of expression to this primitive people as long as it continued within the *limits of its* native country.

( A. Pictet. Origines Indo-Europeanes. P. P. 1-2 ).

" The most beautiful perhaps of all languages. "
( A. Pictet. )

१ हा विद्वन्मुकुटमणि केवळ प्रांजल बुद्धीनें असें प्रतिपादन करितो कीं,

" It ( Sanskrit ) is of a *wonderful* structure: *more perfect* than the Greek; *more copious* than the Latin; and *more exquisitely refined than either,* "
( Sir William Jones. Asiatic Researches. vol. I. )

करण्यांतच सार्थकीं लाविलें; ज्यानीं अनेक कलासमूह उदयास आणिले; आणि ज्यांनीं आपल्या कल्पकतेनें असंख्य पौराणिककथानकें रचिलीं; त्या आर्यांच्या प्रचंड मानसिक वैभवाचें व त्यांनीं उदयास आणिलेल्या संस्कृत भाषेचें परद्वीपीयांस परम आश्चर्य आणि कौतुक वाटावें, यांत नवल तें कोणतें?

संस्कृतभाषेचें व आर्यविद्येचें पौराणत्व.

ह्या भूतलावरील ज्या ज्या भाषांची माहिती आपणांस उपलब्ध आहे, त्या सर्वांविषयीं शोध करून पाहतांना, आपणांस असें खात्रीपूर्वक कळून येतें कीं, संस्कृत भाषा आणि आर्यविद्या हीं सर्वांत अतिपुराण होत. आणि ही गोष्ट पाश्चात्यपंडितांस देखील कबूल करणें भाग पडतें. एके ठिकाणीं[1] जर्मन प्रोफेसर वेबर हे असें म्हणतात कीं, जेवढ्या भाषांची म्हणून आपणांस लेखी माहिती उपलब्ध आहे, त्या सर्वांत संस्कृत ही पुराणतम आहे; व ती तशी यथान्याय आहे, असें देखील म्हणण्यास हरकत नाहीं.

तद्विषयक पाश्चात्यांचे प्रयत्न.

यासाठीं, हें अति प्राचीन, किंबहुना प्राचीनतम झांकलेलें माणिक, जगापुढें खुलें ठेवून, त्याच्या प्रभेनें आपणांस कांहीं प्रकाश मिळून, फायदा झाला तर पाहवा, म्हणून पाश्चात्य देशांत आणि विशेषतः जर्मनींत सतत परिश्रम सुरू आहेत; आणि ते तसे असणें देखील वाजवी व योग्य आहे. कारण, मनुष्याच्या ऐहिक किंवा पारमार्थिक सुखाच्या संबंधानें दूरवर विचार केला तर, आपणांस

---

1 History of Indian Literature. Weber.

असें खचित दिसून येईल कीं, संस्कृत विद्येचा अभ्यास फारच श्रेयस्कर आहे; व तो केवळ आम्हां भारतीयांसच विशेष महत्वाचा आहे अशी गोष्ट नसून, वास्तविक पाहिलें तर तो अखिल पौरस्त्यांस आणि पाश्चात्यांससुद्धां निःसंशय अत्यवश्य व फलप्रदच आहे.

पूर्णज्ञानास संस्कृताची अपेक्षा.

आतां, ग्रीक आणि लाटिन्, फारसी व आरबी, तुर्की आणि यहुदी, इत्यादि भाषांत जरी ज्ञानभांडारलव मधून मधून दृष्टिगोचर होतो, तरी ह्या भाषांत, कित्येक महत्वाच्या विषयांत पुष्कळच उणीव असून, ती संस्कृतांतील ज्ञान प्रकाशाशिवाय बिलकूल भरून येणारी नाहीं, असें कोणालाही कबूल करावें लागेल. ह्या प्राचीनतम गीर्वाण भाषेंत प्रत्येक शास्त्राचें विवेचन, आणि हरएक महत्वाच्या विषयाचा ऊहापोह, शोधकबुद्धीनें व विचारपूर्वक केलेला असल्यामुळें, पारमार्थिक आणि ऐहिकसुखाच्या संबंधानें ती एक विशाल तरणी व अपूर्व कल्पनातरंगदर्पणच होऊन राहिली आहे.

संस्कृतावलोकनानें भिन्न रुचीच्या लोकांची तृप्ति.

भिन्न रुचिर्हि लोकः, ह्या सुप्रसिद्ध कवीच्या उक्तीप्रमाणें, प्रत्येक प्राणिमात्राला भिन्न भिन्न विषयांची अभिरुचि असणें अगदीं साहजिक आहे. तथापि, ह्या प्रत्येकाची जिज्ञासा व कुतूहल पुरें करण्याइतकें ज्ञानभांडार[1] संस्कृतांत आहे, यांत काडीमात्रही संशय नाहीं. इतकेंच

[1] Max Muller. What can India teach us ?

नव्हे तर, भरतखंडाशिवाय अशा प्रकारचा अमूल्य ज्ञानोदधि प्राचीनकाळच्या पौरस्त्य किंवा पाश्चात्य राष्ट्रांत कोठेंही उपलब्ध असल्याचें दिसत नाहीं. फार तर काय सांगावें, पण, ब्रह्मज्ञानासारख्या अत्यन्त गहन विषयांत, प्रस्तुतकाळीं, म्हणजे सांप्रतच्या सुधारणेच्या व ज्ञानाच्या उच्च शिखराप्रत पोहोंचलेल्या एकोणिसाव्या शतकांत देखील, ह्या जगद्वंद्य आर्यमतेशीं टक्कर मारणारा, निदान त्याची बरोबरी करणारा, किंबहुना त्याच्या जवळ जवळ येणारासुद्धां, या अखिल भूतलावर, एकही देश नाहीं.

अध्यात्म विषयांत हिंदूंचा हातखंडा.

प्राचीन सर्व राष्ट्रांत, ग्रीस देशाला तत्वान्वेषण विषयांत विशेष पुढें सरसावलेला असल्याचें पाश्चात्य लोक मानीत होते. परंतु, त्याला देखील ह्यासंबंधीं खरें ज्ञान झालेलें नसून, परब्रह्म प्रकाशाचा एक लेशमात्रही मिळाला नव्हता; आणि ज्या ज्ञानप्रभेंत आम्हीं सहजीं वावर करीत होतों, ती दीप्ति ग्रीक[१] लोकांच्या स्वप्नींसुद्धां नसे, ही गोष्ट प्रत्यक्ष पाश्चात्यच आपल्या तोंडानें कबूल करतात.

---

१ ह्या बाबतींत लिहितांना, एल्फिन्स्टन् इतिहासकार असें म्हणतो कीं,

" And *in the knowledge of the being and nature of God,* they ( the Hindus ) *were already in possession of a light, which was* but *faintly perceived* even by the *loftiest intellects in the best days of* Athens. "

सदरहू अवतरणांतील इतालिक वर्ण आमचे आहेत. ( ग्रंथकर्ता. )

( पुढें चालू )

इतर देशांच्या मानानें, आम्हां भारतीयांच्या बुद्धितेजाची जी येवढी विलक्षण परिपक्वता आणि अचाट कृति दिसून येते, त्याचें कारण मुख्यत्वेंकरून हेंच कीं, आमच्या अफाट भरतभूमींतल्या वैभवसामग्रीच्या आधिक्यानें, आमच्या मनाला उन्नतीचें जणूकाय जन्मतःच बाळकडू पाजलेलें आहे. तसेंच, तिजवरील नैसर्गिक चमत्कृति आणि अपूर्व वनौषधिप्राचुर्य, यांच्या आलोकनानें सुद्धां आमच्या मानसिक स्फूर्तीचा केवळ उद्रेकच झाला आहे, असेंही ह्मणण्यास हरकत नाहींसें वाटतें. त्याचप्रमाणें, पूर्व बाजूनें वाहणारी ब्रह्मपुत्रानदी, पश्चिम दिशेनें दक्षिणगामी होणारी सिंधुनदी, मध्य प्रदेशाला पुनीत करणारी गंगा व यमुना नदी, आणि दक्षिण दिशेला असणारा प्रचंड तोयनिधि, इत्यादि सर्व, जणूकाय आमच्या

प्रत्येक विद्येत आर्यांचें अग्रेसरत्व असण्याचें कारण.

---

( मागील पृष्ठावरून पुढें चालू. )

अशा प्रकारचें इंग्रजांचें मत असून, जर्मनींतल्या एका सुप्रसिद्ध पंडिताचा ( शोपेनूहॉंयरचा ) तर असा ठाम अभिप्राय आहे कीं, उपनिषदासारखी मानसिक उन्नति करणारी व मनाला शान्तिसुख देणारी अशी दुसरी वस्तूच नाहीं; आणि ती त्रिभुवनीं देखील दुर्मिळ आहे. तो म्हणतो कीं,

" *In the whole world, there is no study so beneficial* and *so elevating, as that of the Upanishads.* It has been the solace of my life.—it will be the solace of my death. "

ह्या अवतरणांतलि इतालिक वर्ण आमचे आहेत. ( ग्रंथकर्ता. )

सृष्टिवैभवाची अनुकूलता.

मानसांबुजाचा विकास करण्यास साहायभूत, किंबहुना कारणीभूतच झालीं आहेत, असें म्हणावें लागतें. इतकेंच नव्हे तर, हिमालयासारख्या गगनचुंबी पर्वतानें देखील आमच्या मानसिक ऐश्वर्याचें सतत पोषण करण्याचा निःसंशय विडाच उचलला असल्याचें भासमान होतें. कारण, ज्या हिमनगाच्या अति विसृत शाखा दूरवर जाऊन, पूर्वपश्चिम सागरांत अन्तर्धान पावतात; ज्याला त्याच्या अत्युच्चत्वामुळें अखिल भूतलाचा मानदंड समजतात; जो कालिदासाच्या स्तुतिपाठास पात्र होऊन, अखिल जगाच्या विस्मयास कारण झाला आहे; ज्याला **पूर्वापरौतोय निधीवगाह्य । स्थितःपृथिव्या इव मानदण्डः ॥** असें उपपद मिळालें आहे; त्या पर्वतश्रेष्ठाच्या अनुपम श्रीचें आमच्या हृत्कमलावर अगदीं वज्रलेप संस्कार झाले आहेत, यांत काडीमात्रही शंका नाहीं. फार तर काय सांगावें, पण, आमच्या मानसिक उन्नतीचें पोषण ज्याच्या कृपेनें एकसारखें होत आहे, त्या हिमाचलाप्रमाणें आमचें राष्ट्रीय मनसुद्धां अत्युच्च गगनांतच जणूकाय अन्तर्धान पावून, आमुष्मिक विषयसुख केवळ क्षणभंगूर मानतें, आणि अध्यात्मविषयांत अगदीं गुंग होतें.

अशा प्रकारच्या अध्यात्मविषयावर संस्कृतांत असंख्य

पौरस्त्यांच्या तुलनेनें पाश्चात्यांची संकुचित दृष्टि.

ग्रंथ आहेत; व त्याचप्रमाणें, इतर शास्त्रविषयक ऊहापोह देखिल बृहत् प्रमाणावरच आहे. त्यामुळें, जी गोष्ट आह्मां भारतीयांस अगदीं क्षुल्लकसारखी वाटते,

तीच पाश्चात्यांच्या नजरेला फारच स्थूल प्रमाणाची भासते. आणि ह्याचें कारण पाहूं गेलें तर, त्यांची केवळ संकुचित दृष्टि-च होय, असें कोणाच्याही लक्षांत आल्यावांचून राहत नाहीं.

त्याचें कारण.

उदाहरणार्थ, जी नदी युरोपखंडांतील लोकांस फारच प्रचंडशी वाटते, ती सिंधु, गंगा, ब्रह्मपुत्रा, ह्या नद्यांपुढें आह्मां भारतीयांस एकाद्या लहानशा ओढ्याप्रमाणेंच भासते. जो पर्वत त्यांजला अत्युच्चसा वाटतो, तो आह्मांला खरोखरच एकाद्या लहानशा डोंगराप्रमाणें दिसतो. आणि ज्या वनश्रींचें ते मोठेंच गौरव करितात व पोंवाडे गातात, ती आम्हांला निव्वळ लहान मुलींच्या भातुकलीच्या खेळांतल्या एकाद्या अत्यल्प वस्तुसारखी भासते. ह्याचें कारण, दोन्ही देशांची भिन्न भिन्न रचना, आणि सृष्टिवैभवांत त्या दोहोंमध्यें जमीन-अस्मानासारखें महदन्तर, हेंच मुख्यत्वेंकरून होय.

तद्विषयक पाश्चात्यांची कबुली.

असो. ही गोष्ट प्रत्यक्ष प्रमाणाची आहे, व त्यामुळें ती पाश्चात्यांस[1] निष्प्रांजलपणें कबूलही करावी लागते.

---

१ सर मॉनियर विल्यम्स् असें म्हणतात कीं,

" In India, *Literature,* like the whole face of Nature, *is on a gigantic scale.* Poetry born amid the majestic scenery of the Himalayas, and fostered in a climate which inflamed the imaginative powers, developed itself with Oriental luxurience, if not always with true sublimity. Although, the Hindus like the Greeks have only two great epic poems—

( पुढें चालू )

असो. अशा प्रकारें, हा अपार संस्कृत महोदधि इतक्या

---

( मागील पृष्ठावरून पुढें चालू. )

the Rámâyan and Mâhà Bhàrat—yet to compare these vast compositions with the Iliad add the Odyssey, is to compare the Indus and the Ganges, rising in the snow of the world's most colossal ranges, swollen by numerous tributaries, spreading into vast shallows, or branching into deep divergent channels, with the streams of Attica or the mountain torrents of Thessaly. There is in fact *an immensity of bulk about this, as about every other Department of* Sanskrit *Literature,* which to a European mind, *accustomed to a more limited horizon,* is *absolutely bewildering.*" ( Indian Wisdom. P, 309 ).

सदर्हू अवतरणांतील इतालिक वर्ण आमचे आहेत. ( ग्रंथकर्ता. )

सदर्हूचा भावार्थ म्हणून इतकाच कीं, भरतखंडांतल्या सृष्टिवैभवाप्रमाणें, येथील ग्रंथसंपत्ति देखील विलक्षण स्थूल प्रमाणावर आहे; व त्याकारणानें, एकंदर भारतीय काव्योदधि सुद्धां, तो संपूर्ण रीतीनें भरलेला असल्यामुळें, जणुकाय डबडबल्या सारखाच दिसतो. ग्रीक लोकांप्रमाणें हिंदूंचीं देखील दोनच महाकाव्यें आहेत. परंतु, त्या दोहोंत आकाशपाताळाचे अंतर असून त्यांची तुलनाही करणें इष्ट नाहीं. कारण, गंगेच्या आणि यमुनेच्या विशाल पात्राची तुलना, एखाद्या लहानशा खेडेगांवांतील क्षुद्र ओढ्याबरोबर केल्यानें, जशी ती उपहास्यतेस पात्र होईल, त्याचप्रमाणें ग्रीक ग्रंथांचें साम्य संस्कृत ग्रंथोदधीशीं केल्यानें, तें विव्हळ उपहासास्पद होणारें आहे. अथवा, इलियड व ऑडिसी या काव्यद्वयाची तुलना रामायण आणि महाभारताशीं केल्यानें, तीही दूषणार्ह होणारी आहे. संस्कृतांतील काव्योदधीप्रमाणें, त्यांतील शास्त्रोदधि देखील फारच गुरुतर प्रमाणानें अपरंपार भरलेला आहे. त्यामुळें, तदवलोकनानें यूरोपस्थांस केवळ भुरळ पडून, ते अगदींच चकित होऊन जातात. कारण, त्यांच्या नेहेमींच्या संकुचित दृष्टीला, अशा प्रकारच्या अवाढव्य देखाव्याची कधीं देखील संवयच झालेली नसते.

संस्कृतभाषा व्यावहारिक आहे किंवा नाहीं, याविषयींची जिज्ञासा.

बृहत् प्रमाणावर रचून ज्यांनीं तो उदयास आणिला, ते पुराणपूर्वज, कारणपरत्वें किंवा नेहमीं, कोणती भाषा बोलत असत? त्यांची नित्य प्रचारांतील भाषा कोणती होती? ते आपापसांतला रोजचा व्यवहार कोणत्या भाषेंत चालवीत? त्यांची व्यावहारिक भाषा संस्कृत होती, किंवा दुसरी एखादी होती? हे सर्व प्रश्न खरोखरीच विशेष महत्वाचे असून, त्यांचा उलगडा करणें तर त्याहीपेक्षां ज्यास्त अगत्याचें आहे. सबब, तत्संबंधीं साधकबाधक गोष्टींचा सर्व बाजूंनीं ऊहापोह करून, एकंदर वर्ज्यावर्ज्य विचारांत काय निष्पन्न होतें तें पाहिलें पाहिजे.

संस्कृत भाषेच्या व्यावहारिकत्वाविषयीं, व पौराणत्वासंबंधीं सप्रमाण विवेचन.

परंतु, ह्यासंबंधाचें तपशिलवार विवेचन आम्हीं भारतीय साम्राज्याच्या नवव्या पुस्तकांत केलें आहे. त्यावरून, ऋग्वेदकालीं[1], रामायणकालीं[2], यास्क ऋषीच्या वेळीं[3], पाणिनीच्या वेळीं[4], आणि पतंजलीपासून[5] तों तहत एकोणिसाव्या शतकाच्या अखेरीपर्यंत[6], संस्कृत ही, निदान थोड्याबहुत प्रमाणानें तरी, केवळ व्यावहारिक भाषाच होती, असें वाचकांच्या लक्षांत सहजीं येऊन, तिच्या पौराणत्वाबद्दल देखील त्यांची खात्री होईल. सबब, प्रस्तुत ग्रंथांत तद्विषयक आणखी ज्यास्त ऊहापोह करण्याचें प्रयोजन दिसत नाहीं.

---

१ पान ९६ ते १२८. २ पान ९७ ते १२२. ३ पान १२२–१२३. ४ पान १२४—२५. ५ पान १२५—२६. ६ पान १२६ ते १२८ पहा.

# भाग ५८ वा.

## वैदिकग्रंथोदधि.

### त्याचें उत्पत्तिस्थान, त्याचा महिमा, व काळ, यांविषयींचा सामान्य विचार.

विषयोपक्रम.

मागील भागांत, संस्कृत भाषेची जगन्मान्यता दाखवून तिचें श्रेष्ठत्व प्रतिष्ठापित केलें; आणि ती प्राचीनकाळीं व्यावहारिक भाषा होती, हेंही आधार देऊन थोडक्यांत सांगितलें. सबब आतां, संस्कृत ग्रंथोदधीकडे वळूं, व त्याचें यथाशक्ति मंथन करून, त्यांतील नवनीत काढूं.

वेदचतुष्टय.

आतां, ही मंथनक्रिया सुरू केल्यावर, आपल्यास प्रथमत: वेदचतुष्टयच दृष्टिगोचर होतें. सबब, अगोदर त्याबद्दल विवेचन करूं, आणि नंतर लौकिकग्रंथनवनीत हातीं घेऊं.

वेदांचें उत्पत्तिस्थान.

अस्तु. हे वेद आमच्या पुराणतम ऋषींनीं आर्यावर्तांत दीर्घकालपर्यंत राहून, त्याठिकाणीं व त्याच्या आसमंतांतील प्रदेशांतच प्रथमत: गाण्याची सुरुवात केली, असें ऋग्वेदांतल्या ठिकठिकाणीं दृष्टिगोचर होत असलेल्या ऋचांवरून चांगलें व्यक्त होतें.

( भा. सा. पु. ९ वें, भाग ९२ वा, पान १३ते९५पहा.)

वेदांचा अगाध महिमा, व त्याचें कारण.

आम्हां सर्व भारतीयांस ह्या वेद शब्दाचे ध्वनित खरो-खरच मंत्राक्षराप्रमाणें भासतें. इतकेंच नव्हे तर, हा वेद शब्द आमच्या कर्णरन्ध्रांत पडल्याबरोबर, आमच्या मनांत तद्विषयक एकदम विलक्षण पूज्यबुद्धि होऊन, त्यासमवेतच अत्यंत आदर व प्रेमभावही उत्पन्न होतो. कारण, वेद हे आमच्या धर्माचें मूळ बीज असून, धर्म, अर्थ, काम, आणि मोक्ष, हे जे चार मुख्य पुरुषार्थ, ते देखील ह्यांजपासूनच प्राप्त होतात, अशी आम्हां भारतीयांतील आबालवृद्धांची पूर्ण व दृढतर श्रद्धा आहे. तसेंच, विधिनिषेधात्मक सकल गोष्टींचे तेच आदिस्थान आहेत; आणि तेच सकल शास्त्रांचें आदिकारणही असून, स्मृतींचें उत्पत्तिस्थान, व अखिल पुराणांचे माहेरघर आहेत, असें आम्ही समजतों; आणि म्हणूनच आम्ही त्यांस बहुमान देतों. फार तर काय सांगावें पण, आमच्यांत जे कोणी नास्तिक व वेदांस पौरुषेय मानणारे आहेत, त्यांस सुद्धां वेदांची धन्यता वाटून, तेही त्यांचे अहर्निशीं गुणानुवादच गातात, हें आश्चर्य होय.

तद्विषयक पाश्चात्यांचें कुतूहल.

अशा प्रकारें, ह्या पुराणतम ग्रंथाचा महिमा आम्हीं भारतीयांनीं आज हजारों वर्षे एकसारखा गावा, यांत तर कांहींच नवल नाहीं. परंतु, आमच्या हिंदु

---

१ विद्यन्ते ज्ञायन्ते लभ्यन्ते वा एभिर्धर्मादि पुरुषार्था इति वेदाः । अशी वेदव्याख्या बह्वृक् प्रातिशाख्य कर्त्यांनीं केली आहे.

धर्माला हंसणारे, आमच्या धर्माची मनमानेल तशी विटंबना करणारे, आम्हांला निव्वळ रानटी समजणारे, आमच्या वेदांस पोरखेळ म्हणणारे, आणि त्यांतील उक्तींस अर्भकांची वाचालता म्हणून बोलणारे जे पाश्चात्य, ते देखील ह्या अतिप्राचीन व भव्य दर्पणाकडे पाहून, अत्यानंदानें आणि सकौतुकाश्चर्य मानाच डोलवितात.

वेदांचें अपौरुषेयत्व.

आम्ही वेदांस परमपूज्य मानतों, ह्याचें आणखीही एक कारण आहे. तें असें कीं, ते अपौरुषेय आहेत. म्हणजे, ते मानवी कृतीचे नसून, ईश्वरप्रणित आहेत; व तसें आम्हीं खरोखरच मनोभावानें समजतों.

तत्संबंधीं सायणाचार्यांचें मत.

ह्या वेदांस अनुलक्षून सायण माधवाचार्य असें म्हणतात कीं,

**प्रत्यक्षेणानु मित्यावा यस्तूपायो न बुध्यते ।**
**एतं विदंति वेदेन तस्मा द्वेदस्यवेदता ॥**

प्रत्यक्षप्रमाणानें अथवा अनुमानानें सुद्धां, ज्या उपायांचें ज्ञान होत नाहीं, तें वेदानीं होतें. आणि म्हणूनच वेदांचें वेदत्व समजावयाचें. इतकेंच नव्हें तर, १ प्रत्यक्ष, २ अनुमान, ३ उपमान, ४ शब्द, ५ अनुपलब्धि, व ६ अर्थापत्ति, अशीं जीं सहा प्रमाणें सांगितलीं आहेत, त्यापैकीं वेद हे शाब्दप्रमाण असून, इष्ट हेतु सिद्धीस नेणारे आणि अनिष्टाचा समूळ नाश करणारे ( हे वेद ) केवळ प्रत्यक्ष दिव्यमंत्रच होत, असेंही म्हणण्यास हरकत नाहीं.

---

१ अपौरुषेयं वाक्यंवेदः ।

" दहूवरून, वेद हे केवळ अमूल्यरत्नभांडारच होत, याविषयीं काडीमात्रही शंका नाहीं. कारण, त्यांच्या आलोकनानें मानवी जातीच्या आद्यस्थितीचें तथ्य व मूळस्वरूप दृग्गोचर होतें. आणि सुमारें नऊ दहा हजार

वेद म्हणजे आर्यसमाजाचें प्राक्कालीन चित्र, व हिंदु धर्मसंरक्षणार्थ अगम्य दुर्ग.

वर्षांमागें आमचे आर्यपूर्वज कशा प्रकारें बोलत चालत होते; त्यांचे मनोव्यापार कशा मासल्याचे होते; त्यांची धर्मरचना आणि सामाजिक स्थिति कशी होती; ती पुढें क्रमकशी बदलत गेली; त्यापासून त्यांच्या बुद्धीवर कोणता व्यापार घडला; प्रत्येक बाबतींत त्यांची किती शोधकबुद्धि होती; ते किती दूरदृष्टी असत; त्यांच्या अश्रान्तश्रमाचा आमच्या हिंदुसमाजावर कसा परिणाम घडून आला; त्यामुळें, आज नऊ दहा हजार वर्षांच्या उलथापालथींत आमचें हिंदुत्व कसें कायम राहिलें; व ह्या वेदधर्माचा अशा प्रकारचा इष्ट परिणाम आम्हांवर घडून आला नसता तर, आमचें हिंदुत्व यामागें केव्हांच, कसें लयास गेलें असतें; यांसंबंधानें तत्वदृष्ट्या विचार करण्याचें उत्तम साधन, आणि तत्संबंधीं क्रमशः लिहिलेला सर्व वृत्तांत; ह्या वेदांतच आढळून येतो. किंबहुना, हा वेददुर्ग त्या दूरदृष्टि ऋषींनीं निव्वळ हिंदुधर्मसंगोपनार्थच रचला होता, असेंही म्हणण्यास हरकत दिसत नाहीं.

आतां, ह्या संबंधानें कोणी कदाचित् असा आक्षेप

आशंका.

आणील कीं, अहो! तुम्ही म्हणतां तें सगळें खरें. पण, तें सर्व केवळ एकदेशीय असून, निव्वळ पारमार्थिक विचाराबद्दलचें आहे. इतकेंच नव्हे तर, ह्या वेदांचा हा जो तुम्ही येवढा मोठा देव्हारा माजविला आहे, त्यापासून ऐहिक, व्यावहारिक, आणि विशेषतः नैतिक हित काडिमातही नसून, ऐतिहासिक दृष्टीनें पाहिलें'व दूरवर विचार केला तर, ह्या तुमच्या "अग्नि-मीळे पुरोहितम्" । इत्यादि अतिप्राचीन किंबहुना प्राचीनतम वैदिकऋचांपासून अणुमात्र देखील फायदा झाला नाहीं, किंवा होत नाहीं, अथवा यापुढेंही होणार नाहीं!

तिचें निरसन.

पण, प्रियवाचकहो, अशीच जर खरोखरीच कोणाची कल्पना असेल, तर ती निःसंशय भ्रामक आहे, असें म्हटल्यावांचून माझ्याच्यानें राहवत नाहीं. कारण, एकतर ह्या वेदांपासून ऐहिक, व्यावहारिक, आणि नैतिकज्ञान खचितच होणारें आहे. आणि

वेदेतिहासाची अमूल्य खाण.

दुसरें असें कीं, प्राचीनतम इतिहासाची वेद हे अमूल्यखाण किंवा विशालतम दर्पणच आहेत, असेंही म्हटलें असतां चालेल. फारतर काय सांगावें, पण, प्राचीनतम इतिहासाचें, पुराण आचारविचारांचें, व लोकोत्तर शिक्षणपद्धतीचें, अशा प्रकारें सुरेख रेखलेलें आणि अगदीं हुबेहुब चित्र, ह्या भूमंडलावर कोठेंही, कोणत्याही देशांत, व कोणत्याही राष्ट्रांत, खचितच सांपडावयाचें नाहीं.

केवळ, आम्हां भारतीयांसच ह्या वेदरूपी इतिहासाचा

तिजपासून अखिल जगास खरा उपयोग, व त्याचें कल्याण.

अमूल्य उपयोग आहे, असें नाहीं. तर, जितक्या अंशानें तो आम्हांस उपयुक्त आहे, तितक्याच अंशानें अखिल जगासही त्याचा अवर्णनीय उपयोग झाला आहे, व अजूनही होत आहे. कारण, सर्व जगांत वेद हेच अतिपुराण, किंबहुना पुराणतमलेख असल्यामुळें, मानवी-कुटुंबाच्या मूलस्थितींतील अथपासून इतिपर्यंतची समग्र माहिती उपलब्ध होण्यास, वेदांव्यतिरिक्त अन्य कोणतेंही साधन नाहीं, अथवा दुसरा कोणताही मार्ग नाहीं. अर्थात्, हें उघडच आहे कीं, सर्वांचें आदिमूळ वेदच असल्या कारणानें, प्रथमावस्थेंतील मनुष्यमात्राचे मनोधर्म यावरूनच कळून येतात. त्यांचे आचारविचार यावरूनच समजतात. त्यांचे परस्पर व्यवहार ह्यावरूनच दृष्टिगोचर होतात. त्यांच्या परिशीलनाचें ज्ञान ह्यावरूनच होतें. आणि आज सुमारें दहाहजार वर्षांपलीकडील कालांत ते कसे बोलत होते, कोणत्या रीतीनें वर्तत होते, व कशाप्रकारें वागत होते, इत्यादि गोष्टींचें केवळ प्रत्यक्ष चित्र वेदावलोकनाचेंच आपल्या डोळ्यांपुढें उभें राहून, त्यांचा साक्षात्कारच झाल्याचें भासतें.[१]

शिवाय, ह्या वेदांवरून केवळ ऐतिहासिक गोष्टींचेंच ज्ञान होतें असें नाहीं. तर, त्यांपासून नाना प्रकारच्या भूगोलविषयक गोष्टीही कळून येतात. कारण, कांहीं ऋचांत

१ ह्या सर्व गोष्टींची सत्यता पाश्चात्यांच्याही अनुभवास आलेली आहे. ( मोक्षमुलरचे ग्रंथ १ पुराण संस्कृतविद्या, व २ भारतवर्ष काय शिकविणार, हे पहावे ).

कूभा (काबूलनदी), गोमल, कुरम, सतलज, इरावती (रावी), चीनाब (चंद्रभागा), झेलम, विपाशा (बियाज), इत्यादि नद्यांचा उल्लेख असून, कित्येकांत गंगा, यमुना, व सरस्वती, यांचें वर्णन आहे; आणि कांहीं ठिकाणीं तर अत्युच्च हिमालय, व त्याच्या पूर्वपश्चिम टोकांजवळील समुद्रप्रदेश, यांचें कथन आहे. त्यावरून, आमच्या पुराणआर्यपूर्वजांनीं कोणत्या स्थलीं हे वेदमंत्र गाइले, व त्यांचें कसकसें स्थलांतर होत गेलें, याविषयींचें दिग्दर्शन होतें.

वेदांपासून दुसरे फायदे. म्हणजे त्यांपासून होत असलेलें भूविषयक ज्ञान इत्यादि.

तसेंच, कित्येक मंत्रांत आकाशांतल्या नक्षत्रांचें वर्णन असून कांहींत त्यांचें विवेचन पर्यायानें अथवा रूपकानें केलें आहे. त्यावरून, आमच्या पुराणपूर्वजांस नक्षत्रावलोकनाची विशेष अभिरुचि होती, असें सहजीं व्यक्त होतें. इतकेंच नव्हे तर, ज्योतिःशास्त्रांत त्यांचें बरेंच अध्ययन झालें असून, त्या कामांत त्यांचें पाऊल पुष्कळच पुढें पडलेलें असावें, असें अनुमान करण्यास सबळ कारण मिळतें.

वेदांतलें ज्योतिःशास्त्र.

ह्याच नाक्षत्रिक स्थितीवरून, वेदांचा खरा अथवा आनुमानिक काल काढण्यास विशेष बळकट आधार आणि सप्रमाण कारण सांपडतें. ह्यासंबंधानें, रा० रा० बाळ गंगाधर टिळक, बी. ए; एल्. एल्. बी. ह्यांनीं मृगशीर्ष (ओरियन्)[1] नांवाचें एक पुस्तक छापिलें आहे; व त्यांत त्यांनीं नाक्षत्रिक प्रमाणांवरून वेदाचा काल सिद्ध केला आहे.

---

१ ह्या पुस्तकांतील शोध आणि कल्पकता पाश्चात्य विद्वानांस देखील मान्य आहे. ह्याखेरीज ग्रंथकर्त्याचें भाषाशास्त्र भाग ३।७ पहावे.

त्यासंबंधानें वेदकालीन ऋषींचें विशेष शोध.

असो. वेदावलोकनानें आम्हांस आणखी एक विशेष महत्वाची गोष्ट कळून येते. ती ही कीं, आमच्या वेदकालीन पुराणतम ऋषींनीं ज्योतिःशास्त्रांत निःसंशय पुष्कळच परिश्रम केले होते; आणि हे त्यांच्या व्यवहारावरूनच चांगलें दिसतें. कारण, एका वर्षाचे बारा महिने असल्याचें त्यांजला खचित माहीत होते. इतकेंच नव्हे तर, चान्द्रमान व सौरमान यांचा मेळ घालण्यासाठीं, तीन वर्षांनीं ज्या एका अधिक मासाची योजना करणें अवश्यकतेचें असतें, ती गोष्ट देखील त्यांच्या लक्षांत पूर्णपणें येऊन चुकली होती, असें अगदीं निर्विवाद ठरतें.

अधिकमास.

आतां, हें आमचें म्हणणें कित्येकांस स्तुतिविषयक दिसेल; किंवा कदाचित् कोणांस अतिशयोक्तीचेंही भासेल. परंतु, तशी कल्पना करण्यास तिलप्रायही जागाच नाहीं. कारण, आमच्या प्रतिपादनाच्या पुष्टीकरणार्थ, प्रत्यक्ष ऋग्वेदच साक्ष देतील.

एका ऋचेंत असें म्हटलें आहे कीं,

**वेद मासो धृतव्रतो द्वादश प्रजावतः ।**
**वेदा य उपजायते ॥ ८ ॥**

( अ० १. अ० २. व० १७. मं० १. अ० ६. सू० २५ ).

**भावार्थः**—ज्यानें ( वरुणानें ) आपला पगडा सर्वत्र बसविला आहे. जो बारा महिन्यांस जाणतो. जो त्यांत उत्पन्न होणाऱ्या प्राण्यांसही जाणतो. आणि ज्याला ( बारा महिन्याजवळ उत्पन्न होणारा तेरावा ) अधिक महिनासुद्धां

माहीत आहे, तो आमचें आयुष्य वाढवो. ( **प्रण आयूंषि तारिषत् ॥ १२ ॥** )

पौरस्त्य आणि पाश्चात्य ज्ञानाची तुलना.

आतां आमचें हें **पौरस्त्य** ज्ञान, अथवा अति प्राचीन भारतीय **आर्यांचें** वैदग्ध्य आणि **पाश्चात्य** ज्ञानलव, किंवा आपणांस विशेष सुधारलेले म्हणून म्हणविणाऱ्या नूतन रोमन् लोकांचें नैपुण्य, यांची क्षणभर तुलना करूं, व त्या दोहोंत कोणाचें श्रेष्ठत्व अगर जड पारडें आहे, तें पाहूं

त्यांत हिंदूंची सरशी.

ज्या **हिंदूंस पाश्चात्यांनीं** ( मग तें मत्सरबुद्धीनें[1] म्हणा, अगर द्वेषभावानें म्हणा; किंवा ह्यांस[2] त्यांचें[3] नितान्त पौराणत्व माहीत नसल्यामुळें म्हणा; अथवा आपणं[4] उदरांत देखील नव्हतो अशा वेळीं ते[5] उन्नतावस्थेच्या उच्च शिखराप्रत पोहोंचले होते, वगैरे गोष्टींचें खरोखरच अज्ञान असल्या कारणानें म्हणा; ) केवळ रानटी समजून अगदीं पशुतुल्य मानिलें[6] आहे, तेच हिंदू आज दहाहजार वर्षांपलीकडील कालांतही, आपल्या

१ एतद्विषयक तपशिलवार विवेचन **भारतीय साम्राज्य पूर्वार्ध** पु. दुसरें, पान १०९ ते ११४, यांजवर केलें आहे.

२ पाश्चात्यांस. ३ भारतीयांचें ( हिंदूंचें ).

४ पाश्चात्य. ५ हिंदू.

६ हल्लीं ह्या समजुतींत थोडा फेरबदल झाला आहे. तथापि, पाश्चात्यांचा गर्व आणि दर्प, इत्यादि तिळभरही कमी झाल्याचें दिसत नाहीं. **भारतीय** साम्राज्य पुस्तक आठवें, पान १६ ते २१ पहा. **भाषाशास्त्र** पान २१२ ते २३३.

अतुल शोधकबुद्धीनें एका वर्षाचे बारा महिने कल्पून, चान्द्रमान आणि सौरमान यांचा मेळ राखण्यासाठीं, तीन वर्षांनीं एक अधिकमासही समजत होते. परंतु, ह्याच-संबंधानें, सुमारें आठ हजार वर्षांनंतर (म्हणजे आमच्या पूर्वजांनीं प्रथमतः कल्पना काढून, आणि कालपरिगण-नेची मर्यादा दाखवून, प्रत्यक्ष कित्ता घालून दिल्यावर देखील,) जर पाश्चात्यांची स्थिति पाहिली, तर असें दिसून येतें कीं, ते (रोमन् लोक) एका वर्षाचे फक्त दहा महिनेच गणीत आणि निर्वाह करीत. तेव्हां, अशा-प्रकारें, पौरस्त्य व पाश्चात्य यांच्या उन्नतावस्थेंत इतकें जमीन अस्मानाचें महदंतर असूनही, शेवटीं आम्ही भारतीय (हिंदू) च कायते रानटी झालों! सबब, ह्यासंबंधानें यथार्थ न्याय करण्याचें काम मी वाचकांवरच सोंपतों.

अधिकमासानें चान्द्र व सौरमानाचा मेळ.

असो. सदरीं लिहिलेला मंत्र रचला, तेव्हां आम्हां हिंदू-लोकांत वर्षाचे बारा महिने मानीत. इतकेंच नव्हें तर, चान्द्र-मान व सौरमान यांचा परस्पर मेळ बसावा एतदर्थ, एक अधिक मास घालून कालव्य-वस्था करण्याची सुरेख युक्ति ह्या मंत्राच्याही पूर्वी पुष्कळ कालपर्यंत आम्हांस माहीत होती, हें चांगलें व्यक्त होतें.

पौरस्त्य व पाश्चात्य ज्ञानाच्या संबधानें रा. ब. पंडितांचा अभिप्राय.

या बाबतींत, कैलासवासी रा. ब. शंकर पांडुरंग पंडित हे असें लिहितात कीं, “सर्व पृथिवीवर सुधारणुकेविषयीं नामांकित असे जे रोमन् लोक, त्यांजमध्यें

ख्रिस्ती शकाच्या पूर्वी साडेचार शतकेंपर्यंत वर्षाचे महिने दहाच होते, आणि अधिक मास घालून चान्द्रमानाचा आणि सौरमानाचा मेळ घालावा हें ज्ञान युरोपियन लोकांमध्यें ख्रिस्ती शकाच्या पूर्वी पांच शतकेंपर्यंत नव्हतें. ** यावरून, आमच्या आर्य लोकांचें ज्ञान किती पुरातन आहे, तें दिसून येतें. "

वेदांतली कृषिकर्म विद्या व शस्त्रास्त्रज्ञान.

कांहीं ऋचांत शेतकीसंबंधीं उल्लेख आहे. त्यावरून, आमचे आर्यपूर्वज कृषिकर्मशास्त्रांत देखील निपुण होते, असें दिसतें. त्याचप्रमाणें, कित्येक स्थळीं युद्धसंग्रामाचें वर्णन आणि शस्त्रास्त्राचें विवेचन आहे. त्यावरून, ते त्या त्या कामांत चांगले माहीतगार व कुशल होते, असें मानण्यास बळवत्तर आधार सांपडतो.

वेदकालीन दळणवळण.

कित्येक मंत्रांत, कांहीं लोकांच्या नांवाचें दिग्दर्शन आहे. त्यावरून त्या त्या लोकांबरोबर त्यांचा व्यवहार व संबंध असे, असें उघड होतें; आणि त्यांचें एकंदर दळणवळणही कळून येतें.

पुनर्जन्म, व पुढील यात्रेसंबंधीं उदात्त विचार.

कांहीं स्थलीं मरणोत्तर क्रियांचा उल्लेख असून, त्यांत आत्म्याच्या स्वस्तिक्षेमार्थ शेवटली प्रार्थना केली आहे. त्यावरून, पुनर्जन्माविषयीं आमची पुरातन काळापासूनच श्रद्धा असल्याचें चांगल्या प्रकारें व्यक्त होतें. ह्या सर्व ऋचा खरोखरीच मनन करण्यासारख्या आहेत.

इतकेंच नव्हें तर, त्यावरून आमच्या आर्यपूर्वजांचे उदात्त विचार, त्यांचें प्रेमळ अंतःकरण, व षड्रिपूंच्या जयाविषयीं त्यांची उत्कट इच्छा, यांसंबंधानें आपलें सहजीं अनुमान होतें.

सदर्हू ऋचांपैकीं कांहींचा असा भावार्थ आहे कीं, "हे आत्मन्, ज्या मार्गानें आपले उदार पूर्वज गेले, त्याचेंच तूं शुद्धान्तःकरणानें अवलंबन कर. इकडील यात्रा संपल्यावर, तूं आपल्या पूर्वजांस आणि यमधर्मराजास जाऊन भेट. आपलें वैकल्य सोडून परधामाप्रत प्राप्त हो. त्या ठिकाणीं गेल्यावर त्या ज्योतींत तुझीही ज्योत मिळेल; व नंतर तूं कैवल्य रूपाप्रत पावशील. ज्या ठिकाणीं अमृताच्या नद्या वाहतात, अशा जागीं तूं आनंदानें रहा. एक समयावच्छेदेंकरून, व निरंतर ध्यानस्थ राहून, ज्यांनीं षड्रिपूंचा अजिबात पाडाव केला, आणि त्यांस अखेर आपले दासही बनविले, त्यांचा तुला सदैव समागम होऊं दे; व ज्यांनीं परोपकारासाठीं अहर्निशीं कष्ट करून लोककल्याणार्थ आमलीं हाडेंही झिजविलीं, आणि शेवटीं पंचतत्वाप्रत पावले, त्यांच्या सन्निध तूं सदैव सत्समागमांत वास कर."

त्यांचा मासला.

आमच्या पूर्वजांचे हे उद्गार, व तेही दहा हजार वर्षांपलीकडील काळांत काढलेले, किती गंभीर आणि उदात्त आहेत, याची कल्पना करण्याचें काम मी वांचकाकडेसच सोंपतों.

असो. ऋग्वेदांत कित्येक ठिकाणीं विवाह विधीचें दि-

ऋग्वेदांतला विवाह-विधी.

गदर्शन आहे. त्यावरून त्यावेळच्या चालीरीती दिसून येतात.

काहीं काहीं ऋचांत, आमच्या पूर्वजांनीं देवांपाशीं

ऋग्वेद कालांतल्या गरजा.

प्रार्थना करून कित्येक मागण्या आणि वरदान मागितलेलें दृष्टीस पडतें. त्यावरून त्यांजला तितक्या गोष्टींचीच न्यूनता किंवा आवश्यकता होती, असें सहजीं अनुमान होतें.

कित्येक ठिकाणीं धान्य, गाई, घोडे, रथ, मंदिरें, नगरें,

वेदकालीन सौख्य-स्थिति.

वस्त्रें, भूषणें, सोनें, रुपें, वगैरे धातू, आणि व्याजबट्टा, इत्यादींचें वर्णन आहे. त्यावरून, त्या वेळच्या स्थितीचें चांगलें दिग्दर्शन होतें. इतकेंच नव्हे तर, आमच्या पुराणतम आर्यांची एकंदर स्थिति फारच सुधारलेली होती; आणि मानवी सुखोपभोगाची बहुतेक सामग्री त्यांनीं तितक्या पुरातन काळीं देखील अगदीं सज्ज केली होती, असेंही म्हणणें भाग येतें.

ऋग्वेदाच्या पहिल्या मंडळांत तुग्र राजाचें एक कथा-

वेदकालीन कथानक, व समुद्रपर्यटनाची चाल.

नक सांगितलें आहे. त्यावरून, असें चांगलें व्यक्त होतें कीं, त्या वेळीं समुद्रांतून पर्यटन करण्याची रूढी होती. आणि बलवान राजे दुसऱ्या भूपतीवर स्वारी करण्यासाठीं जलमार्गानें जाऊन, प्रचंड आरमारही सज्ज करीत.

शिवाय, ह्याच कथाभागावरून, आणि त्यांत योज-

वेदकालांत विमानांचें ज्ञान.

लेल्या शब्दांवरून, आणखी असेंही स्पष्ट दिसतें कीं, आमच्या पुराण वेदकालीन ऋषींस विमानें उडविण्याची व त्यांतून बसून जाण्याची कला थोडीबहुत तरी खचितच माहीत होती. कारण; त्यांत अंतरिक्षांतून चालणाऱ्या जाहजांचें वर्णन आहे.

वेदकालीन अध्यात्मिकज्ञान, व तत्संबंधीं आर्यांचें सर्व जगावर अध्यापकत्व.

ऋग्वेदावरून आणखी एक विशेष महत्वाची गोष्ट व्यक्त होते. ती ही कीं, आम्ही जरी विश्वदेवतावादी आहोंत, आणि अनेक ( म्हणजे तेहेतीस कोटि ) देवतांची पूजा करणारे असल्याविषयीं जरी आमची जगभर प्रसिद्धी आहे, तरी देखील, अखिल विश्वाचें आदिकारण एकच असून, तेंच सर्वांचें नियामक आहे, असें (पंचमहाभूतांचें आणि भूस्वराकाशांतील तेहेतीस कोटि देवतांचें पूजन करणारे) आमचेच आर्यपूर्वज निःसंशय समजत असत. इतकेंच नव्हे तर, उपनिषदांत अध्यात्मविद्याविषयक ज्ञानाचें ज्या प्रकारचें प्रतिपादन व ज्या तऱ्हेचा ऊहापोह केला आहे, तसा किंवा त्याच्या पासंगास लागणारा एकही ग्रंथ ह्या भूमंडळावरील कोणत्या देखील राष्ट्रांत अजूनपर्यंत झाला नाहीं. ह्यावरून, त्यांचें अध्यात्मिकज्ञान अपूर्व होतें. त्यांची आकलनशक्ति अतुल होती. आणि त्यांचा बुद्धिप्रभाव प्रचंड व अनुपम होता, असें सहजीं व्यक्त होतें. कारण, प्राचीन किंवा अर्वाचीन, आणि पौरस्त्य अथवा पाश्चात्य

राष्ट्रें देखील त्या पुराणतम वेदपीठासमोर सविनय वांकून साष्टांग प्रणिपात करतात; आणि तदुद्भूत अमूल्य लाभांचे अहर्निशीं गुणानुवादच गातात. तेव्हां, अशा प्रकारच्या अद्वितीय रत्नभांडारासंबंधीं आम्ही भलतीच शंका घेऊन, निष्कारण कुतर्क काढल्यानें आमचें अज्ञान मात्र दिसणार आहे, हें विसरतां कामा नये.

येथपर्यंत, वेदांचें महत्व आणि त्यांची उपयुक्तता, यां-संबंधानें साधारण दिग्दर्शन झालें. सबब, आतां वेदांच्या कालाविषयीं थोडासा विचार करूं, व ते किती पुराण आहेत, हें पाहूं.

वेदकाल.

सर्व वेदांत, किंबहुना अखिल जगाच्या इतिहासांत, ऋग्वेदच काय तें अतिपुराण विद्यालंकार होत. हे अतिप्राचीन असल्याविषयीं अनेक प्रमाणांनीं सिद्ध होण्यासारखें आहे. परंतु, त्या सर्वांत, मुख्यत्वेंकरून चार प्रमाणेंच कायतीं विशेष महत्वाचीं दिसतात. १ नाक्षत्रिक प्रमाण. २ बाह्य प्रमाण. ३ भूगोलशास्त्रविषयक प्रमाण. आणि ४ आभ्यन्तर प्रमाण. सबब, ह्याविषयींचा आतां विचार करूं.

ते शाबीत करण्याचीं चार प्रमाणें.

१ नाक्षत्रिक प्रमाणांवरून, वेद निर्माणकालाला आज सुमारें पंधरा हजार वर्षांवर होऊन गेलीं असावीं, असें अनुमान करण्यास बलवत्तर साधन मिळतें.

नाक्षत्रिक प्रमाण, आणि वेदांगज्योतिषावरून वेदाचा काळ.

---

१ रा. रा. टिळककृत "वेदांचें प्राचीनत्व" नांवाचें पुस्तक पहा. (पान ५).

कारण, वेदांग ज्योतिष हें वेदांच्या उत्तर कालांतील असून, ह्याची ( म्हणजे वेदांग ज्योतिषाची ) पूर्व मर्यादा इ. स. पूर्वी पंधराशें वर्षें होय.[1] आणि ह्याच्याही पलीकडील काळांत अथर्ववेद, व त्याच्या अगोदर सामवेद, आणि त्याच्याही पूर्वी यजुर्वेद, व ह्या सर्वांच्या आधीं ऋग्वेद झालेले असल्यामुळें, त्यांच्या निर्मितकालाला खरोखरीच हजारों वर्षें लोटलीं असावीं, यांत संशय नाहीं.

भारतीयांचें नक्षत्रज्ञान, व त्यावरून वेदांचा काळ.

आतां, आम्हां भारतीयांस नक्षत्रज्ञान केव्हां झालें, याविषयींचा थोडा विचार केला म्हणजे असें दिसून येतें कीं, तें आम्हांस फारच प्राचीनकाळीं झालें असून, तेव्हांपासूनच आम्हांला नक्षत्रावलोकनाची गोडी लागली, आणि त्यांचे वारंवार वेध घेण्याविषयींची जिज्ञासा झाली. या कामांत आम्ही कोणाचेंही ऋणी नसून, बाबिलोनियन, आसीरियन, मिश्री ( इजिप्शियन, ), ग्रीक, चाल्डियन्, रोमन, आरब, चिनी, इत्यादि राष्ट्रांनींच आमचें अनुकरण करून गुरुत्व स्वीकारलें होतें. आणि ही गोष्ट पाश्चात्यांस देखील कबूल करावी लागते.[2]

---

१ वेदांग ज्योतिषाची उत्तर मर्यादा इ. स. पूर्वी पांचशें वर्षे असून, तीही येथेंच सांगणें इष्ट वाटल्यावरून देत आहे.

२ रेव्हरंड बर्जेस म्हणतोः—' मला असें वाटतें कीं, ज्योतिषगणित, आणि जातक, यांसंबंधानें व्हिट्नें हा हिंदूस अन्यायानें मान देत नाहीं; आणि ग्रीक लोकांस तो या कामीं वाजवीपेक्षां फाजील चढवितो. ग्रीक लोकांनीं, ह्या शास्त्रांत, नंतर विशेष सुधा-

( पुढें चालू )

आम्ही कोणाचे ऋणी नसल्याबद्दल, साधक बाधक

( मागील पृष्ठावरून पुढें चालू. )

रणा केली हें खरें. तथापि, मुळांतील तत्वें, तद्विषयक कल्पकता, व तिची अभिवृद्धि, इत्यादि संबंधीं खरें श्रेय हिंदूंसच मिळालें पाहिजे. आणि त्यांजपासूनच तें शास्त्र ग्रीक लोकांनीं घेतलें, असें मला खात्रीनें वाटतें. इतकेंच नव्हे तर, कल्पकता व शोधकबुद्धि, यांसंबंधाचा बहुमान मिळण्याचा हक्क एकट्या हिंदूंचाच आहे, असें म्हणण्यास जितके आधार आहेत, तितके मजबूत आधार दुसऱ्या कोणत्याही राष्ट्राच्या संबंधानें नाहींत.'

हुंबोल्ट म्हणतोः—' इतर प्रमाणें पाहिलीं असतां, प्रतिवृत्ताचें प्रमेय हिंदूंपासूनच ग्रीक लोकांनीं घेतलें, असें म्हणण्यास ज्यास्त आधार आहे. तसेंच, जातकाची कल्पना आणि सुधारणा, याविषयींच्याही कल्पकतेच्या बहुमानासंबंधीं विवाद फक्त हिंदू व चाल्डियन् यांजमध्येंच आहे. तथापि, त्याबद्दल साधक बाधक कारणांचा विचार केला तर, हा बहुमान हिंदूंसच मिळाला पाहिजे, अशाविषयींचींच अनुकूल प्रमाणें पुष्कळ आहेत.'

विल्सन म्हणतोः—' ग्रहांचीं नांवें वारास दिल्याबद्दलचा मान जितक्या अंशानें इतरांस आहे, तितकाच हिंदूंसही आहे. ज्योतिःशास्त्राचें मूळ कल्पक आपण आहों, असें आरब लोक म्हणत नसून, हिंदुज्योतिःशास्त्राचेंच वर्चस्व आरब लोकांवर असल्याचें अनेक प्रमाणांवरून दिसून येतें. ह्या ज्योतिःशास्त्रांत, ग्रीक लोकांनीं देखील हिंदूंचेंच शिष्यत्व पतकरलें होतें.

कोलब्रूक म्हणतोः—' तत्वशास्त्रें, धर्म, आणि जन्मांतरमत, इत्यादि संबंधीं विचार केला तर, या कामांत हिंदू हे कोणाचेही शिष्ये नसून, ते केवळ शिक्षकच होते, असें मला वाटतें.'

डा. थीबो म्हणतोः—' आणि ह्या दृष्टीनेंच पाहिलें तर मूळकल्पकतेचा मान सूर्यसिद्धान्तकारासच दिला पाहिजे. '

आमचें ऋण.

कारणांचा ऊहापोह ह्याच्या अगोदरच पूर्वार्धांत[1] झाला आहे. सबब, तद्विषयक येथें आणखी ज्यास्त तपशिलानें विवेचन करण्याचें कांहींएक प्रयोजन नाहीं. मात्र, या ठिकाणीं इतकें सांगणें विशेष अवश्यकतेचें आहे कीं, आमचें नक्षत्रावलोकन व तद्विषयक ज्ञान हें फार प्राचीन, किंबहुना प्राक्कालीन सर्व राष्ट्रांच्याही अगोदरचें होतें. आणि तें इ. स. पूर्वी पांच हजार वर्षांपलीकडील कालांतलें असावें, असें शास्त्रज्ञ व शोधक यांचें मत आहे. त्यावरून ऋग्वेद हे पंधरा हजार वर्षांपलीकडील काळांतले असावेत, असें मानण्यास बलवत्तर कारण मिळतें.

ह्याखेरीज आणखीही एक गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी आहे; व ती कृत्तिकादि गणनाकालाच्या संबंधाची होय.

कृत्तिकादि गणनेवरून वेदाचा काळ.

आतां, कृत्तिकांचें पूर्व दिशेस उगवणें, हेंच कृत्तिकादि गणनेचें कारण असून, ह्या गोष्टीचा काळ इ. स. पूर्वी सुमारें तीन हजार वर्षे असल्याचें, आधुनिक पौरस्त्य-शोधक सिद्धवत् मानतात. तैत्तिरीय संहितेंत आणि शतपथ ब्राह्मणांत, कृत्तिकादि नक्षत्रांचा उल्लेख आहे. सबब, त्यांचा ( म्हणजे यजुर्वेदांचा ) काळ शें दोनशें वर्षांच्या छाटयानें, इ. स. पूर्वी तीन हजार वर्षांतला असावा, असें म्हणण्यास हरकत नाहीं. आणि ज्यापक्षीं, ऋग्वेदसंहिता ही यजुर्वेदापेक्षां देखील पुष्कळ प्राचीन

---

१ पुस्तक दुसरें. भाग १३ वा. पान ८७ ते ११५ पहा.

आहे, व तींत कृत्तिकादि नक्षत्रें नाहींत, त्यापेक्षां ऋक्-संहिता ही, इ. स. पूर्वी तीन हजार वर्षांपलीकडील कालांतली असल्याचें निर्विवाद सिद्ध होतें. म्हणजे, आज सुमारें पांच हजार वर्षांपलीकडील कालांत, ऋग्वेदांतल्या ऋचा आमच्या पूर्वजांनीं गाइल्या असल्याचें उघड दिसतें.

आतां, नवीन भारतीयांच्या[1] शास्त्रीय शोधांवरून तर,

वेदऋचांवरून वेदांचा काळ.

ऋग्वेदाच्या कित्येक ऋचा इसवी सनापूर्वींही सहा हजार वर्षांपलीकडील कालांतें[2] गाइल्या असल्याचें सिद्ध होतें. तथापि, कांहीं पाश्चात्यांचा असा मिथ्यावाद आहे कीं, हें नाक्षत्रिक प्रमाण खात्रीपूर्वक नाहीं. परंतु, हें त्यांचें म्हणणें दुराग्रहाचें[3] आहे, असें लक्ष्यपूर्वक तपास करणारास वाटल्यावांचून खचितच राहणार नाहीं.

---

१ नामदार बाळ गंगाधर टिळककृत मृगशीर्ष ( Orion ) नांवाचें पुस्तक पहा.

२ रा. रा. शंकर बाळकृष्ण दीक्षितकृत भारतीय ज्योतिःशास्त्र पहा. ( शके १८९८. पान १३५ ).

३ कारण, आम्हां भारतीयांच्या पुराण ग्रंथोदधींचा काल जितका म्हणून अर्वाचीन करवेल तितका करण्याकडे, कांहीं पाश्चात्यांची बहुतकरून नैसर्गिकच प्रवृत्ति असल्याचें दिसतें. आणि ह्या गोष्टीचा अनुभव डाक्तर रामकृष्ण गोपाळ भांडारकर यांसही आल्यामुळें, त्यांनीं देखील त्याबद्दलचा स्पष्टच उल्लेख केला आहे. महाभारताच्या कालासंबंधानें एक लेख लिहित असतांना, डाक्तर मजकूरनीं असें म्हटलें आहे कीं, ' युरोपस्थ पंडित आणि प्राक्कालीन

( पुढें चालू )

ऋग्वेदांतील कित्येक ऋचांवरून, रा. रा. नामदार बाळ गंगाधर टिळक यांनीं असें सिद्ध केलें आहे कीं, ह्या ऋचा गाइल्या तेंव्हां मृगशीर्षांत वसंत-संपात होता; व ही गोष्ट मृगशीर्षाच्या आग्रहायणी या नांवावरूनच शाबीत होते, असें ज्योतिःशास्त्रज्ञांचें म्हणणें

आग्रहायणीवरून वेदाचा काल.

---

( मागील पृष्ठावरून पुढें चालू. )

विषयकोविद्, हे हिंदूंचें सर्वच कांहीं अर्वाचीनकालांत आणू पाहतात.' ( महाभारतकाल ).

ह्याच अनुभव कैलासवासी नामदार तेलंग यांना सुद्धां आला असल्याचें व्यक्त होतें. आणि म्हणूनच त्यांनीं अगदीं निष्प्रांजळपणें असे उद्गार काढिले आहेत कीं, 'हिंदूंचें प्राक्कालीन व पुराण संस्कृतभांडार हें आधुनिक कालांत जितकें म्हणून आणवेल तितकें आणण्याविषयीं, युरोपांत सर्वत्र प्रवृत्ति सुरू आहे, व ती ज्यारीनें अमलांत येत आहे. आणि त्यामुळें, संस्कृतग्रंथ संपत्तीस होतां होईल तों अर्वाचीनत्व देण्याकडेच तद्देशीयांचा सहजीं कल होत चालला आहे. परंतु, हा प्रचार शास्त्रीय पद्धतीस अनुसरून नाहीं.'

( तेलंग कृत भगवद्गीता ).

अशाच मासल्याचा अनुभव बहुतेक सर्वांचाच आहे. परंतु विस्तारभयास्तव ह्या सर्वांचे उद्गार येथें प्रकट न करतां, फक्त आणखी एका शोधक गृहस्थाच्या लेखांतील अवतरण देतों.

"गणितावरून वेदांगज्योतिषाचा जो काल येतो, त्याविषयीं संशय घेण्यास जागाच नाहीं. परंतु, वेदांगज्योतिषाची भाषासरणी इत्यादिकांवरून तो ग्रंथ इतका प्राचीन नाहीं, असें कांहीं युरोपियन पंडितांचें मत दिसतें. आमच्या ग्रंथांचा काल जितका अलीकडे आणवेल, तितका ते आणतात." ( दीक्षितकृत भारतीय ज्योतिःशास्त्र. )

आहे. दुसरी गोष्ट अशी कीं, ह्या मृगादि गणनेवरून ॠक् संहितेंतील कित्येक ऋचांचा काल इसवी सनापूर्वी चार हजार वर्षांपलीकडे जातो; आणि त्यावरूनच, ऋग्-वेदाचा कांहीं भाग आज सुमारें सहा हजार वर्षांपेक्षांही ज्यास्त पुराण दिसतो. तिसरी गोष्ट ही कीं, ऋग्वेदांतील कित्येक ऋचांवरून, आमचे आर्यपूर्वज आर्यावर्तांतून शनैः शनैः बाहेर पडले, व आपला दिग्विजय करीत करीत पूर्व, पश्चिम, आणि उत्तर, या दिशांनीं सर्वत्र पसरले, असें दिसतें. पुढें कालान्तरानें ते उत्तर ध्रुवाजवळ गेले, व तो प्रदेश सुरम्य वाटल्यामुळें, त्यांनीं आपली वस्ती तेथेंच केली. तथापि, मातृदेश जो आर्यावर्त तो त्यांजला प्रियतरच असल्याकारणानें, त्यांचें भरतखंडाशीं निरन्तर दळणवळण असे, यांत शंका नाहीं. मात्र, उत्तर ध्रुवाजवळ त्यांचें राहणें झाल्यानें, ह्या प्रदेशांतील दीर्घरात्री, प्रचंड दिवस, आणि तेजस्वी उषस अथवा सुप्रभात, यांच्याशीं त्यांचा विशेष परिचय झाला असावा, असें त्यांनीं गाइलेल्या ऋचां-वरून चांगलें व्यक्त होतें.

आतां, हा उत्तरध्रुव प्रदेश हल्लीं जरी आपल्या राहण्या-योग्य नाहीं, तरी तो हैमयुगापूर्वी[1], म्हणजे अदमासें

[1] हैमयुगाचा काल याहीपेक्षां प्राचीनतर असल्याविषयीं, कित्येक शास्त्रज्ञांचें मत आहे. ( vide Paradise Found. By By W. F. Warren. Boston. 1893. )

रा. रा. बाळ गंगाधर टिळक म्हणतात, " There are other Geologists who hold that the date ( of the present post-glacial period ) cannot be placed earlier than 18000/20000 B. C. (Antiquity of the Vedas. P. 5.).

१५००० वर्षांपलीकडील कालांत, खचितच आल्हादकारक होता, असें ऋग्वेद ऋचांवरून, व भूगर्भशास्त्रवेत्त्यांच्या शोधांवरून, आपणांस कळून येतें. आणि म्हणूनच ऋग्वेद कालाला आज सुमारें पंधरा हजार वर्षांवर होऊन गेलीं, असें उघड होतें.

वसंत संपातावरून वेदाचा काळ.

शिवाय, पुनर्वसूंत वसंत संपात असावा, असेंही वेदांवरूनच होत असल्याचें, राजश्री नामदार टिळक यांचें म्हणणें आहे. आणि त्यावरून तर, ऋग्वेदांतल्या कित्येक ऋचा आज अजमासें आठ हजार वर्षांपलीकडील काळांतल्या असाव्या, असें उत्तम प्रकारें सिद्धवत् ठरतें.

बाह्य प्रमाण.

२ याप्रमाणें वेदांचें पौराणत्व नाक्षत्रिक प्रमाणांनीं सिद्ध झालें. सबब, आतां बाह्यप्रमाणाकडे वळूं.

आर्यांची मुळची वस्ती, व त्यांचा प्रसार.

वेदावलोकनावरून असें दिसतें कीं, आमची मुळची वस्ती भरतखंडांतल्या वायव्य दिशेकडील देवनिर्मित प्रदेशांत असून, त्या

---

१ आम्हां भारतीयांची, किंबहुना अखिल मानवी प्राण्यांची जन्मभूमि आर्यावर्तच असल्याबद्दल आमचें मत आहे. येथूनच आम्ही सर्वत्र पसरलों, व आर्यावर्ताशीं दळणवळण ठेविलें. पुढें, कालान्तरें, उत्तरध्रुव प्रदेशांत आमची वस्ती झाल्यावर, आणि भरतखंडाशीं आमची जा, ये, सुरू असतां, हिमयुग प्राप्त झालें, व त्यांत आमची आणि प्राणिमात्राची वाताहात होऊन गेली. ह्यासंबंधाचें तपशिलवार विवेचन आम्हीं भारतीय साम्राज्य, पुस्तक ९ वें, भाग ५२, व भाषाशास्त्र भाग ३, यांत केलें आहे. सबब, तिकडे वाचकांनीं आपलें लक्ष पुरवावें. २ मनुस्मृति. ( २–१७ ).

प्रथमावस्थेंत आमचा एकंदर जमाव देखील लहानच होता. पुढें, दिवसानुदिवस तो वाढत चालला, आणि त्या सर्वांचा निर्वहा लागावा एतदर्थ, आम्हीही शनैः शनैः पूर्व पश्चिम व दक्षिणोत्तर, या दिशांनीं पसरत गेलों. पुढें, परंपरेनें चालत आलेला ज्ञानार्जनाचा क्रम आम्हीं एकसारखा सुरूच ठेविला; व लोककल्याणार्थ विद्यादानाची देखील अवश्य तजवीज लाविली. तदनंतर, आम्हीं आपल्या पराक्रमानें हळू हळू चोहोंकडे पगडा बसविला, आणि आपल्या सदाचरणानें व नियमित वर्तनक्रमानें सर्वांवर कायमची छाप ठेविली.

त्यांच्या विस्ताराचा आनुमानिक काल.

आतां, इतक्या सर्व गोष्टी घडून येण्यास, संवत्सरांचीं किती शतकें त्या सर्वभक्षी काळाच्या दंष्ट्रखालीं गेलीं पाहिजेत ? मुळचा लहान वृक्ष आकारास येऊन, तो मोठा होण्यास किती काळ लोटला पाहिजे ? आणि ह्याच वृक्षास सर्वत्र पारंब्या फुटून, त्या पारंब्या देखील मुळच्या खोडाप्रमाणें विशाळ बनण्यास किती काळ लागणें अवश्य आहे ?

पूर्वींच्या व सांप्रतच्या स्थितीची तुलना, व त्यावरून वेदकालाचें अनुमान.

सदर्हू कामीं योग्य रीतीनें विचार होण्यासाठीं, आणखी एक महत्वाची गोष्ट आपण नेहमींच लक्षांत ठेविली पाहिजे. ती ही कीं, त्या पुरातन काळीं, हल्लींप्रमाणें निष्कंटक पृथिवी नव्हती-कारण, चोहोंकडे रानावनांतले जंगली प्राणी असून, ते

निर्बंधपणें कोणतीही गोष्ट करूं देण्यासारखे नसत. दळणवळणांच्या साधनांचा तर सर्वत्रच वानवा असे. आणि त्यामुळें जिकडे तिकडे भीति वाटे. पूर्व तुलनेनें प्रस्तुतस्थितीचाच जर आपण विचार केला, तर त्या दोहोंत आपल्याला महदन्तर दिसून येतें. आज मित्तीस म्हटलें तर, आपण हं हं म्हणतां शेंकडों कोस जातों. हजारों कोसांची मजल एकदम मारतों. निर्दिष्ट स्थानीं पाहिजे ती वस्तु नेतों. नेमलेल्या ठिकाणीं हवी ती सामग्री पोहोंचवितों. निमिषार्धांत, म्हटल्या ठिकाणीं हवी ती बातमी देतों. आणि नियमित वेळीं, हवा त्या प्रकारचा, पाहिजे त्या ठिकाणीं, व अनेक साधनांनीं, हरतऱ्हेचा बंदोबस्तही करतों. कारण, रस्ते, सडका, लोहमार्ग, ध्वनियंत्र, तारायंत्र, इत्यादि नाना प्रकारचीं साधनें हल्लीं उपलब्ध आहेत.

परंतु, त्या प्राचीनकाळीं, सदर्हूपैकीं एकाही गोष्टीची अनुकूलता नव्हती. कारण, त्यावेळेस म्हटलें म्हणजे जिकडे तिकडे जंगली प्रदेश, अफाट अरण्यें, खडकाळ मुलूख, रेताळ मैदानें, विशाळ नद्या, आणि विस्तीर्ण पर्वत, असे इतस्ततः चोहोंकडे पसरलेले असून, दळणवळणाचे मार्ग, किंवा प्रवासाचीं साधनें, अथवा देशपर्यटनाच्या सोई, कोठें सुद्धां नव्हत्या. त्यामुळें, एका प्रदेशांतून दुसऱ्या प्रदेशांत जाणें म्हणजे महत् प्रयासाचें, अतिकष्टाचें, आणि विशेष दिनावधीचें काम असे. तेव्हां, अशा स्थितींत भरतखंडासारख्या प्रचंड देशांत एका कोपऱ्याला राहून एकामागून एक असे देश वसविणें, अधिवासित प्रदेशांत

शांति राखणें, शांतीचा भंग करणारांस जिंकणें, जिंकलेल्या लोकांस आचार आणि विचारसंपन्न करणें, त्यांस विद्यादान देणें, व हा एकंदर देश ज्ञानाचें भांडार, संपत्तीचें माहेरघर, आणि सुखाचें इंद्रभुवन करून सोडणें, म्हणजे खरोखरच हजारों वर्षांचें, व सतत परिश्रमाचें काम होय, यांत शंका नाहीं.

भूगोलविषयक प्रमाण.

३ आतां, भूगोलविषयक प्रमाणासंबंधीं विचार करतां असें दिसतें कीं, ऋग्वेदांत कूभा[१], गोमल, कुरुम†, सतेलज[२], रावी[३], चीनाब[४], झेलम[५], बियास[६], सिंधु, यमुना, सरस्वति, इत्यादि नद्यांचा उल्लेख असून, शिवाय सुप्रसिद्ध आणि अत्युच्च हिमनगाचेंही वर्णन आहे. त्यावरून, ऋक्कालीन ऋषींच्या प्रत्यक्ष ताब्यांत किंवा अमलाखालीं, त्या त्या प्रदेशांतले प्रांत असल्याचें होतें. म्हणजे, पश्चिमेकडील अथवा वायव्य दिशेकडील काबूल नदीपासून तों थेट पूर्वेकडील यमुना नदीपर्यंत, त्यांची वस्ती, त्यांचा ताबा, व त्यांचें दळणवळण असावें, असें वाटतें.

ऋक्कालीन स्थलनिर्देश.

सदहू प्रदेशांखेरीज अन्य स्थळांचा उल्लेख ऋग्वेदांत कोठेंही आढळून येत नाहीं. आणि त्यामुळेंच, ह्या बाहेर अन्य प्रांतांतल्या टापूंची ऋक्कालीन ऋषींस विशेष माहिती असल्याचें संभवत नाहीं.

---

१ काबूल नदी. २ संस्कृतांतली शतुद्री. ३ संस्कृतांतली इरावती. ४ चंन्द्रभागा किंवा असिक्नी. ५ वितस्ता. ६ आर्जिकीया किंवा विपाशा. † क्रमु.

आतां, रामायण कालांत आमची प्रगति ज्यास्त होऊन, एकामागून एक असे अनेक देश आम्हीं आपल्या कबजांत आणिले. तदनंतर, कालान्तरानें आम्हीं सरकत सरकत विंध्याद्रीपर्यंत गेलों, व पुढें तोही ओलांडून सह्याद्रीनजीक येऊन ठेपलों. येथील प्रांत अति विशाल व अरण्यमय असून, त्यांत भील, किरात, वारली, व कोळी, इत्यादि अनेक रानटी लोकांची वस्ती होती. हे लोक फार भयंकर व स्वभावतः क्रूर असत. इतकेंच नव्हे तर, ते केवळ पशुतुल्यावस्थेंतच होते, असेंही म्हटलें असतां चालेल. तेव्हां, अशा स्थितींत, सर्व लोकांस पराजित करून दण्डकारण्यासारखीं भयानक वनें, आणि ओसाड व निर्जन प्रांत कबजांत आणणें म्हणजे, महत्प्रयासाचें आणि जोखमीचें काम होतें. परंतु, उद्यमसातत्यानें तें देखील शेवटास गेलें. तदनंतर, सह्याद्री व महेन्द्र ह्या पर्वतद्वयांची सरहद्द लागल्यावर, शनैः शनैः उच्च नीलगिरी उत्क्रमून, आम्हीं आपली विजयध्वजपताका फडकावीत फडकावीत, थेट कन्याकुमारिकेपर्यंत जाऊन थडकलों. परंतु, तेवढ्यानेंही आपला कार्यभाग आटपलासें न वाटून, आम्हीं द्वीपान्तरीं प्रवेश केला; आणि प्रचंड हिंदी महासागर उल्लंघून, सुप्रसिद्ध रावणनगरींत आम्हीं आपला तळ दिला. तेथें सिंहलद्वीप सर करून तें आपल्या राज्यास जोडल्यावर,

रामायणकालीन स्थलनिर्देश.

दण्डकारण्य

व सिंहलद्वीप.

हिमाचलापासून तों तहत लंकेपर्यंत आम्हीं आपलें साम्राज्य आणि प्रभुत्व प्रस्थापित केलें, व विजयध्वज रोंविला.

ऋग्वेदांत रामायणाचा उल्लेख नाहीं,

ह्या येवढ्या मोठ्या प्रचंड धामधुमीचा उल्लेख ऋग्वेदांत कोठेंही असल्याचें दिसत नाहीं. अथवा, रामायणांतील कोणत्याही पात्राचा नाम निर्देश देखील वेदांत केलेला नाहीं. किंवा, दण्डकारण्यासारख्या विस्तीर्ण आणि भयानक प्रदेशाचें नुसतें दिग्दर्शन सुद्धां ह्यात नाहीं. त्यावरून,

व रामायणांत महाभारताचा नाहीं. सबब त्यावरून एकाचें दुसऱ्याहून पौराणत्व.

रामायणाच्याहीं पुष्कळच पूर्वींचे ऋग्वेद आहेत, यांत संशय नाहीं. त्याचप्रमाणें, रामायणांतही महाभारताचा उल्लेख नाहीं. सबब, महाभारतापेक्षां रामायण पुरातन आहे. आणि ज्यापेक्षां रावणपराजयानंतर पाण्डवदिग्विजय झाला, व रामायणानंतर महाभारत उदयास आलें, त्यापेक्षां, ह्या दोन्ही ऐतिहासिक गोष्टींचा व सुविख्यात महाकाव्यांचा काल कळून आला, म्हणजे ऋग्वेदाचा निदान आनुमानिक तरी काळ कळण्यास अगदीं अडचण पडणार नाहीं, असें आम्हांस वाटतें.

महाभारताचा काल, व त्याचा दाखला.

कौरव पांडवांचें युद्ध झाल्याला सुमारें तीन हजार वर्षांवर होऊन गेलीं, अशा विषयीं एकंदर भारतीय जनसमूहाचें ठाम मत असून, कित्येक शोधक आणि विद्वान पंडितांचे देखील तदनुकूल असेच अभिप्राय आहेत. आतां, हें भारतयुद्ध कधीं झालें, याबद्दलचा एक काल-

सूचक शिलालेख धारवाड आणि म्हैसूर परगण्यांत इवली येथील देवालयांत सांपडला आहे. त्यावरून, सदहू पाषाण लेखाचा काल, शके ५०६ किंवा इ. स. ५८४ असून, तत्कालीन शकाअन्वयें भारतयुद्धाला तीन हजार सातशें तीस वर्षें होऊन गेलीं असल्याचें कळतें. म्हणजे, शककालाच्या सहाव्या शतकाच्या आरंभीं, महाभारतयुद्धाला ४२३६ वर्षें, अथवा स्थूलमानानें चार हजार वर्षांवर होऊन गेलीं होतीं, व तदनन्तर लागलींच महाभारतकाव्य-हीं झालें असावें, असें म्हणण्यास हरकत नाहीं.

रामायणाचा काल व त्यावरून वेदाचा काल.

आतां, ज्याअर्थीं रामायणांत महाभारतांतील कथानकांचा यत्किंचित् देखील उल्लेख नाहीं, त्याअर्थीं रामायण आणि रामकथा हीं महाभारतापूर्वींच्या काळांत, म्हणजे साडेचार किंवा पांच हजार वर्षांच्या सुमारास घडलीं असावीं, असें उघड होतें. आणि ऋग्वेद तर त्याच्याही पूर्वींच्या काळचे होत. सबब, ते पांच हजार वर्षांपलीकडील काळांत निर्माण झाले असावेत, असें म्हटल्यास कांहींच बाध येत नाहीं.

आभ्यन्तर प्रमाण.

४ याप्रमाणें १ नाक्षत्रिक, २ बाह्य, व ३ भूगोलविषयक प्रमाणांनीं वेदांचें पौराणत्व सिद्धवत् ठरल्यामुळें, आतां राहिलेलें ४ थें जें आभ्यन्तर प्रमाण, तें त्यांचें प्राचीनत्व शाबीत करण्याच्या कामीं कितपत उपयोगी पडतें, त्याबद्दलचा विचार करूं.

वेदांपैकीं आदिवेद म्हटले म्हणजे अर्थात् ऋग्वेदच होत. ह्यांचें प्रथमपासून अगदीं शेवट पर्यंत अवलोकन केलें म्हणजे, एकंदर हिंदु लोकांच्या मनाच्या स्थित्यंतराचा साद्यन्त इतिहास आपणांस कळून येतो. इतकेंच नव्हें तर, त्यांच्या मानसिक प्रगतींत क्रमशः कसकसे फेरफार होत गेले, आणि शेवटीं हे लोक उन्नतावस्थेच्या कोणत्या पराकाष्ठेच्या कोटीप्रत पोंहोचले, ह्याचें केवळ हुबेहूब चित्रच त्यांत दिसून येतें.

वेदकालीन मनाची स्थिति, आणि त्याची उत्तरोत्तर प्रगति.

वेदकालांत, आमच्या मनाची स्थिति प्रथम उद्दाम असून, तिची अगदींच बाल्यावस्था होती. त्या कारणानें, त्यावेळीं प्रथमतः आमच्या मनावर बाह्यसृष्टिचमत्कृतीचा संस्कार होऊन, पृथ्वी, आप, तेज, वायु, आणि आकाश, ह्या पंचतत्वांनीं आमच्या चित्तवृत्तीवर आपला भरपूर अम्मल बसविला. त्या योगानें, त्या सर्व तत्वांस अधिदेवता कल्पून, आम्हीं त्यांचा धांवा केला. पुढें, आमचें पोषण आणि सांभाळ करणारीं हींच तत्वें आहेत असें समजून, आम्हीं त्यांस अनन्यभावें शरण गेलों; आणि आम्हांस वेळोवेळीं भासणारी उणीव पुरी पाडण्याच्या कामीं देखील तींच समर्थ आहेत असें मानून, आम्हीं त्यांची उचित काळीं यथामति प्रार्थनाही केली.

वेदकालांतली मनाची बाल्यावस्था,

प्रथमतः, आम्हांला एकंदर तत्वांच्या शक्तींचें संपूर्ण ज्ञान

व तिचें स्वरूप.

झालेलें नसून, प्रत्येक तत्वापासून अमुक एक कार्यभाग होतो, असें-ही सूक्ष्म प्रकारानें माहीत नव्हतें. तेव्हां अशा स्थितींत, सर्व तत्वांच्या सामर्थ्याचें अपेक्षित आकलन झालेलें नसल्यानें, जी जी पृथक पृथक् शक्ति भिन्न भिन्न काळीं भासमान झाली, तीच कायती सर्वांहून श्रेष्ठ, असें सहजींच आम्हीं वेळोवेळीं मानीत गेलों. परंतु कालान्तरानें आम्हांला प्रत्येक तत्वाचें सामर्थ्य व स्थानिक भेद आपोआप कळूं लागला; आणि म्हणूनच आम्हीं अकरा भूदेवता, अकरा स्वर्देवता, व अकरा आकाशदेवता, अशा कल्पिल्या. तदनंतर, कालान्तरानें हीच संख्या उत्तरोत्तर वाढत गेली. आणि ती तीन हजार तीनशें एकूणचाळीसपर्यंत येऊन ठेपली.

वेद्कालीन मनाची तरुणावस्था,

याप्रमाणें, जावत्कालपर्यंत मनाची बाल्यावस्था होती, तावत्कालपर्यंत सदरहू प्रकारचें अनेक-देवता-श्रेष्ठत्व प्रचारांत होतें. परंतु कालगतीनें, ही मनाची बाळदशा जाऊन, ज्यावेळीं त्याला तरुणावस्था प्राप्त झाली, त्यावेळीं बुद्धीची प्रगल्भता दिवसानुदिवस ज्यास्त वाढून, एकंदर विचार परिपक्व होत चालले. अनेक कल्पनातरंगांचें दृढीकरण होऊन. ते विकासाप्रत पावले. आणि मनोभास्कराचा परिपूर्ण उदय होण्यास उत्कट संधी मिळाली. त्यायोगानें, सार कोणतें व असार कोणतें, ग्राह्य कोणतें व त्याज्य कोणतें, आणि नित्य कोणतें व अनित्य कोणतें, इत्यादिकांचा पूर्ण ठसा त्यांच्या

मनावर सहजींच बिंबत गेला. तेव्हां अर्थात्च, पंचमहाभूतें, किंवा अनेक देवतासमूह, अथवा देवतावर्गत्रय, हीं सर्व आपोआप लयास जाऊन, आमच्या पुराण पूर्वजांस असें वाटूं लागलें कीं, ह्या पंचमहाभूतांची व अनेक देवतांची स्वतंत्र शक्ति म्हणून काडीमात्रही नसून, ह्या अखिल सृष्टीचें आदिकारण कांहीं निराळेंच आहे; आणि त्याचीच सर्वत्र व्याप्ति आहे. हेंच आदिकारण सर्व शक्तिमान असून, भासमान होणारी यच्चावत् वस्तु त्याचेंच विराटस्वरूप आहे. हीं प्रचंड पंचमहाभूतें देखील त्याचे केवळ गुलाम, व बंदे नोकर आहेत. तेंच आदिकारण उत्पत्ति, स्थिति, आणि लय, ह्या अवस्था त्रयांचें नियामक आहे; व त्याच्या सत्तेशिवाय आणि आज्ञे व्यतिरिक्त, अणुमात्रही इकडचा तिकडे हलूं शकत नाहीं.

व तिचा परिणाम.

**भीषास्माद्वातः पवते। भीषोदयाति सूर्यः॥**
**भीषास्मादग्निश्चेन्द्रश्च। मृत्युर्धावति पंचम इति॥**

इत्यादि असंख्य ऋचा त्या उपनिषद्महोदधींतील अमूल्य मौक्तिकेंच असून, तीं आमच्या पुण्यप्रताप पूर्वजांच्या निश्चल श्रद्धावृक्षाचीं केवळ परिपक्व फळेंच होत.

अशा प्रकारें, इतक्या परिपूर्णतेची मनाची स्थिति होण्याला संवत्सराचीं कितीं बरें शतकें लोटलीं पाहिजेत! अर्थात्, हें येवढें मोठें स्थित्यन्तर होण्याला हजारों वर्षें गेलीं पाहिजेंत. आमच्या आर्यपूर्वजांच्या मनांतील नैसर्गिक उद्गार,

सदर्हूवरून झालेला सिद्धान्त,

त्यांची ती काव्यरचना, त्यांचें धर्मबंधन, त्यांची समाज-स्थिति, त्यांचा बुद्धिप्रभाव, त्याचा एकंदर समाजावर घडून आलेला परिणाम, त्यांच्या मनोविकासाचें क्रमाक्रमानें झालेलें स्थित्यंतर, त्यांची नूतनावस्था व प्रागल्भ्यदशा, त्यांचें विचारवैचित्र्य, त्यांची पराक्रमशीलता, त्यांची महत्वाकांक्षा, ती सफल होण्याबद्दल त्यांचे अश्रांत श्रम, व त्यांचा दीर्घोद्योग, इत्यादि सर्व गोष्टींचा दूर दृष्टीनें आणि चोहोंबाजूंनीं विचार केला, म्हणजे आर्यांच्या मनाची दृष्टिगोचर होत असलेली परिपक्वता होण्यास खचितच दीर्घकाळ लोटला पाहिजे, यांत तिलप्रायही शंका नाहीं.

व त्याचें कारण.

कारण, आयतें ज्ञानाचें भांडार प्राप्त झालें, तरी देखील तें ग्रहण करण्यास मनाची सर्व प्रकारची तयारी होऊन तें उन्नतावस्थेप्रत पोहोंचण्यास, संवत्सराचीं अनेक शतकें लोटतात. मग, त्या वेदकालीन पुराण हिंदूंचें तर केवळ स्वकष्टार्जित साधन आणि स्वपराक्रमोपलब्धच सिद्धि. तेव्हां, अशा स्थितींत, सदहू प्रकारची कुशाग्रबुद्धि व पराकाष्ठेची उन्नतावस्था प्राप्त होण्याला हजारों वर्षे खचीतच गेलीं असावींत, यांत नवल तें कोणतें ?

याप्रमाणें, आभ्यन्तर प्रमाणावरूनही वेदांचें पौराणत्व सिद्ध होऊन, ऋग्वेदांतल्या ऋचा आज हजारों वर्षांपलीकडील काळांत गाइल्या असल्याचें चांगलें व्यक्त होतें.

## वेद आणि वेदांगांचें सामान्य विवेचन.

वेद व वेदांगांचें सामान्य विवेचन.

याप्रमाणें वेदाचें उत्पत्तिस्थान, महिमा, व काल याविषयींची अवश्य ती हकीकत सादर केल्यामुळें, आतां वेद आणि वेदांगें याबद्दलची सामान्य हकीकत देऊन, तदनन्तर प्रत्येक वेदाचें सविस्तर विवेचन निरनिराळ्या भागांत स्वतंत्र रीतीनें करण्याचें आम्ही योजिलें आहे. सबब, आतां क्षणभर तिकडे वळूं.

वेद कशाला म्हणतात ?

संहिता अथवा मूलमंत्र, आणि ब्राह्मण, मिळून वेद समजण्याचा सामान्य परिपाठ आहे. तथापि, लौकिकांत फक्त मंत्रासच वेद म्हणतात.

संहिता

संहिता म्हणजे एकत्र केलेला संग्रह होय. ह्या संबंधानें अशी एक आख्यायिका आहे कीं, वेदकालीं निरनिराळे मंत्र भिन्न भिन्न ऋषींनीं गाइले; व ते त्या त्या ऋषींच्या वंशांत राहिले. पुढें कालगतीस अनुसरून, हे मंत्र नष्ट होण्याची भीति वाटूं लागली, आणि त्यामुळें त्यांचें संरक्षण व्हावें एतदर्थ, कित्येक महर्षींस हे सर्व मंत्र एकत्र करावे, अशी इच्छा झाली. पुढें कालान्तरानें, हें महत्कार्य व्यासऋषींनीं तडीस नेण्याचा विचार केला, व तें त्यांनीं शेवटासही नेलें. अशा प्रकारें, हे जे एकत्र केलेले मुळचे मंत्र त्यांस संहिता ( एकत्र जमविलेले ) अशी संज्ञा प्राप्त झाली.

मंत्र म्हणजे अध्यात्म विषयक अथवा देवतास्तुतिपर

मंत्र.

वाक्य असून, ह्याला किंवा ह्यांच्या समुदायाला सामग्र्यें करून **मंत्र** अशी संज्ञा आहे. हे तेरा प्रकारचे आहेत. कित्येकांत फक्त एकादी हकीकतच सांगितलेली असते. कित्येकांत स्तुति असते. कांहींत याचना असते. कांहींत उपदेश असतो. कांहींत वर्णन, विवेचन, मनन, आणि पूर्वकथन असतें. कांहींत प्रश्न असतात. आणि कित्येकांत केवळ आशीर्वादच दिलेला असतो.

ब्राह्मण.

**ब्राह्मण** म्हणजे यज्ञविधीचें विवेचन होय. कारण, ह्यांत कोणत्या मंत्राचा विनियोग कोणत्या वेळीं कसा करावयाचा, तो कशा रीतीनें केला असतां काय होतें, तो पूर्वी कोणी कोणत्या प्रसंगीं कसा केला होता, इत्यादि सांगितलेलें आहे.

सूक्त.

**सूक्त** म्हणजे एक अगर अनेक मंत्रांचा समुदाय होय. ह्यांत एकाच ऋषीनें एक अथवा अनेक देवतांची स्तुति केलेली असते.

अनुवाक.

**अनुवाक** ही संज्ञा अनेक सूक्तांच्या समुदायास आहे. आणि

मंडल.

**मंडल** हें कांहीं अनुवाकांमिळून झालेलें आहे.

सूक्त, अनुवाक, व मंडल, अशा रीतीनें ऋग्वेदाचे विभाग करण्याचा एक प्रकार असून, तो प्राचीन आहे. वर्ग, अध्याय, आणि अष्टक, हा दुसरा व त्यानंतरचा आहे.

वर्ग, अध्याय, अष्टक.

वर्ग म्हणजे कांहीं मंत्रांचा समुदाय होय. कांहीं वर्ग मिळून अध्याय होतो. आणि दर आठ अध्यायांचें एक अष्टक होतें.

वेदचतुष्टयापैकीं पहिल्या तिघांचा उल्लेख.

एकंदर वेद चार आहेत. १ ऋग्वेद, २ यजुर्वेद, ३ सामवेद, आणि ४ अथर्वण वेद. परंतु, कित्येक ठिकाणीं ह्यापैकीं फक्त पहिल्या तीन वेदांचाच उल्लेख केलेला आढळतो. रुद्रांतल्या चमकांत, नवव्या अनुवाकांत,

तत्संबंधा रुद्रांतला आधार.

**ऋक्‌चमे सामचमे स्तोमश्चमे यजुश्चमे ।**

असा पाठ आहे. त्यावरून १ ऋक्, २ यजुस्, व ३ साम, असे मुख्य तीनच वेद मानिले असल्याचें दिसतें. शिवाय, ऋग्वेदाच्या ऐतरेय ब्राह्मणांत जें एक कथानक आहे, त्यावरून देखील प्रथम तीनच वेद मानीत असत, असें वाटतें. कारण, सदरहू कथानकांतील सारांश असा आहे कीं प्रजापतीनें अतीव दारुण तपश्चर्या करून, हें विश्व निर्माण केलें; व त्यापासूनच आकाश, स्वर्ग, आणि पृथिवी, अशीं उत्पन्न झालीं. पुढें, आकाशापासून वायु, स्वर्गापासून सूर्य, व पृथ्वीपासून अग्नि, याप्रमाणें निर्माण होऊन, अग्नि, वायु, आणि सूर्य, यांपासूनच अनुक्रमें १ ऋग्वेद, २ यजुर्वेद, व ३ सामवेद, हे उदयास आले. तदनंतर, ह्या तीन वेदांपासून १ भूः, २ भुवः, आणि ३ स्वः, अशा तीन व्याहृति झाल्या. म्हणजे ऋगवेदापासून भूः,

ऐतरेय ब्राह्मणांतला आधार.

यजुर्वेदापासून **भुवः**, व **सामवेदापासून स्वः**, अशा निर्माण होऊन, त्यांपासून **अकार**, **उकार**, आणि **मकार**, असे तीन वर्ण उद्भवले; व त्यांच्याच समुच्चयानें **ओम्** हें अक्षर बनलें. तदनंतर, प्रजापतीला सप्रणव व्याहृतीचें ज्ञान होऊन, पुराण आर्यऋषींस देखील त्यांच्या तपोबलानें त्या त्या वेदऋचांचें आपोआप स्मरण झालें. याप्रमाणें, ह्या आख्यायिकेवरून सुद्धां, फार प्राचीन काळीं मुख्यत्वेंकरून १ **ऋक्**, २ **यजुस्**, आणि ३ **साम**, असे तीनच वेद समजत असत, असें उघड होतें.

आतां, याहीपेक्षां पुराणतम दाखल्याची अवश्यकता असल्यास, आपल्याला ऋग्वेदाकडेसच वळून, ती अमूल्य खाण शोधण्याचा प्रयत्न केला पाहिजे. म्हणजे एकादें उज्वलित रत्न सहजीं दृष्टीस पडून, आपली जिज्ञासा तृप्त होईल.

ऋग्वेदांतला आधार.

असो. ही खाण खणीत असतांना एक ऋचा माझ्या आढळांत आली. सबब, ती येथें देतों.

**तस्माद्यज्ञात्सर्वहुतऽऋचः सामानिजज्ञिरे ।**
**छंदांसिजज्ञिरे तस्माद्यजुस्तस्मादजायत ॥**

(ऋ. अ० ८ अ० ४. सू० १८. मं० १०. अ० ७)

सदर्हू, ऋचेवरून, अति पुरातन काळीं देखील, **ऋक्**, **साम**, आणि **यजुस्**, ह्या तीन वेदांचीच मुख्यत्वेंकरून परिगणना करण्याचा पाठ असल्याचें उघड दिसतें.

शिवाय, ह्याच्या मुकाबिल्याम दुसरेंही एक प्रमाण मिळतें. तें असें कीं, याज्ञिक कर्मांत प्रत्येकाचीं कामें पृथक् पृथक् सांगितलेलीं असून, तीं अगदीं निरनिराळीं वाटलीं गेलीं आहेत. इतकेंच नव्हे तर, होता, अध्वर्यु, आणि उद्गाता, असे भिन्न भिन्न असले पाहिजेत, म्हणूनही वर्णन आहे. त्यावरून पाहतां, ऋग्वेदी होता असावा; यजुर्वेदी अध्वर्यु असावा; व सामवेदी उद्गाता असावा; असा त्यांत तपशिलवार उल्लेख आढळून येतो. परंतु, अमुक एक ऋत्विज अथर्ववेदी पाहिजे, असें त्याच्या बरोबरच कोठेंही सांगितलेलें असल्याचें दिसून येत नाहीं. त्यावरून, प्रथमतः सदरहू तीन वेदच कायते लोकमान्य असावेत, असें वाटतें. आतां, अथर्वणवेदीच ब्रह्मा असला पाहिजे, असा उल्लेख क्वचित् ठिकाणीं केल्याचें आढळतें. तथापि, अशा प्रकारचा उल्लेख सार्वत्रिक नाहीं. ही गोष्ट कोणालाही कबूल करावी लागेल.

तत्संबंधीं दुसरें प्रमाण.

असें जरी आहे तरी देखील, एकंदर वेदांत अथर्व वेदाची गणना नामांकित विद्वानही करितात, यांत संशय नाहीं. कारण, "**चत्वारि शृंगा त्रयो अस्य पादाः।**" ह्या ऋचेची व्याख्या करतांना, सुप्रसिद्ध निरुक्तदार यास्क हे असें प्रतिपादन करितात कीं, ("**चत्वारि शृंगेति वेदावा एते उक्ताः।**"), अग्नीच्या चार शृंगांच्या स्थानीं चार वेदच आहेत. मात्र,

एकंदर वेदांत अथर्व वेदाची मागाहून दुख्खलगिरी.

भेद म्हणून इतकाच समजावयाचा की, १ ऋग्वेद, २ यजुर्वेद, आणि ३ सामवेद, हे अगोदरचे असून, ४ अथर्ववेद हा त्यांत मागाहून सामील करण्यांत आला.

अस्तु. ऋग्वेदांत देवांचा स्तुतिपाठ गाईला आहे. कोठें कोठें, कित्येक देवतांस अनु-

प्रत्येक वेदांतला विषय.

लक्षून कांहीं स्तुतिपर मंत्र देखील ह्मटले आहेत; व क्वचित्, ऋषींच्या आख्यायिकाही सांगितल्या आहेत. यजुर्वेदांत यज्ञप्रकरण किंवा हवनविधीचें विवेचन आहे, आणि यज्ञकर्मांचे सर्व मंत्र आहेत. सामवेदांत गानयुक्त ईशस्तुति आहे. आणि अथर्वणवेदांत गृह्य सूत्रांतील कथाभाग व मांत्रिक विद्येचें सविस्तर निरूपण असून, भूत. पिशाच, राक्षस, इंद्रजाल भेषज्य, शापक्रिया, मंत्रयोग, व शुभाशुभलक्षणविचार, इत्यादि विषयांचें वर्णन आहे. ह्यांत, व सामवेदांत, ऋग्वेदांतल्या पुष्कळ ऋचा दृष्टीस पडतात. ऋग्वेद, सामवेद, आणि अथर्ववेद, हे सर्व छन्दोबद्ध आहेत. परंतु यजुर्वेद मात्र बहुतेक गद्यरूप आहे.

प्रत्येक वेदांतली विषययोजना अगदीं भिन्न भिन्न

त्याचा तपशील.

आहे. म्हणजे ऋग्वेदांत अग्नि, इंद्र, सूर्य, वायु, मेघ, इत्यादि देव-

---

१ ऋक् म्हणजे ऋच्यंते (नामस्तूयंते) देवाः येन ( इति ऋक् ). ज्यानें देवांची स्तुति केली जाते, तो ऋग्वेद होय.

२ यजुः म्हणजे, इज्यते अनेन ( इति यजुः ). ज्यानें हवन केलें जातें, तो यजुर्वेद.

३ साम ह्मणजे, स्यति पापं येन ( इतिसाम ). ज्या गायनानें पाप नाहींसें होतें तो सामवेद.

त्यांची स्तुति आहे. यजुर्वेदांत यज्ञप्रकरण आहे. सामवेदांत ऋग्वेदांतल्याच ऋचा असून, त्या फक्त गायन पद्धतीनें म्हणावयाच्या आहेत. आणि अथर्ववेदांत गृह्य-सूत्रांतला कथाभाग असून, शिवाय भैषज्य, शापक्रिया, मंत्रयोग, गारुडीविद्या, व शुभाशुभलक्षणविचार, इत्यादि विषयांवर सविस्तर विवेचन आहे.

सदरहू वेदांचे उपवेद.

ह्या चारही वेदांचे चार उपवेद आहेत. म्हणजे ऋग्वेदाचा आयुर्वेद; यजुर्वेदाचा धनुर्वेद; सामवेदाचा गांधर्ववेद; आणि अथर्ववेदाचा अस्त्रवेद होय. तथापि, यांतही थोडासा मतभेद आहे. कारण, सुश्रुत व भावप्रकाशकार हे दोघेजण आयुर्वेदाला अथर्ववेदाचाच उपवेद असल्याचें समजतात.

वेदांचे कर्ते.

ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद, आणि अथर्वणवेद, या प्रत्येकाचे १ पैल, २ वैशंपायन, ३ जैमिनी, व ४ सुमंतु, असे अनुक्रमें भिन्न भिन्न कर्ते आहेत. म्हणजे, ते ह्या वेदांचे द्रष्टे ( मंत्रद्रष्टे ) होते, असे समजावयाचें. कारण, वेद हे अपौरुषेय ( ईश्वरप्रणित ) असल्यामुळें, ते मानवीकृती आहेत, असें म्हणणें संभवणारच नाहीं.

वेदांतले भिन्न प्रकार, व त्यांचें दिग्दर्शन.

प्रत्येक वेदांत, १ संहिता, २ ब्राह्मणें, ३ आरण्यकें, आणि ४ सूत्रें, अशीं असतात. संहिता म्हणजे मूळ वेदमंत्रच होत. ब्राह्मण म्हणजे त्यांजवरील टीका-

रूप व्याख्यान. आरण्यकें म्हणजे उपनिषदादि भाग, आणि सूत्रें ह्मणजे वर्णाश्रमधर्माचें यथार्थ विवेचन समजावयाचें.

प्रत्येक वेदाची संहिता अगदीं निराळी असून, तिच्यांतही आणखी १ पदें, २ क्रम, ३ जटा, ४ माला, ५ शिखा, ६ रेखा, ७ ध्वजा, ८ दंड, ९ रथ, व १० घन, असे अनेक प्रकार आहेत. परंतु, त्या सर्वांचा हेतु केवळ वेदरक्षणच होय. कारण, वेदांतलें एकही अक्षर कमी ज्यास्त होऊं नये म्हणून, आणि प्रत्येक पद जेथल्या तेथें अगदीं ठाम ध्यानांत राहवें, या हेतूनेंच वर लिहिलेले नानाप्रकार सुरू केले होते, असें उघड दिसतें. सबब, वाचकांस कांहींचें दिग्दर्शन होण्यासाठीं, ह्यांपैकीं दोन चार प्रकार मात्र मासल्याकरितां येथें दाखवितों.

संहितेचे प्रकार, व त्यांचें कारण.

### ऋग्वेदाची मूळ संहिता.

संहिता, पद, क्रम, जटा, आणि घन, यांचा मासला.

**पवस्व वाजसातये विप्रस्य गृणतो वृधे । सोम रास्व सुवीर्यम् ।** ( ऋ. अ. ६ ).

### तिचा पदपाठ.

**पवस्व । वाऽजसातये । विप्रस्य । गृणतः । वृधे । सोम । रास्व । सुवीर्यम् ।**

### तिचा क्रमपाठ.

**पवस्व वाजसातये । वाजसातये विप्रस्य । वाजसातय**

इति वाजसातये विप्रस्य गृणतः । गृणतो वृधे । वृध इति वृधे । सोमरास्व । रास्व सुवीर्यं । सुवीर्यमिति सुवीर्यम् ।

तिचा जटापाठ.

पवस्व वाजसातये वाजसातये पवस्व पवस्व वाजसातये । वाजसातये विप्रस्य विप्रस्य वाजसातये वाजसातये विप्रस्य । वाजसातय इति वाजसातये । विप्रस्यं गृणतो गृणतो विप्रस्य विप्रस्य गृणतः । गृणतो वृधे वृधे गृणतो गृणतो वृधे वृध इति वृधे । सोम रास्व रास्वसोम सोमरास्व । रास्व सुवीर्यं सुवीर्यरास्व रास्वसुवीर्यं सुवीर्यमिति सुवीर्यम् ।

तिचा घनपाठ.

पवस्व वाज सातये वाजसातये पवस्व पवस्व वाजसातये विप्रस्य विप्रस्य वाजसातये पवस्व पवस्व वाजसातये विप्रस्य । वाजसातये विप्रस्य विप्रस्य वाजसातये वाजसातये विप्रस्य गृणतो गृणतो विप्रस्य वाजसातये वाजसातये विप्रस्य गृणतः । वाजसातय इति वाजसातये । विप्रस्य गृणतो गृणतो विप्रस्य विप्रस्य गृणतो वृधे वृधे गृणतो विप्रस्य विप्रस्य गृणतो वृधे । गृणतो वृधे वृधे गृणतो गृणतो वृधे । वृध इति वृधे । सोमरास्व रास्वसोम सोमरास्व सुवीर्यं सुवीर्यंरास्व सोम सोम रास्व सुवीर्यं । रास्व सुवीर्यं सुवीर्यं रास्व रास्व सुवीर्यं । सुवीर्यमिति सुवीर्यम् ।

ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद, आणि अथर्वणवेद, यांच्या शाखेच्या कांहीं संहिता व ब्राह्मणें उपलब्ध नसून, गहाळ झाल्याचें कळतें. सबब, तद्विषयक ज्यास्त तपशील देतां येत नाहीं. सदरहू गाहाळ झालेले ग्रंथ खालीं लिहिलेल्या ऋषींचे होत:—

अनुपलब्ध ग्रंथ.

बाष्कल, पैंगी, भाल्लवी, शाट्यायनी, काल्बवी, लामकायनी, शांबुवि, खाडायनी, आणि शालंकायनी, इत्यादि. ह्यांच्या नांवांचा त्या त्या ग्रंथात वारंवार उल्लेख येतो. परंतु, ते ग्रंथ आढळून येत नाहींत. ह्यावरून ते नाहींसेच झाले असावे, असा विशेष संभव दिसतो.

त्यांचे प्रवर्तक.

ब्राह्मण हा शब्द (वेदाचा एक भाग या अर्थानें) नपुंसकलिंगी आहे. तथापि, त्याचा लौकिक उपयोग पुल्लिंगांतच होतो. हीं ब्राह्मणें प्रत्येक वेदांचीं निरनिराळीं आहेत. म्हणजे ऋग्वेदाचें ऐतरेय व शाख्यायन किंवा कौषीतकि ब्राह्मण आहेत. यजुर्वेदाच्या दोन शाखा असून, त्यापैकीं कृष्ण यजुर्वेदाचे तैत्तिरीय, व शुक्ल यजुर्वेदाचे शतपथ ब्राह्मण आहेत. सामवेदाचे ताण्ड्य, अद्भुत, छांदोग्य, प्रौढ, पंचविंश (अथवा महाब्राह्मण), व षड्विंश, असे ब्राह्मण आहेत. आणि अथर्ववेदाचे गोपथ ब्राह्मण आहेत.

वेदांचीं निरनिराळीं ब्राह्मणें.

आरण्यकें ही संज्ञा अगदीं अन्वर्थ आहे, असें म्हण-

आरण्यकें.

ण्यास हरकत नाहीं. कारण, ह्यांचें पठण अरण्यांत करावें लागतें; व त्यामुळेंच त्यांस हें नामधेय दिल्याचें दिसतें. हीं आरण्यकें ब्राह्मणांच्या परिशिष्टासारखींच असून, त्यांत सर्व उपनिषदांचा समावेश होतो, असें म्हणण्यास कोणताही बाध नाहीं. ह्यांत अध्यात्मज्ञानाचें उत्कृष्ट विवेचन केलेलें दृष्टीस पडतें.

सूत्रें.

प्रत्येक वेदाचीं सूत्रें देखील निरनिराळींच असून, तीं भिन्न भिन्न ऋषींनीं केलेलीं आहेत. ह्या सूत्रांचे दोन प्रकार आहेत. १ श्रौत, आणि २ गृह्य. पहिल्यांत यज्ञयागादि क्रियांचें सविस्तर विवेचन आहे; व दुसऱ्यांत वर्णाश्रमधर्म, आणि नित्यनैमित्तिक कर्म, यांविषयींची तपशिलवार हकीकत दिलेली आहे.

वेदांच्या देवता, गोत्रें, व छन्द.

ऋग्वेदाची देवता ब्रह्मदेवता नांवाची असून, त्याचें गोत्र आत्रि, व छन्द गायत्री आहे. यजुर्वेदाची रुद्रदेवता, भारद्वाज गोत्र, आणि त्रैष्टुभछन्द आहे. सामवेदाची विष्णुदेवता, काश्यपगोत्र, व जागत छन्द आहे. आणि अथर्ववेदाची इन्द्रदेवता, वैजानगोत्र, व अनुष्टुभछन्द आहे.

ऋग्विधानलेख, त्यांतील विषय; व परिशिष्टें.

असो. याच ठिकाणीं, ऋग्विधान नांवाच्या किरकोळ लेखांचाही उल्लेख करणें अत्यवश्य आहे. ह्यांत ऋग्वेदपठणानें होणारा कार्यभाग व त्याचें फल, इत्यादि सांगितलें असून, ते शौनकानें लिहिले असल्याचें सांगतात. ह्याशिवाय, बव्हृच परिशिष्ट, शांख्यायन परिशिष्ट, आश्व-

लायन गृह्यपरिशिष्ट, वगैरे अन्य किरकोळ निबंध ( परिशिष्टादाखल असे ) पुष्कळच आहेत. परंतु ते म्हणण्यासारिखे महत्वाचे नसल्यामुळें, त्यांचें येथें विशेष रीतीनें विवेचन करण्याचें कारण नाहीं.

ऋग्विधान पद्यसंग्रहग्रंथ.

ऋग्विधान हा ग्रंथ पद्यात्मक आहे. ह्यांत एकंदर ४८३ पद्यें असून, त्यांत नानाप्रकारच्या मंत्रापासून किंवा त्यांचा जप केल्यापासून प्राप्त होणाऱ्या फळाचें विवेचन आहे. ह्यांत कित्येक मंत्र रोगनाशक असल्याविषयीं सांगितलें आहे; व त्यांतच त्या त्या रोगाचा स्पष्ट उल्लेखही आहे. कित्येक मंत्रापासून ब्रह्मज्ञान, कांहींपासून देवताप्राप्ति, आणि कित्येकांपासून धन, धान्य, पशु, संतति, व संपत्ति, इत्यादि मिळून, कित्येकाच्या योगानें तर हरएक प्रकारच्या पातकाचासुद्धां नाश होतो, ह्मणून वर्णन आहे.

त्यांतले मंत्र व त्यांचा कार्यभाग.

हे सर्व मंत्र ह्मणजे सूक्तेंच ह्मणावयाचीं. ह्यांत एकंदर सूक्ताचें विधान सांगण्यापूर्वी, प्रथम गायत्री मंत्राचें सामर्थ्य, आणि त्यांपासून होणारा कार्यभाग, यांविषयींचें विवेचन आहे. तदनंतर गायत्री मंत्राचा जप सांगून, तदुत्तर तर्पण, अभिषेक, होम, हवन, व ब्राह्मणभोजन, इत्यादि विधि करण्याविषयींचें सूचित केलें आहे.

वेदांगें, व प्रातिशाख्यें.

वेदाचीं आणखी वेदांगें देखील आहेत. हीं १ शिक्षा, २ छन्दस, ३ व्याकरण, ४ निरुक्त, ५ ज्योतिष, आणि ६

कल्प, अशीं होत. ह्यांपैकीं, शिक्षा, किंवा जिला स्वरशास्त्र, अथवा उच्चारशास्त्र म्हणतात, तें मांडुकानें केलें.

शिक्षा.

पाणिनीया शिक्षा[1] म्हणूनही एक ग्रंथ आहे. परंतु, ह्यापेक्षां मांडुकाचा ग्रंथ विशेष महत्वाचा आहे. हें शिक्षाशास्त्र बरेंच पुरातन असल्याचें दिसतें. कारण, ह्याचा उल्लेख तैत्तिरीय आरण्यकांतच (७. १. मध्यें) केलेला असल्याचें आढळून येतें. हें शास्त्र वेदग्रंथोदधींत प्रातिशाख्य[2] नांवानें सुप्रसिद्ध आहे.

याज्ञवल्क्य आणि पराशर शिक्षा.

सदहू शिक्षेशिवाय, याज्ञवल्क्य आणि पराशर, इत्यादि ऋषींच्याही शिक्षा आहेत. परंतु त्या हल्लीं उपलब्ध नाहींत, असें वाटतें. शिक्षा व इतर वेदांगें, आणि चरणव्यूहचतुष्टय, ( म्हणजे निविद, कुंताप, प्रैष, व चरणव्यूह, ) ह्यांचें अध्ययन दशग्रंथी म्हणून म्हणविणारास अवश्य केलेंच पाहिजे. कारण, दशग्रंथांत १ संहिता, २ ब्राह्मण, ३ आरण्यक, ४ सूत्रें, ५ शिक्षा, ६ छन्द, ७ व्याकरण, ८ निरुक्त, ९ ज्योतिष, व १० कल्प, इतक्यांचा समावेश होत असल्यामुळें, त्यांच्या अध्ययनाखेरीज, "दशग्रंथी" ही संज्ञाच प्राप्त होत नाहीं.

शिक्षा म्हणजे एकंदर वर्णांचा कसा उच्चार करावा,

---

१ ह्याशिवाय नारदशिक्षा म्हणून ही एक ग्रंथ आहे.

२ चाऱ्ही वेदांची पृथक् पृथक् प्रातिशाख्यें आहेत.

शिक्षा म्हणजे उच्चारशास्त्र होय.

एतद्विषयक शास्त्र होय. हे वर्ण शंकराच्या डमरूंतून निघाले असल्याबद्दल आख्यायिका असून, ते शंभूच्या अभिप्रायाप्रमाणें ६३ किंवा ६४ आहेत. ह्यांत २१ स्वर; ३३ व्यंजनें; १ अनुस्वार, १ विसर्ग; १ जिव्हामूलीय ( क वर्गा पूर्वींचा विसर्गोच्चार ); १ उपध्मानीय ( प वर्गापूर्वींचा विसर्गोच्चार ); ४ यम ( म्हणजे क वर्गादि पांच वर्गांतल्या अनुनासिकाक्षराशिवाय, चार अक्षरापुढें ङ्, ञ्, ण्, न्, म्, या अनुनासिकांपैकीं एकादा अनुनासिक वर्ण आला असतां, आश्रयस्थानांप्रमाणेंच जो अक्षरोच्चार होतो तो ); आणि प्लुतऌ; इतक्यांचा समावेश होतो. वर्णाचे पांच भेद आहेत; व ते स्वरानें, कालानें, स्थानानें, प्रयत्नानें, आणि उच्चारणानें होतात. स्वराचे तीन प्रकार आहेत. १ उदात्त, २ अनुदात्त, व ३ स्वरित उदात्त स्वरांत निषाद आणि गांधार येत असून, अनुदात्तांत ऋषभ व धैवत, आणि स्वरितांत षड्ज, मध्यम, व पंचम, असे स्वर येतात. स्वराचे ऱ्हस्व, दीर्घ, आणि प्लुत, असे उच्चाराचे प्रकार आहेत, व त्या उच्चाराचीं १ कंठ, २ तालु, ३ मूर्धन्, ४ दंत, ५ ओष्ठ, ६ नासिका, ७ उर, आणि ८ जिव्हा, अशीं आठ स्थानें आहेत.

असो. हें व अशा प्रकारचें विवेचन शिक्षेंत आहे. सबब, तत्संबंधीं ज्यास्त ऊहापोह न करतां,

छन्द.

छन्दःशास्त्र म्हणून जें वेदांचें दुसरें अंग आहे, त्याकडे वळूं. हें शास्त्र फार प्राचीन आहे. कारण, त्यात ज्या शास्त्रांचीं नांवें दिलीं आहेत, तीं

विशेष पुराण दिसतात. उदाहरणार्थ, क्रौष्टुकि, तांडी, यास्क, सैतव, रात, आणि मांडव्य, इत्यादि. ह्या शास्त्राच प्रवर्तक पिंगल असून, त्याजवर हलायुधाची टीका आहे.

व्याकरण. व्याकरण शास्त्रांत पाणिनीच्या[1] आणि यास्काच्योंही पूर्वी अनेक अध्यापक व शास्ते होऊन गेले असल्याचें दिसतें. कारण, यास्कानें आपल्या निरुक्त नामक ग्रंथांत, त्याच्या अगोदर होऊन गेलेल्या अनेक ग्रंथकारांचीं प्रत्यक्ष नावें सुद्धां दिलीं असून, कित्येक ठिकाणीं फक्त "नैरुक्ताः" अथवा "वैयाकरणाः", असा त्यानें मोघमच उल्लेख केला आहे. पाणिनीनें पूर्वशास्त्यांचीं जीं नावें दिलीं आहेत, त्या सर्वांत शाकटायन हा विशेष महत्वाचा होय. ह्या शाकटायनानेंच एक व्याकरण केलेलें आहे; आणि तें शब्दानुशासन या नांवानें सुप्रसिद्ध आहे. ह्याजवर चिन्तामणिवृत्ति नावाची टीका असून, ती यक्षवर्मा नांवाच्या कोणी एका जैनानें केली आहे; व तींत त्यानें शाकटायनाला महाश्रमणसंघाधिपति असें उपपद दिलें आहे.

निरुक्त. निरुक्ताबद्दल पूर्वीच[3] दिग्दर्शन केलेलें आहे. निरुक्त म्हणजे शाब्दिक टीका, अथवा वेदांतील कठिण शब्दाचें विवरण

---

१ इ. स. पूर्वी ७०० वर्षें. ( डा. भांडारकर ). पंडित सत्यव्रत-सामश्रमींच्या मतें इ. स. पूर्वी. २४०० वर्षें. ( ग्रंथकर्त्याचें भाषाशास्त्र पहा )

२ इ. स. पूर्वी २५००।३००० वर्षें.

३ भा० सा० पुस्तक २।९ भाग १।३।५।३ पान १५।३।१२४ पहा.

होय. किंबहुना, ह्यास वेदकोश म्हणण्यास देखील कांहीं-एक प्रत्यवाय नाहीं. यासच **निरुक्त** अशी संज्ञा आहे; आणि **निघटूवर निरुक्त** म्हणून **यास्का**नें हें केवळ टीके-दाखलच केलें आहे.

ज्योतिष.

ज्योतिषाचें अध्ययन फार पुरातन काळापासूनच आमच्या पूर्वजांनीं चालविलें असल्याचें दिसतें. कारण, आमचे यज्ञयाग, होमहवन, इष्टिमेध, इत्यादि सर्व चन्द्रदर्शन आणि नक्षत्रावलोकन, यांजवरच अवलंबून असल्याकारणानें, त्यांचे वेळोवेळीं वेध घेणें हें त्यांजला फारच आवश्यकतेचें होतें. त्यामुळें, ह्या शास्त्राचें मनःपूर्वक अध्ययन करून, त्यांतील बिकट गोष्टींचा बारीक रीतीनें शोध लावण्यांत त्यांनीं आपलें विलक्षण बुद्धिवैभव खर्च केलें. ह्या शास्त्राचा मूल प्रवर्तक **लगध** असल्याविषयीं सर्वांची समज आहे. कारण, **आर्यभटाच्या "आर्यभट्टीय"** नामक ज्योतिष ग्रंथावर **सूर्यदेवा**नें जी टीका केली आहे, तींत ज्योतिषशास्त्राचा प्रवर्तक **लगधाचार्य** होता, असा स्पष्टच उल्लेख आहे. शिवाय, **ब्रह्मगुप्ता**नें देखील लाधाचार्याच्या नांवाचें दिग्दर्शन करून, तो ज्योतिषशास्त्राचा कर्ता असल्याविषयीं ध्वनित केलें आहे. त्यावरून, ह्या शास्त्राची प्रवर्तकता त्याच्याकडेसच येऊं पाहते; व हा इ. स. पूर्वी ११८० वर्षांच्या सुमारास होऊन गेला असावा, असें दिसतें. तथापि, याच्याही पूर्वींचे **पराशर, गर्ग,** वगैरे असावेत, असें वाटतें.

कल्पांत यज्ञविधि, नित्यनैमित्तिक कर्म, आणि वर्णाश्रमधर्म, या विषयींचें विवेचन आहे. ह्यांत श्रौत, गृह्य, आणि स्मार्त, इत्यादि अनेक प्रकारच्या सूत्रांचा अन्तर्भाव होत असून, तीं भिन्नभिन्न ऋषींनीं केलीं आहेत. आणि म्हणूनच ह्याबद्दलचें पृथक् पृथक् विवेचन ज्या त्या प्रकारच्या सूत्राखालीं केलें आहे.

कल्प.

आतां, फक्त अनुक्रमणीचाच विचार करावयाचा राहिला आहे. सबब, त्यासंबंधीं थोडेसें दिग्दर्शन करूं. ह्या अनुक्रमणींत सूक्त, मंडल, अनुवाक, अष्टक, अध्याय, वर्ग, सूक्ताचा आरंभ, ऋचाची संख्या, प्रत्येक सूक्ताचा प्रवर्तक, त्याची देवता, आणि त्याचें छंद किंवा वृत्त, इत्यादींचें विवेचन आहे. ऋग्वेदाच्या अनुक्रमणी दोन प्रकारच्या आहेत. १ अनुवाकानुक्रमणी, व २ सर्वानुक्रमणी. पहिली शौनकाची असून, दुसरी कात्यायनाची आहे.

ऋग्वेदाच्या अनुक्रमणीचें दिग्दर्शन.

ह्या दोन्ही अनुक्रमणींवर उत्तम प्रकारच्या टीका आहेत; आणि त्या फारच काळजीपूर्वक केलेल्या असल्या कारणानें विशेष महत्वाच्या आहेत, यांत संशय नाहीं. ह्या टीका इ. स. ११८७ च्या सुमारास तयार झाल्याचें दिसतें, व त्यावरून टीकाकाराचा काल इसवी सनाच्या बाराव्या शतकाच्या शेवटीं शेवटीं असावा असें वाटतें. ह्या टीकाकाराचें खरें नामधेय कळत नाहीं.

त्यांजवरील षड्गुरुशिष्याची टीका.

तथापि, तो आपल्याला षड्गुरुशिष्य म्हणवीत असून, ह्या सहा गुरूंचीं नावें १ विनायक, २ त्रिशूलांक, ३ गोविंद, ४ सूर्य, ५ व्यास, आणि ६ शिवयोगी, अशीं असल्याचें त्याच्या स्वतःच्याच लेखावरून कळून येतें.

बृहद्देवता नांवाचा ग्रंथ देखील ह्या अनुक्रमणीच्याच वर्गांतला होय. ह्याचा कर्ता देखील शौनकच आहे. हा ग्रंथ श्लोकबद्ध असून, तो पौराणिक कथाभागाची केवळ खाणच आहे, असें सुद्धां म्हणण्यास काडीमात्रही प्रत्यवाय नाहीं. कारण, अनेक पूर्वकालीन गोष्टी, मनोवेधक आख्यायिका, ऐतिहासिक उपाख्यानें, व अवांतर पुरातन वृत्त, इत्यादि सर्वांचाच त्यांत अंतर्भाव झाला आहे; आणि त्यामुळेंच हा विशेष महत्त्वाचा आहे. ह्याचा काळ यास्कानंतरचा असावा, असें दिसून येतें.

बृहद्देवतेचें महत्व.

ह्यांत भागुरि, आश्वलायन, इत्यादि शास्त्र्यांच्या नांवाचा उल्लेख केला असून, ऐतरेयक, भाल्लवि ब्राह्मण, आणि निदानसूत्र, यांचाही नामनिर्देश मधून मधून केलेला दिसतो. त्यावरून, यानंतरचा हा ग्रंथ असल्याचें उघड होतें.

तिचा काल.

याप्रमाणें, एकंदर वेदांचें आणि वेदांगांचें सामान्य विवेचन झालें; व त्यांचें उत्पत्तिस्थान, महिमा, आणि काळ, यांबद्दलचा देखील अवश्य तो विचार केला. सबब, आतां पुढील भागांत प्रत्येक वेदाचें स्वतंत्र विवेचन करूं, व तद्विषयक तपशिलवार हकीकत देऊं.

---

# भाग ५९ वा.

## वैदिकग्रंथोदधि.

### ऋग्वेद.

सर्व वेदांत मुख्य व अतिप्राचीन असा ऋग्वेदच होय.[1]

ऋग्वेदाचे विभाग.

ऋक्संहितेचे दोन विभाग केलेले दृष्टीस पडतात. त्यापैकीं, पहिला फार प्राचीन असून, दुसरा अर्वाचीन, अथवा निदान त्या नंतरचा तरी खचितच आहे. पहिल्या किंवा प्राचीन विभागास मंडल अशी संज्ञा आहे. व त्यानंतरच्या विभागास अष्टक असें नांव पडलें आहे. हीं मंडलें दहा, आणि अष्टकें आठ आहेत. ह्या दोही मंडलांमिळून, ८९ अनुवाक, १०२८ सूक्तें, व १०५८० ऋचा अथवा मंत्र आहेत. प्रत्येक सूक्तांत सुमारें नऊ किंवा दहा ऋचा असतात. परंतु, त्याचेंही प्रमाण म्हणून अगदींच नाहीं. कारण कित्येक सूक्तांत तीनपर्यंत देखील ऋचा असतात, व कित्येकांत तर ह्यांची संख्या पंचेचाळीसपर्यंत सुद्धां जाते. अष्टकांत अध्याय आणि वर्ग, असें भाग पाडलेले आहेत. आठ अष्टकांमिळून एकंदर ६४ अध्याय, व

मंडल व अष्टक, आणि त्यांचे पोट विभाग.

---

[1] अर्चन्ति अनयाइति ऋक्. म्हणजे ज्यानें देवांस स्तवतात, ते ऋग्वेद होत.

२००६ वर्ग आहेत. प्रत्येक अष्टकांत आठ अध्याय असतात, आणि प्रत्येक अध्यायांत बहुतकरून तेहेतीस वर्ग असतात. परंतु, प्रत्येक वर्गांत अमुकच ऋचा असावयाच्या, असा मात्र नेम नाहीं.

सर्व हे वर्गीकरण स्पष्टपणें ध्यानांत येण्यासाठीं, तें त्यांचा तपशील. याखालीं तपशीलवार देतों:—

ऋक्संहिता = { १० मंडलें. ८५ अनुवाक. १०२८ सूक्तें. १०५८० मंत्र ( ऋचा ). ८ अष्टकें. ६४ अध्याय. २००६ वर्ग. १०५८० मंत्र ( ऋचा ).

| | | | | |
|---|---|---|---|---|
| पहिल्या मंडलांत | २४ | अनुवाक असून | १९१ | सूक्तें आहेत. |
| दुसऱ्या ,, | ४ | ,, | ४३ | ,, |
| तिसऱ्या ,, | ५ | ,, | ६२ | ,, |
| चवथ्या ,, | ५ | ,, | ५८ | ,, |
| पांचव्या ,, | ६ | ,, | ८७ | ,, |
| सहाव्या ,, | ६ | ,, | ७५ | ,, |
| सातव्या ,, | ६ | ,, | १०४ | |
| आठव्या ,, | १० | ,, | ९२ + वालखिल्य सूक्तें ११=१०३ | |
| नवव्या ,, | ७ | ,, | ११४ | |
| दहाव्या ,, | १२ | ,, | १९१ | |

एकूण १० मंडलें, ८५ अनुवाक, १०२८ सूक्तें आहेत.

ह्या मंडलक्रमाचा उल्लेख ऐतरेयारण्यकांत, व आश्वला-

त्यांचा ऐतरेयारण्यकांतील उल्लेख.

यन आणि सांख्य गृह्य सूत्रांत केला असल्याचें दिसतें. त्यावरून, अनेक ऋषिकृत सूक्तांचा ज्या ऋषीनें जो एक संग्रह केला, तें मंडल, व तो संग्रहकर्ता त्याचा ऋषी, असें ( आश्वलायन गृह्यसूत्रात सांगितलें आहे त्या अन्वयें ) समजावयाचें.

ऋग्मंत्रांची व पदांची संख्या.

ऋग्वेदांतल्या ऋचांचीं एकंदर पदें १,५३,८२६ असून, त्यांतील अक्षरसंख्या ४,३२,००० आहे. आतां, मंत्रसंख्येंत मात्र बराच मतभेद असल्याचें दिसतें. कारण, हे मंत्र १०,५८०; १०,४०२; व १०,६२२ असल्याविषयीं, भिन्नभिन्न अभिप्राय आहेत.

ऋक्संहितेंतले छंद.

ऋक्संहितेंत खालीं लिहिलेले छन्द येतातः—त्रिष्टुभ. गायत्री. अनुष्टुभ. पुरु. उष्णिक. प्रतिष्ठा. पंक्ति. जगती. प्रगाथं बार्हतं. द्विपदाविराट्. सतोबृहती. प्रस्तारपंक्ति. विराड्रूपा. विराट्स्थाना. उष्णिक. अत्यष्टि. महापदपंक्ति. प्रागाथं. काकुभं; इत्यादि.

ऋग्वेद सूक्तांचे प्रकार.

ऋग्वेद सूक्ताचे तीन प्रकार आहेत, असें एके ठिकाणीं लिहिलेलें आढळतें. १ ऋषिसूक्त. २ देवतासूक्त. आणि ३ छंदःसूक्त. ज्या ऋषीनें जें सूक्त ऐकिलें, तें त्या ऋषीचें सूक्त होय. त्याचप्रमाणें, ज्या ज्या सूक्तांची जी जी देवता असेल, त्या त्या देवतेचें तें तें सूक्त समजावयाचें. आणि सूक्ताचा ज्या

केलेलें आहे. कारण, मनुष्यगण आणि देवतासमुदाय, यांच्यामध्यें तो दूतरूपानें व मध्यस्थासारखाच असून, तो आपल्या अत्युज्ज्वल ज्वालाग्रांनीं अतिदूरस्थ देवांस देखील होमार्थ पाचारण करतो; आणि त्याच्या प्रखर तेजाला भिऊन, अखिल देवगण त्याची आज्ञा मान्य करतात; अशी तत्कालीन आर्यांची समज असे. इन्द्र हा वज्राचा मालक असल्या कारणानें, पाण्यानें भरलेल्या कृष्णमेघजालांचें विदारण करून तो पृथ्वीवर जलवृष्टि करतो. सबब, त्याचें स्तोत्र गाऊन त्यालाही निमंत्रण केले आहे. सोमलतेला देखील याप्रमाणेंच देवता कल्पून, तिचे पोंवाडे अनेक ऋचांत गाइलेले आहेत. अरुण, उपस, व सूर्य, यांच्या तेजोराशीनेंही त्यांच्या मनाला मोठा विस्मय वाटून, त्यांनीं त्यांचा सुद्धां धांवा मोठ्या प्रेमानें आणि आदरपूर्वक केला आहे. तसेंच, मरुद्गण, रुद्रगण, विश्वदेवगण, आदित्यगण, वसुगण, ऋतुगण, ऋभुगण, इत्यादि अनेक देवतांचेंही वेळोवेळीं आवाहन करून, त्यांच्या ठायीं त्यांनीं आपली खरी भक्ति अनेक ऋचांत प्रकट केली आहे.

इंद्राची स्तुति.

सोम व इतर देवतांचें स्तवन.

आमच्या पुराण ऋषींनीं सोमलतेची स्तुति केली असल्याविषयीं, सदरीं उल्लेख केला आहे, व तिला देवताही कल्पिल्याबद्दल लिहिलें आहे. त्याचें कारण असें कीं, वेदकालांत सोमरसाचें मोठें महत्व असून, सोमयाग करून तो ते

सोमलतेचा उपयोग.

मोठ्या आनंदानें पीत. इतकेंच नव्हे तर, तत्पानार्थ ते आपल्या बरोबर इंद्रादिदेवांस देखील बोलावीत, आणि तो पिण्याविषयीं ते त्यांस फारच आग्रह करीत.

ह्या सोमयागाची मोठी खटपट असते; व त्या एकंदर विधीस सोळा ऋत्विज लागतात, असें वाटतें. यांपैकीं आठजणांचा उल्लेख ऋक्संहितेंत दुसऱ्या मंडळाच्या पहिल्या अनुवाकांत केला आहे; आणि पहिल्या सूक्ताच्या दुसऱ्या ऋचेंत त्यांचीं नांवेंही दिलीं आहेत.

सोमयागाचें वर्णन.

**तवाग्ने होत्रं तवपोत्रमृत्वियं तव नेष्ट्रं त्वमग्निदृता-यतः । तव प्रशास्त्रं त्वमध्वरीयसि ब्रह्माचासि गृह-पतिश्चनो दमे ॥ २ ॥**

( ऋक्संहिता. अ.२. अ.५. वर्ग१७. मं.२. अ.१. सू.१. )

**भावार्थ**—हे अग्ने, तूंच होता[1] आहेस. व तूंच पोता[2], ऋत्विज, नेष्टा[3], आणि अग्नीध्रं[4] आहेस. त्याचप्रमाणें, प्रशास्ता[5] देखील तूं असून, अध्वर्यूचें[6] काम सुद्धां तूंच कर-

---

१ मुख्य मंत्र ह्मणणारा यज्ञसंपादक, व देवांस बोलाविण्याचें दूतत्व करणारा एक ऋत्विज. २ ब्रह्माऋत्विजाचा सहायकर्ता. ३ अध्वर्यूचा सहाय्यकर्ता. ४ ब्रह्माऋत्विजाचा सहायकर्ता. ५ होत्या-चा सहायकर्ता मैत्रावरुण. ६ हवि देणारा ऋत्विज.

एकंदर जे सोळा ऋत्विज यज्ञकर्मांत असतात, ते खालीं लिहिल्या-प्रमाणें होत.

१ होता. २ उद्गाता. ३ अध्वर्यू. ४ ब्रह्मा, ५ ब्राह्मणाच्छंसी ६ प्रस्तोता. ७ मैत्रावरुण. ८ प्रतिप्रस्थाता. ९ पोता. १० प्रतिहर्ता.

( पुढें चालू )

तोस. शिवाय, तूं ब्रह्मा आहेस, व घरचा यजमान ( घर-धनी ) ही तूंच आहेस. ह्यावरून तात्पर्यार्थ इतकाच घ्यावयाचा कीं, एकदां अग्नि प्रगट होऊन त्यानें हवी स्वीकारले, ह्मणजे यज्ञसंपादक, पुरोहित, आणि यजमान, यांचीं सर्व कर्में यथासांग झालीं.

प्रायणीया इष्टि.

असो. सोमयागाला सुरुवात होण्यापूर्वीं ऋत्विजांची निवड करावी लागते, व ती केल्या-वर प्रायणीया नांवाची इष्टि होते. ही इष्टि होऊन गेली, म्हणजे यज्ञास प्रारंभ झाला असें सम-जावयाचें. कारण, ही इष्टि त्या पूर्वींचीच असते. पुढें, सदो-पमंडपांत दक्षिण बाजूला, उपरव[1] नांवाचें एक स्थल असतें.

---

( मागील पृष्टावरून पुढें चालू. )

११ अच्छावक. १२ नेष्टा. १३ अग्नीध. १४ सुब्रह्मण्य. १५ ग्राव-स्तुत आणि १६ उन्नेता.

परंतु हे सर्व फक्त मोठमोठ्या यज्ञांतच लागतात.

प्रतिप्रस्थाता = ह्यालाच आवया ह्मणतात, व तो अध्वर्यूला मदत करतो.

अग्निमिंध = अग्नी पेटवितो तो.

ग्रावस्तुत् = ग्रावे अथवा सोमलता कुटण्याचे दगड ज्याच्या-जवळ आहेत तो.

ब्रह्मा = एका ऋत्विजाचें नांव. ह्याला तीन वेद येत असले पाहिजेत, व एकाद्या मंत्रांत चूक झाल्यास ती दुरस्त करण्याचें-ही याचेंच काम आहे.

१ एका लहानशा खळग्यावर, वाटोळीं भोकें पाडून फळ्या बस-वितात, तें स्थान होय.

तेथें सोमवल्ली विकणारा येऊन बसतो. त्याठिकाणीं ऋत्विजांसह यजमान जातो, आणि ही सोमलता विकत घेण्याबद्दलचें बोलणें लावतो. त्यानंतर, सौदा होऊन कायमची किंमत ठरल्यावर, यजमान त्याजला एक गाय देऊन त्याजपासून ती विकत घेतो, व तिला एका रथांत घालून मोठ्या थाटानें आणि समारंभानें यज्ञमंडपांत नेतो. तेथें नेल्यावर, पूर्वद्वारानें प्राग्वंशशाळेंत प्रवेश करून, ह्या सोमराजाला एका तयार केलेल्या आसंदीवर ठेवण्यांत येतें. पुढें, तन्निमित्त आतिथ्येष्टि[3] होऊन ती सोमलता वाळून जाऊं नये म्हणून, तिजवर उदकसिंचन करितात. त्यानंतर पांचव्या दिवशीं, यजमान, प्रतिप्रस्थाता, नेष्टा, उन्नेता, व अध्वर्यु, असे त्या लतेला एका कृष्णाजिनावर ठेवून, तिचा रस काढण्यास बसतात; आणि मंत्र म्हणून अधिषवण[4] फलकांवर ती कुटतात. ही लता कुटतांना तींत पाणी घालावें लागतें, व त्यायोगानें

सोम समारंभ.

सोमरस.

---

१ हिलाच "सोमराजा" अशी बहु मानार्थी संज्ञा आहे. हिला रानडोर देखील म्हणतात. हल्लीं, खरी सोमलता कोठेंही सांपडत नाहीं. सबब, तिच्या ऐवजीं दुसऱ्या प्रकारची वेल घेतात, अशी लोकवार्ता आहे.

२ लांकडाची घडवंची, किंवा काष्टसिंहासन. हें आहवनीयाग्नीच्या दक्षिण बाजूला असतें.

३ अतिथीच्या सत्कारार्थ व्यवस्था. पाहुणचार.

४ सोमरस काढण्याच्या दोन फळ्या.

तिचा रस निघतो. याप्रमाणें सर्व लता कुटून झाल्यावर, तो कुटलेला **सोम** एका भांड्यांत घालून कालवितात. ह्या भांड्याला आधवनीय अशी संज्ञा आहे. ह्या पात्रांत सर्व रस आणि चोथा घातल्यावर, तो एका घडवंचीवर पसरलेल्या वस्त्रांत ओतून गाळतात. तदनंतर, ग्रह व चमस नांवाचीं पात्रें असतात त्यांत तो घालतात, व विशिष्ट कर्मोक्तदेवतांस उद्देशून त्याचें अग्नींत हवन करितात. याप्रकारें सर्व व्यवस्था लागून हवनविधि झाल्यावर जो रस शिल्लक राहतो, तो ऋत्विजांस देण्यांत येतो, आणि तो ते पितात. याप्रमाणें सकाळीं, दुपारीं, व संध्याकाळीं करण्यांत येतें; आणि त्याला प्रातःसवन, मध्यान्हसवन, व सायंसवन म्हणतात. ह्या यज्ञांत यजमानानें फक्त सायंसवनाच्या वेळींच काय तो **सोम**रस[1] प्राशन करण्याचा आहे. हा **सोम**रस **भां**गेसारखाच जरा मादक असे. तथापि, तो मोठा आल्हादकारक असल्याकारणानें, आमचे पुराणपूर्वज तो पीत.

सोमरसपान.

हा **सोम**रस कसा होता, व त्याची रुचि कशी असे, याबद्दलचें अनुमान खालीं लिहिलेल्या ऋचांवरून सहजीं ध्यानांत येण्यासारखें आहे :—

सोमरसाची रुचि.

१ सोमयागासंबंधीं सर्व तपशील ऋग्वेदाच्या ऐतरेय ब्राह्मणांत आहे.

प्रवोभ्रियन्तइन्दवो मत्सरा मादयिष्णवः
द्रप्सामध्वश्चमूषदः ॥ ४ ॥
( ऋ. अ. १. अ. १. व २६. मं. १. अ. ४. सू. १४. )
तीव्राः सोमस आगह्याशीर्वन्तः सुता इमे ।
वायोतान्प्रस्थितान्पिब ॥ १ ॥
(ऋ. अ.१.अ.२.व ८.मं.१ अ.५.सू. २३)

सदरहू ऋचांवरून असा तर्क होतो कीं, हे सोमरस मधुर असत; व त्यांत थोडासा कैफ किंवा मादकपणाही असे. आणि त्याच कारणानें त्यांपासून आल्हाद वाटून, कोणतेंही काम करण्यास हुरूप येई. मात्र, ते जरासे तिखट अथवा झणझणीत असल्यामुळें, त्यांची ती तीव्रता मोडण्याकरितां, त्यांत दूध मिश्रण करण्याचा परिपाठ पडला असावा, असें वाटतें.

पूतिक किंवा फाल्गुन वनस्पतींचा उपयोग.

हल्लीं, कोणी सोमयज्ञ केल्यास, खरी सोमवल्ली कोणासही माहीत नसल्या कारणानें, ती त्याला मिळत नाहीं. सबब, अशा प्रसंगीं तिच्या[3] ऐवजीं पूतिक किंवा

---

१ अहो देव हो, हे पात्रांत घातलेले सोमरस थबथब गळत असून, ते मधूर, मादक, आणि आनन्ददायक आहेत. सबब, ते आह्मीं तुह्मांस अर्पण करितों.

२ हे सोमरस तीव्र ( तिखट किंवा झणझणीत ) असून, त्यांत दुधही घातलें आहे. यासाठीं, हे वायु, तूं येथें ये, व तुला अर्पण केलेले सोमरस पी.

३ " **अनधिगमे पूतिकान् फाल्गुनानि.** " ( आश्वलायन श्रौतसूत्र. ६. ८. ५ )

फाल्गुन नामक वनस्पतींचा उपयोग करण्याविषयीं, आश्वलायन श्रौतसूत्रांत सांगितलें आहे.

ऋक्कालीन सोमनिष्पीडनक्रिया.

ऋग्वेदसंहितेवरून[1] असें दिसतें कीं, त्यावेळीं सोम काढण्याची कांहीं निराळी रीत असे. ही सोमवल्ली कुटण्यासाठीं एका रुंदटशा मोठ्या शिळेचें खोलसें उखळ तत्कालीन ऋषी तयार करीत, व त्यांत ठेचण्याकरितां वरवंट्याच्या आकृतीचें एक मुसळ बनवीत. ह्यांत सोमलता कुटल्यावर, तिचा चांगला रस निघावा म्हणून तींत पाणी घालीत, आणि ज्याप्रमाणें आपल्या बायका ताक करितात, त्याप्रमाणें तत्कालीन ऋषिस्त्रिया ती जलमिश्रित सोमवल्ली रवीच्या दांड्यानें घुसळीत. तदनंतर, ह्या मंथनक्रियेनें त्या चोथापाण्याचा एक जीव झाल्यावर, तो रस दोन भांड्यांत ओतीत, व गाळण्यानें गाळून बैलाच्या कातड्यावर ठेवीत, आणि नंतर देवास अर्पण करीत.

घरोघर सोमयाग.

हा सोमरस बहुतकरून प्रत्येक कुटुंबांत काढीत. कारण, वेदकालांत प्रत्येकाच्या घरीं सोमयाग करण्याचा प्रघात असे, आणि त्याकारणानेंच उखळ मुसळाची तजवीज घरोघर करून ठेवीत.

---

१ ऋग्वेद. अ. १. अ. २. व २५. मं. १. अ. ६. सूक्त. २८. ह्या सर्व सूक्तावरून, सोमरस काढण्यासंबंधीं प्राक्कालीन रीतीचें दिग्दर्शन होतें.

सोमरस काढण्याची हल्लींची रीत कांहीं निराळी आहेसें वाटतें. सबब, तिची थोडीशी हकीकत देणें अवश्य वाटल्यावरून, ती येथें नमुद करितों.

सांप्रतकाळची सोमरस काढण्याची रीत.

सोमयाग करावयाचा असला म्हणजे, प्रथमतः सोमवल्ली विकत घ्यावी लागते. ही वल्ली म्हणजे रानशेराचेंच झाड होय, असें म्हणतात. हें पुण्याच्या आसपास व चतुःशृंगीच्या डोंगरावर पुष्कळ वाजतें. ह्या झाडाला बोटायेवढ्या जाड काड्या असतात. परंतु त्याला पानें किंवा कांटे नसतात. ह्या झाडाचा रंग हिरवा असतो, आणि त्याचा रस किंचित् तुरट लागतो. तथापि, तो प्याल्यानें कैफ वगैरे कांहींच येत नसून, पिण्याला देखील तो रुचकर लागत नाहीं. हें झाड खरी सोमवल्ली नाहीं. तथापि, तें हिच्या ऐवजीं घेण्याविषयीं वेदाज्ञा आहे, सबब त्याचा उपयोग करितात.

रानशेर.

असो. ही सोमवल्ली यज्ञशाळेबाहेर एका ब्राह्मणाकडून विकत घेण्याची आहे. त्याप्रमाणें घेतल्यावर, ती यज्ञशाळेंत नेतात; आणि आप्यायनादि ( म्हणजे ती कोमेजून अथवा वाळून जाऊं नये म्हणून तिच्यावर जलसिंचनाचे वगैरे )

सोमासेचन व निष्पीडन.

१ आश्वलायन श्रौतसूत्र. (६. ८. ५.)

संस्कार झाल्यानंतर, अधिषवण[1] नावांच्या फळयांवर जें एक कृष्णाजिन आंथरलेलें असतें, त्याजवर ती ठेवून ग्राव्यांनीं[2] कुटतात. कुटतांना कांहीं मंत्र म्हणून, तींत पाणी घालतात, आणि एकाद्या मृन्मय अथवा धातुमय[3] पात्रांत ती ओततात. नंतर ती कुसकरतात, व आणखी जास्त पाणी घालून जलमिश्रित करतात. पुढें चांगलें मिसळण झाल्यावर, चोथा पिळून बाहेर काढतात, व रंगाऱ्याच्या घडवंची सारखी एक माची तयार करून, तिजवर रस गाळण्यासाठीं एक वस्त्र टाकतात. ह्या वस्त्राला दशापवित्र, आणि पिळून काढलेल्या सोमवल्लीच्या चोथ्यास ऋजीष ह्मणतात. पुढें, ह्या माचीवर वस्त्र घातल्यावर, त्याला खालच्या अंगाला एक बारिक भोंक पाडून, त्यांत लोंकरीचा धागा ओंवितात, व त्यांतून बारिक धार पडावी अशी तजवीज करितात. तदनंतर, सदरहू जलमिश्रित सोमरस आधवनीयांतून घेऊन, त्या गाळण्यांत ओततात, आणि तो गाळलेला सोमरस, ग्रह, चमस, इत्यादि पात्रांत भरून ठेवितात. मग, अनेक देवता प्रीत्यर्थ ह्या सोमाचें वेदोपमंडपांत हवन करून, तो रस, होम करणारे, वषट्कार ह्मणणारे, उद्गाते, ब्रह्मा, सदस्य, व यजमान, इत्यादि पितात.

सोमहवन व सोमपान.

१ अधिषवणफल म्हणजे ज्यांवर सोम कुटावयाचा असतो, त्या फळ्या होत. ह्या दोन असतात, व त्या प्रत्येकीची लांबी ३६ अंगुळें असून, रुंदी १८ अंगुळें असते.

२ ग्रावे ह्मणजे दगडी वत्तेच समजावयाचे.

३ ह्या पात्रास अधवनीय अशी संज्ञा आहे.

ऋक्संहितेंतील कित्येक ऋचा आणि कथानकें तत्कालीन ज्ञानाची, विद्याभिरुचीची, साहसाची, आणि एकंदर समाजस्थितीची खरी द्योतक असून, तीं निःसंशयच ऐतिहासिक महत्वाच्या आहेत. सबब, त्यांचें अवश्य तितकें दिग्दर्शन थोडक्यांत करितों. कारण, तसें न केलें तर, इतिहासाचें खरें बीज वाचकांच्या ध्यानांत येणार नाहीं; ऋग्वेदाचें यथोचित महत्व त्यांजला कळणार नाहीं; व पौराणिक कथांचें मूळही त्यांच्या दृष्टीस पडणार नाहीं.

ऋग्वेद ऋचांत समाजस्थितीचें व इतिहासाचें बीज.

ऋग्वेदाच्या पहिल्याच सूक्ताच्या दुसऱ्या ऋचेंत असें म्हटलें आहे कीं,

वेदकालीन पूर्वजांचे पुराणपूर्वज.

**अग्निः पूर्वेभिर्ऋषिभिरीड्यो नूतनैरुत ।**
**स देवाँ एह वक्षति ॥ २ ॥**

( अ १. अ १. व १. मं १ सू. १ )

**भावार्थः**—ह्या अग्नीचें स्तवन प्राक्कालीन ऋषींनीं केलें असून, आमच्या सारखी नवी प्रजा ( नूतन ऋषी ) देखील त्याचा स्तुतिपाठ (तो स्तुतीस पात्र आहे म्हणून) गातात. सबब, तो सकल देवांस घेऊन, येथें आगमन करो.

यावरून, ह्या वेदऋचा गाइल्या त्याच्या अगोदरही अनेक ऋषी होऊन गेले असून, ते पुराणतम वेदकालीन ऋषींस देखील पुरातन अथवा प्राक्कालीन होते. ह्यावरून,

त्या प्राक्कालीन ऋषींचें प्राचीनत्व सहजीं ध्यानांत येण्यासारिखें आहे.

ह्याशिवाय, दुसरी आणखी एक गोष्ट विशेष रीतीनें लक्षांत ठेवण्यासारखी आहे. ती ही कीं, आमच्या पुराणतम मानलेल्या वेदकालीन ऋषींस विलक्षण कवनस्फूर्ति असून, ते आयत्या वेळेस देवतांस निमंत्रण करीत; आणि त्यांचा तो भाविक स्तुतिपाठच अपूर्व वेदऋचा बनत. ही त्यांची कवित्वशक्ति फारच प्राचीनकाळचीं दिसून येते. इतकेंच नव्हे तर, आज सुमारें दहाहजार वर्षांपलीकडील काळांत देखील, ती क्वचित बाल्यावस्थेंत, व क्वचित तारुण्यदशेंत असल्याचें भासतें.

त्यांची कवनस्फूर्ति.

तिसरी ध्यानांत ठेवण्याजोगी महत्वाची गोष्ट म्हटली म्हणजे, त्या प्राक्कालीन कवनांकुरांची विलक्षण चमक होय. आमच्या प्रथमकवींचे प्रेमोद्गार आरंभाला क्वचित् बालिश होते खरे. तथापि, ते निःसंशयच तीव्र आणि सतेज असत. यामुळें, ते लवकर क्षीण न होतां, त्यांच्यांत दिवसानुदिवस भावी परिपक्कतेचीच[१] विशेष झांक

तिची तीव्रता, सतेजता, आणि परिपक्कता.

१ हीं परिपक्कतेचीं लक्षणें खालीं लिहिलेल्या ऋचांत दृग्गोचर होतात.

भारतीय साम्राज्य. पुस्तक सातवें. पान ५०।५१ पहा.

(अ) कोददर्श प्रथमं ॥ इत्यादि ऋ. मं. १. अ २२.सू.१६४

(आ) मनः कुतो अधिमजानम् ॥ इ० ऋ. मं.१. अ२२ सू.१६४.

(इ) अचिकित्वां चिकितुषश्चिदत्र ॥ इ० ऋ.मं१.अ२२सू.१६४.

(ई) पाकः पृच्छामि मनसा ॥ इ० ऋ. मं १.अ २२ सू. १६४.

मारूं लागली. इतकेंच नव्हे तर, ह्या उज्ज्वळ आर्यकवनांकुरांनीं आपल्या विविध गुणांची पराकाष्ठेची कोटि भिन्न भिन्न काळीं अगदीं विस्मयकारक रीतीनेंच प्रकट केली. म्हणजे, उपनिषद्कारांत तिनें ज्ञानदीप्तीचा केवळ अतुल प्रकाशच पाडला. कालिदास, भवभूति, इत्यादि कविश्रेष्ठांत, तिनें कवित्वांची अगदीं कमालच करून सोडली. आणि बाण, दण्डी, इत्यादि कविकुलावतंसांत, कल्पनाचातुर्याची तिनें केवळ मूसच ओतली.

स्वतःच्या शिघ्रकवित्वाची जाण.

सदरीं निर्दिष्ट केलेलें स्वतःचें सामर्थ्य व शिघ्रकवित्व, आमचे वेदकालीन पूर्वज अगदीं पूर्णपणें जाणून होते. तथापि, त्याबद्दल त्यांस काडीमात्रही अहंकार वाटत नसे. कारण, ते आपली लीनता देवतांच्या जवळ ठायीं ठायीं व्यक्त करीत. आणि ह्या निरभिमानतेमुळेंच त्यांचा जोम कायम राहिला, व त्यांनीं दिगंतरीं कीर्ति मिळविली.

म्हटल्यावेळेस कवनस्फूर्ति.

असो. शिघ्र कवित्वाच्या संबंधानें आमच्या आर्यपूर्वजांची जी आपल्याबद्दल खात्री होती, ती खालीं लिहिलेल्या ऋचेंत उत्तम प्रकारें व्यक्त होते.

**अयं देवाय जन्मने स्तोमो विप्रेभिरासया ।**
**अकारि रत्नधातमः ॥ १ ॥**

( ऋ. अ. १. अ. २. व १. मं. १. अ. ५ सू. २० ).

ह्या ऋचेंत वेदकालीन ऋषी असें कळवितात कीं, अत्यंत विपुल संपत्ती देणारें असें जें हें स्तोत्र, तें केवळ ऋभुदेवतासाठीं त्यांच्या समक्ष आतांच तयार करून, आपण म्हणत आहों. म्हणजे, हें स्तोत्र पूर्वीं रचलेलें नसून, तें अगदीं आयत्या वेळेसच जसें आलें तसें म्हटलें आहे, असा वेदकवींच्या म्हणण्याचा भावार्थ होय.

कक्षिवानाचें कथानक व

अस्तु. दुसरी एक ऋचा ब्रह्मणस्पतीला[1] अनुलक्षून गाइली असून, तींत उशिजेचा मुलगा जो कक्षीवान् त्याच्याप्रमाणेंच आपल्यालाही तेजःपुंज करण्याविषयीं, वेदकालीन ऋषींची प्रार्थना आहे. ही उशिजा दीर्घतमाऋषीची बायको होय; व हिच्याबद्दलच खालीं लिहिल्याप्रमाणें आख्यायिका असल्याचें कळतें.

त्यावरून वेदऋषींचा प्रभावप्रसार.

कलिंग[2] देशाच्या एका राजास पुत्रसंतान नव्हतें. सबब, त्यानें आपल्या राणीस दीर्घतमाऋषीकडे जावयास सांगितलें. परंतु, हा ऋषी सुरूप नसून वयानें वृद्ध झाला होता. यासाठीं, आपण स्वतः न जातां तिनें त्याच्याकडे आपली उशिज् नांवाची दासी पाठविली. पुढें, तिच्या पोटीं ह्या ऋषीपासून एक पुत्र झाला, व त्याचें नांव त्यानें

---

१ अ १. अ १. व ३४. मं. १. अ ५. सूक्त १८. ऋचा पहिली.

२ हा, महानदी आणि गोदावरी, या नद्यांच्या दरम्यानचा पूर्वकिनाऱ्यावरील प्रदेश होय.' ह्यालाच हल्लीं सरकार अशी संज्ञा आहे.

कक्षीवान् ठेविलें. हाच तदनंतरचा प्रसिद्धीस आलेला कक्षीवान् ऋषि होय. हा अनेक वेदसूत्रांचा प्रवर्तक होता. आणि जरी तो क्षत्रियाच्या दासीचा पुत्र असे, तरी देखील त्याचीं सूक्तें इतर ऋषिप्रणित सूक्ताप्रमाणेंच पूजनीय मानलीं जातात, हें विशेष ध्यानांत ठेवण्यासारिखें आहे.

कलिंग देशांत आर्य-तेजाची प्रखर चमक.

आतां, ह्या कथानकावरून इतकें चांगलें व्यक्त होतें कीं, ही ऋचा गाइली त्या वेळीं, व त्याच्याही अगोदर, पूर्वेकडील थेट कलिंग देशापर्यंत देखील आर्यवीरांचें प्रखर तेज चमकत होतें, आणि त्यांच्या बाहु-बलाची विशेष वाहवा होऊन गेली होती.

ऋभुगण.

ऋग्वेदांतील पहिल्या मंडळाच्या पांचव्या अनुवाकांतलें विसावें सूक्त ऋभु नांवाच्या दिव्य-गणाप्रीत्यर्थ रचलेलें आहे. हे ऋभु प्रथमतः मनुष्यच होते. परंतु, ते आपल्या स्वतःच्या पराक्रमानेंच मागाहून देव झाले. ह्यांच्या ह्या अशा प्रकारच्या स्थित्यंतराबद्दल वेदांत देखील वर्णन आहे.

त्यांचें कथानक.

ह्या ऋभूंचें कथानक फारच चमत्कारिक असून, तें हरएक प्रकारें बोधप्रद आहे. इतकेंच नव्हे तर, तें पूर्वकालीन स्थितीचें द्योतक आहे. सबब, त्यासंबंधीं दोन शब्द लिहिणें अवश्य वाटल्यावरून, ते येथें सादर करतों.

हे ऋभु आंगिरससुधन्वाऋषीचे पुत्र असून, त्वष्टा

त्यांचें चातुर्य व पराक्रमशीलता.

देवाचे शिष्य होते. हे तिघे बंधू असत. एकाचें नांव ऋभु, दुसऱ्याचें विभु, आणि तिसऱ्याचें वाज. हे मोठे गुणवान, पराक्रमी, व पितृभक्त होते. आणि ह्या पितृभक्तीस अनुसरूनच त्यांनीं आपल्या वृद्ध मातापितरांस, वार्द्धक्यावस्थेचे हाल मनांत आणून, पुनश्च तरुण केले. ह्या बंधुत्रयांवर सूर्याची मोठी कृपा होती. त्यामुळें, त्यानें त्यांस अमरत्व दिलें. हे फार कुशल असल्या कारणानें, त्यांनीं आपल्या अष्टपैलु गुणांनीं अखिल देवतांस संतुष्ट राखलें. इन्द्राचे घोडे व रथ ह्यांनींच केले. अश्वींसाठीं हल-

१ अश्विन् शब्दाचा मूल अर्थ म्हटला म्हणजे घोडेस्वार होय. व त्यावरूनच ह्या घोड्यावर बसणाऱ्या देवतांस अश्विदेव म्हणत. हे सुवर्णाच्या रथांत बसून, आपल्या उपासकांस रत्नें आणितात; त्यांस संकटांतून सोडवितात; रोग्यांस बरें करितात; व वृद्धांस तारुण्य देतात; अशी आख्यायिका आहे.

ह्यांजविषयींचें वर्णन यास्कांनीं आपल्या निरुक्तांत खालीं लिहिल्याप्रमाणें दिलें आहे:—( निरुक्त. १२. १ ).

‘ अश्विदेव हे आकाशांत प्रथम दिसतात. त्यांस अश्व ( घोडे ) आहेत, म्हणून अश्विदेव म्हणतात, असें और्णभाव लिहितो. कोणी म्हणतात ते द्यावा पृथिवी होत. कोणी ते दिवसरात्र आहेत असें सांगतात. कोणी ते सूर्यचंद्र असल्याचें मानतात. आणि कांहींकांचें असें मत आहे कीं, हे कोणी महत् पुण्य करणारे दोन राजे असून, तेच अश्विदेव झाले.’ कदाचित ज्यांस आपण हल्लीं अश्विनीकुमार म्हणतों, व ज्यांच्यापासून नकुलसहदेव उत्पन्न झाले, तेच हे असतील, असें वाटतें.

का आणि पृथ्वी सभोंवतीं फिरणारा रथ ह्यांनींच केला. व निरंतर दूध देणारी गाय[1] देखील ह्यांनींच निर्माण केली. तदनंतर, एकदां त्वष्टादेवानें चामस नांवाचें यज्ञपात्र तयार केलें. पुढें तें ऋभूंनीं पाहिल्यावर त्यांनीं आपलें विशेष चातुर्य खर्चून त्याचींच चार सुबक पात्रें केलीं, आणि तीं त्वष्ट्यास दाखविलीं. परंतु तीं पाहून त्वष्ट्यास आनंद न वाटतां, ऋभूंच्या अप्रतीम हस्तकौशल्यानें त्याच्या मनांत विषाद उत्पन्न होऊन, त्यानें त्यांस मारण्याचा प्रयत्न केला. तथापि, त्यांनीं मोठ्या युक्तीनें आपलें संरक्षण केल्यामुळें, त्यांना कांहींच धक्का लागला नाहीं. ऋभु हे मोठे सदाचरणप्रिय असत. त्यामुळें, त्यांची सर्वत्र कीर्ति होऊन, भिन्न भिन्न वेळीं त्यांनीं निरनिराळ्या भक्तांचीं संकटें निवारिलीं.

ऋभूंचें सदाचरण.

[2]यइन्द्रायवचोयुजा ततक्षुर्मनसाहरी ।
शमीभिर्यज्ञमाशत ॥ २ ॥
( ऋ. अ. १, अ. २. व १. मं. १. अ. ६. सू. २० )

[3]तक्षन्नासत्याभ्यां परिज्मानं सुखं रथम् ।
तक्षंन्धेनुं सबर्दुघाम् ॥ ३ ॥
( ऋ. अ. १. अ. २. व १. मं. १. अ. ६. सू. २०. )

---

१ हीच कदाचित् कामधेनु असेल.

२ ऋभूंनीं आपल्या चातुर्यानें हं हं म्हणतां रथास सज्ज होणारे असे दोन घोडे इन्द्राकरता तयार केले, व ते आपल्या पराक्रमानें देवत्वाप्रत पावून, यज्ञ भोगते झाले.

३ त्यांनीं अश्विनीकुमारांसाठीं देखील एक हलकासा पृथ्वीसभोंवतीं फिरणारा रथ तयार केला, आणि एक दूध देणारी गायही निर्मिली

युवाना पितरापुनःसत्यमन्त्रा ऋजूयवः ।
ऋभवो विष्टयक्रत ॥ ४ ॥
( ऋ. अ. १. अ. २. व २. मं. १. अ. ५. सू. २० )
उतत्यंचमसं नवंत्वष्टुर्देवस्य निष्कृतम् ।
अकर्त चतुरः पुनः ॥ ६ ॥
( ऋ. अ. १.अ. २.व २.मं. १.अ. ५. सू २०. )
अधारयन्त वन्हयो भजन्त सुकृतया ॥
भागं देवेषु यज्ञियम् ॥ ८ ॥
( ऋ. अ. १. अ२. व२. मं१. अ५. सू२० ).

आर्यांचें प्राक्कालीन कलानैपुण्य.

ह्या सर्व ऋचांवरून असें उघड दिसतें कीं, वेदकाळांत जे ऋषी उदयास आले, त्यांच्याही पूर्वी अनेक शतकें, किंबहुना हजारों वर्षें, हे ऋभु नांवाचे ऋषिवर्य होऊन गेले असून, ते तितक्या पुरातन काळीं देखील कलाकौशल्यांत निपुण, व्यवसायांत कार्यक्षम, आणि प्रसंगविशेषीं धैर्यावलंबी होते.

ह्याशिवाय, आणखी देखील एक गोष्ट विशेष लक्षांत ठेव-

१ ऋभु हे सत्यवचनी आणि प्रामाणिक असून, त्यांनीं आपल्या चातुर्याच्या प्रभावानें स्वतःच्या आईबापास पुनः तरुण केलें.

२ शिवाय, अहो ऋभु हो, त्वष्ट्या देवानें तयार केलेल्या एका यज्ञाच्या पेल्याचे तुम्ही चार पेले बनविलेत.

३ यज्ञनिष्पादक ऋभु हे मरणापासून बचले जाऊन अमर्त्य झाले. आणि आपल्या सुकर्मानें व पुण्यशील वर्तनानें देवांच्या कैलासास चढून, यज्ञहविर्भाग भोगते झाले.

सत्याविषयींचें त्यांचें प्राक्कालीन प्रेम, व

ण्यासारखी आहे. ती ही कीं, सदरहू पुरातन ऋभूंस आमच्या वेदऋषींनीं सत्यवचनी आणि प्रामाणिक अशीं उपपदें लाविलीं आहेत. त्यावरून, तितक्या पुरातन काळीं सुद्धां, आमचे पूर्वज केवळ ज्ञानसंपन्न अथवा कलाकुशलच नव्हते. तर, मनाची सरलता, व सत्याची प्रीति, हे गुण देखील श्रेष्ठतर मानून, ते त्यांनीं संपादन केले होते; आणि त्यांतच ते धन्यता मानीत. अशा प्रकारची आमच्या

पुरातन समाजस्थितीचें खरें वळण.

पुण्यपूर्वजांची सत्यावरील प्रीति व तद्विषयक उदारबुद्धि ठायीं ठायीं व्यक्त होते. आणि ती आर्यपिंडांत व आर्यसमाजस्थितींत जणूकाय खिळूनच राहिली आहे, असें भासतें.

ऋतेन यावृतावृधा वृतस्य ज्योतिषस्पती ।
तामित्रा वरुणा हुवे ॥ ५ ॥

( ऋ. अ. १ अ. २. व ९. मं. १. अ. ५. सू. २३. )

**भावार्थः**—मित्रावरुण हे सत्यापासून उद्भवणाऱ्या प्रकाशाचे स्वामी असून, ते सत्याचरणानें सुप्रसन्न होतात. सबब, ( सदाचरण करणारे व नीतिमार्गानें प्रवर्तणारे ) आम्ही त्यांस बोलावितों.

पौरस्त्यांची स्वभावतः सत्यप्रियता, व पाश्चात्यांचें नीतितत्व.

हें अशाप्रकारचें जें आमच्या पुराण भारतीयांचें नीतिनैपुण्य, हा जो त्यांचा मुळचाच सरळ स्वभावांकुर, आणि ही जी त्यांची अपूर्व सत्यप्रियता, इत्या-

दांच्या मुकाबिल्यास आपल्याला अन्यत्र कोठें तरी दुसरें उदाहरण मिळेल काय? किंवा, भारतीय आर्यांची ही सत्यावरील निष्ठा, दुसऱ्या कोणत्याही पौरस्त्य अथवा पाश्चात्य राष्ट्रांत इतक्या पुरातन काळीं, कोठें तरी दृष्टिगोचर होईल काय? अथवा, आज हजारों वर्षांपासून चालत आलेला हा प्रामाणिकपणा, अन्य राष्ट्रांत अशा तऱ्हेनें अगदीं बालपणापासूनच पिंडांत खिळलेला दृष्टीस पडेल काय? खचितच नाहीं. आणि ही गोष्ट अनेक प्रमाणांनीं सिद्ध होण्यासारखी आहे.

ग्रीस देशांतील सदाचरणाचें बीजारोपण.

पाश्चात्य देशांपैकीं, विद्या, कला, आणि कौशल्य, इत्यादि संबंधानें, ग्रीस देश हा प्राचीन काळांतील सुधारलेल्या राष्ट्रांत केवळ धूरीणत्वानेंच मोडतो. परंतु, पुराणकाळच्या ह्या उन्नत म्हणून मानलेल्या देशाची प्राथमिक समाजस्थिति व नीतितत्व पाहिलें; अथवा, तेथें सत्याचें बीजारोपण कोणत्या दिशेनें केलें होतें, आणि त्याचा कशाप्रकारें उठाव झाला, याविषयींचा विचार केला; तर, त्यापासून मनाला काडीमात्र सुद्धां आनंद न वाटतां, उलट पाश्चात्यांनीं घालून दिलेला तो नीतितत्वाचा धडा, आणि प्रजेस लाविलेलें तें अमंगळ वळण पाहून, आपलें मन माघार घेतें, व तत्कालीन नीतिशैथिल्याबद्दल अतीव खिन्नता वाटते.

स्पार्टातल्या तरुण प्रजेस निंद्य कर्मांत मिळालेलें उत्तेजन.

ह्यासंबंधाचा प्रत्यक्ष दाखला पाहावयाचा असल्यास, आपल्याला फार दूर जावयास नलगे. कारण, तो ग्रीसच्या इतिहासांतच सांपडतो. आणि त्या

वरून असें दिसतें कीं, स्पार्टांतील तरुण प्रजेस चोरी करून आपल्या निर्वहाची तजवीज लावण्यास, अथवा दरवडा घालून हवें तें मिळविण्यास, केवळ मनसोक्त परवानगीच असे. इतकेंच नव्हे तर, अशा प्रकारचें अति निंद्य कर्म आचरण्यास, त्या प्रजाजनांस अगदीं प्रत्यक्ष रीतीनेंच उत्तेजन मिळे, यांत बिलकुल शंका नाहीं. मात्र, इतकेंच कीं, चोरी करणारानें, किंवा दरवडा घालणारानें, अशा प्रकारचें पापकर्म मोठ्या बहादुरीनें, फार शिताफीनें, व कोणत्याही प्रकारें मागमूस न लागे अशा रीतीनें केलें पाहिजे; आणि हा केलेला गुन्हा पचविण्याचें त्याच्यांत सामर्थ्य पाहिजे. नाहीं तर, त्याचें कृत्य उघडकीस आल्यावर, त्याला फार कडक शिक्षा होई.

प्लूटार्कनें सांगितलेली एक कोल्हे चोरीची गोष्ट.

ह्यासंबंधानें, प्लूटार्क हा एक अशी गोष्ट सांगतो कीं, ग्रीस देशांत एका मुलानें एका गृहस्थाचें एक कोल्हें चोरलें. पुढें, ही केलेली चोरी बेमालूम रीतीनें छपविण्यास कोणतेंही साधन नसल्यामुळें, त्यानें तो शेवटीं आपल्या अंगरख्यापाशीं अगदीं पोटाजवळ लपविला. पण, तो

---

1 " They (Spartan youths) *were even encouraged to steal whatever they could*; but if they were cought in the act, they were severely punished for their want of dexterity. Plutarch tells us of a boy who having stolen a fox, and hid it under his garment, chose rather to let it tear out his very bowels than be detected in the theft."

( The Student's Greece. By W. Smith L. L. D. )

सदर्हू इंग्रजी अवतरणांतील इतालिक वर्ण आमचे आहेत

अशा हेतूनें कीं, आपलें पोट फाडून त्यांतील आंतडीं त्या कोल्ह्यानें काढलीं तरी बेहेत्तर. परंतु, आपण केलेलें कृत्य उघडकीस येऊं नये. याप्रमाणें, येवढें मोठें धारिष्ट करून त्यानें तो कोल्हा अगदीं बेमालूम छपविला, आणि केलेली चोरी अजिबात जिरविली.

याहीपेक्षां पुराणकालाच्या नीतितत्वाचा मासला.

पण, हें तर कांहींच नाहीं. कारण, पाश्चात्यांच्या नीतितत्वाचें विशेष मासल्याचें उदाहरण, याहीपेक्षां पुराणतरकालीं, आणि पालेस्टाईन, निनिव्ही, व बाबिलन्[1], यांच्याही पलीकडील कालांत दृष्टीस पडतें. इतकेंच नव्हे तर, आपणांस सुधारलेले म्हणून म्हणविणारे, आणि सर्व जगांत केवळ आपणच अकलेचे खंदक आहोंत असें समजून आपल्याच शहाणपणाचा टेंभा पाझळणारे, जे कित्येक पाश्चात्य, त्यांनीं निःसंशय अति पवित्र मानलेल्या अशा ईश्वरप्रणित धर्मग्रंथांतच तें प्रत्यक्ष दिसून येतें.

पाश्चात्यांनीं मानलेल्या पवित्रधर्मग्रंथांतील नीतितत्वाचें उदाहरण.

आतां, हा ग्रंथ म्हटला म्हणजे पवित्र बायबल होय. ह्यांत एके ठिकाणीं असें म्हटलें आहे कीं, "ईश्वराच्या पुत्रांनीं मनुष्यांच्या बायकांकडे अवलोकन केलें. आणि त्या सुरूप आहेत असें पाहून, ज्यानें त्यानें आपापल्या इच्छेनुरूप त्यांस उचललें, व आपल्या आवडी-

---

१ पाश्चात्य देशांत, व पाश्चात्यांच्या मतें, हीब्यूलोक व हीब्यूराष्ट्र हें अतिप्राचीन होय. आणि त्यांजविषयींच बायबलांत विशेष रीतीनें उल्लेख आहे

प्रमाणें त्यांस स्वतःच्याच स्त्रिया बनविल्या." खरोखर, अशा नीतितत्त्वाच्या मासल्यास काय म्हणावें! आणि त्याला कोणती तरी उपमा द्यावी! अर्थात्, त्यामुळें कोणासही सहजीं किळस येण्यासारखा आहे.

ईश्वरप्रणित धर्मग्रंथानें पाश्चात्यांस धडा घालून दिलेल्या नीतितत्वाचें आणखीही एक सोज्ज्वल उदाहरण आहे. आणि तें पाहिलें म्हणजे तर, कांहीं पाश्चात्यांच्या पोकळ अभिमानाचें, व नीतिसंबंधीं त्यांच्या निष्कारण गर्वाचें, अगदीं हसूंच येतें. ह्या पवित्र धर्म पुस्तकांत, ईश्वराची आपल्या पुत्रांस एके ठिकाणीं अशी आज्ञा आहे कीं, "ज्यापेक्षां प्रभूनें स्त्रीला पुरुषाच्या बरगडींतून उत्पन्न केलें आहे, आणि ज्यापेक्षां तीं दोघेंही एक जीवच आहेत, त्यापेक्षां पुरुषानें आपल्या मातापितरांची पर्वा न करितां, त्यांस बेलाशक सोडून द्यावें; व त्यानें फक्त आपल्या बायकोसच जोंबाळून रहावें." अरेरे! केवढा तरी हा प्रमाद?

---

१ ह्यासंबंधानें, आमचीं नीतितत्वें निःसंशय विशेष प्रशंसनीय आहेत. कारण, त्यांत, मातापितरांची व गुरूची आज्ञा प्रेमपूर्वक पाळण्याविषयीं, फारच निक्षून सांगितलें आहे.

**यावत्त्रयस्ते जीवेयुस्तावन्नान्यं समाचरेत् ।**
**तेष्वेव नित्यं शुश्रूषां कुर्यात् प्रियहितेरतः ॥ २३५ ॥**
(म० स्मृ० अ० २).

२ सदरहू दोन्ही उदाहरणासंबंधीं, बायबलांतील शब्द खालीं लिहिल्याप्रमाणें आहेत.

"That the Sons of God saw the daughters of

( पुढें चालू )

नीतितत्वाचा हा, व अशाच प्रकारचा कित्ता पाश्चात्यांनीं गिरविला असल्यामुळें, नीति आणि प्रकृतिसौजन्य, इत्यादि सात्विक गुणांत, ते आम्हां भारतीयांची[1] केव्हांही बरोबरी करूं शकलेच नाहींत, व शकणारही नाहींत, यांत विशेष नवल नाहीं.

नीति आणि प्रकृति-सौजन्यांत हिंदूंची इतरांवर छाप.

असो. पहिल्या मंडलाच्या सहाव्या अनुवाकांतील चोविसाव्या सूक्तांत, शुनःशेपाच्या बंधविमोचनाचा त्रोटक वृत्तान्त आहे. त्याची हकीकत[2] अशी आहे कीं, फार प्राचीन काळीं हरिश्चंद्र नांवाचा एक मोठा विख्यात राजा होऊन गेला. हा वेधसाचा मुलगा असून, ह्याला शंभर बायका होत्या. परंतु कोणाच्याही पोटीं पुत्रसंतान म्हणून बिलकूल

शुनःशेपाचें कथानक.

---

( मागील पृष्ठावरून पुढें चालू. )

men that they were *fair*; and *they took them wives of all they chose.*"

( Genesis. ch. VI, 2.. )

"Therefore *shall a man leave his father and his mother*, and *shall cleave unto his wife*; and they shall be one flesh."

( Genesis. ch. II. 24. ).

ह्या अवतरणांतील इतालिक वर्ण आमचे आहेत. ( ग्रंथकर्ता. )

१ हिंदूंची.

२ ही कथा ऐतरेय ब्राह्मणांत, ऋग्वेदांत, आणि इतर ठिकाणीं देखील दिली आहे.

नव्हतें. त्यामुळें त्यास खिन्नता वाटून, त्यानें नारदास[1] पुत्रप्राप्तीचें फल विचारिलें. तेव्हां, पुत्रापासून सर्व कांहीं प्राप्त होतें, असें ह्यानें त्यास कळविलें. पुढें, हरिश्चंद्रानें नारदास पुत्रप्राप्तीचा उपाय विचारला. त्यावेळीं ह्यानें त्यास वरुणाकडे जावयास सांगून, आपल्यास जो पुत्र होईल तो आपण बळी देऊं, म्हणून त्याची प्रार्थना करावयास सुचविलें. तदनंतर, हरिश्चंद्रानें त्याप्रमाणें केल्यावर, ती गोष्ट वरुणानें मान्य केली, आणि त्याच्या इच्छेनुरूप हरिश्चंद्रास तारामतीचे पोटीं एक पुत्ररत्न झालें. पुढें, चालीप्रमाणें योग्य वेळीं जातकर्म होऊन, त्याचें नांव रोहित ठेविलें, व त्यानंतर आपलें पूर्वीचें वचन पाळण्याविषयीं वरुणानें राजास कळविलें. तेव्हां ह्यानें त्यास कळविलें कीं, हा मुलगा लहानाचा मोठा होऊन कवच धारण करण्यालायक झाला, म्हणजे तो कृतप्रतिज्ञेप्रमाणें बळी देण्यांत येईल. त्याप्रमाणें, वरुणानें ती गोष्ट कबूल केली, व रोहित हा योग्य उमरीचा झाल्यावर राजानेंही झालेला सर्व वृत्तान्त त्यास कळविला. परंतु, बळी जाण्याचें नाकबूल करून, तो राजपुत्र धनुष्यबाण घेऊन अरण्यांत पळून गेला.

हरिश्चंद्रास पुत्रप्राप्ति.

अशाप्रकारें, हरिश्चन्द्राची प्रतिज्ञा भ्रष्ट झालेली पाहून, वरुणानें त्याजवर आपला शह बसविला, व त्यामुळें त्याला उदराची व्यथा होऊं लागली. ही

पुत्रबळी देण्याविषयींच्या त्याच्या प्रतिज्ञेचा भंग

---

१ हरिश्चंद्राच्या घरीं नारद व पर्वत असे दोन मुनी राहत असत. त्यांपैकींच नारद हा एक होय.

गोष्ट रोहिताला अरण्यांत एक वर्षानें कळली. सबब, तो राजाच्या भेटीसाठीं परत घराकडे वळला. परंतु इन्द्रानें त्याला ब्राह्मणाच्या रूपानें भेट देऊन अनेक वेळा मागें फिरविलें, आणि अरण्यांत प्रयत्न करण्याविषयीं सांगून, त्याला सात वर्षेंपर्यंत घरींच जाऊं दिलें नाहीं. त्यामुळें, तो इतकीं वर्षें तसाच अरण्यांत राहिला. पुढें, फिरतां फिरतां, एके दिवशीं रोहिताला अजीगर्त नांवाचा क्षुत्-पीडित ऋषि अकस्मात् दृष्टीस पडला. हा सूयवसाचा पुत्र असून, त्याला तीन मुलगे होते. एकाचें

अजीगर्त व त्याचे तीन पुत्र.

नांव **शुनःपुच्छ**, दुसऱ्याचें **शुनःशेप**, आणि तिसऱ्याचें **शुनोलांगूल**. ह्या सर्वांची दीनावस्था पाहून रोहितानें अजीगर्तास विचारिलें "हे ऋषे, ह्या तुझ्या तीन पुत्रांपैकीं मजला तूं एक दिलास तर, त्याबद्दल मी तुला शंभर गाई देऊन आपली मोकळीक करून घेईन.'' तदनंतर वडील मुलगा बापाचा, व धाकटा आईचा लाडका असल्याकारणानें, मधला जो शुनःशेप ह्यासच देण्याचें त्या मातापितरांनीं ठरविलें; आणि रोहितापासून शंभर गाई घेऊन त्यास तो विकत दिला.

पुढें, शुनःशेपास घेऊन रोहित आपल्या बापाजवळ गेला, आणि आपली मुक्तता होण्यासाठीं हा पुरुष हजर केला आहे, असें त्यास कळाविलें. हरिश्चन्द्रानें हा बळी कबूल करण्याविषयीं वरुणाची प्रार्थना केली; व क्षत्रियापेक्षां

शुनःशेपाचा विक्रय.

ब्राह्मण बळी प्रियकर असें वरुणास वाटून, त्याला ती गोष्ट मान्य झाली, आणि त्यानें राजसूय यज्ञ करावयास सांगितला.

त्याचा बळी.

याप्रमाणें, यज्ञाची अवश्य ती सर्व तयारी झाल्यावर, बळी देण्यासाठीं शुनःशेपास यज्ञभूमी कडे नेलें. त्यावेळीं हरिश्चन्द्राचा होता विश्वामित्र, अध्वर्यु जमदग्नि, ब्रह्मा वसिष्ट, आणि उत्गाता अयास्य ऋषि, याप्रमाणें होते. शुनःशेपास यथाविधि तयार करून आणिल्यावर, त्याला युपाला बांधण्यास कोणी

त्याचें बंधन व त्याच्या वधाची तयारी.

देखील तयार होईना. तेव्हां त्याचा बाप अजीगर्त म्हणाला जर मजला आणखी शंभर गाई मिळतील, तर मी याला खचित बांधीन. त्यावरून, त्याला आणखी शंभर गाई देऊन, त्याजकडूनच शुनःशेपाला यूपास बांधविलें. नंतर, त्याला मारण्याची वेळ आली. परंतु, तेव्हांही त्याचा वध करण्यास कोणचि तयार होईना. त्यावेळीं, त्याचा बाप पुढें सरसावून ह्मणाला, मजला आणखी शंभर गाई मिळाल्यास मी ह्याचा शिरच्छेद करीन. त्यामुळें, त्याला आणखी शंभर गाई दिल्या व तो तलवार घेऊन आपल्या पुत्रास मारण्यास सिद्ध झाला. त्यावेळेस, आपण आतां खरोखरच प्राणांस मुकणार असें शुनःशेपाला वाटून, त्यानें प्रथमतः प्रजापतीचा धांवा[1]

---

१ कस्यनूनं कतमस्यामृतानां मनामहे इ० ॥ १ ॥

त्यानें केलेला धांवा, व त्याचें फळ.

केला; आणि त्यानंतर अग्नि[1], सविता[2], वरुण[3], पुनश्च अग्नि, विश्वेदेव, इन्द्र, अश्वी, व उषा, यांची करुणा भाकली. त्याकारणानें, सर्वांस दया येऊन, शुनःशेपाचे पाश हळू हळूं तुटत चालले; आणि प्रत्येक ऋचा संपतांक्षणींच हरिश्चंद्राचें उदरही कमी कमी होत गेलें. तदनंतर, शेवटली ऋचा म्हटल्याबरोबर शुनःशेप अगदीं मोकळा झाला, व हरिश्चन्द्र राजास देखील उदर नाहींसें झाल्यासारखें वाटलें.

शुनःशेपाचें दत्तविधान.

पुढें, त्या दिवसाचा यज्ञविधि विश्वामित्रादि ऋषींनीं शुनःशेपाच्या हातूनच करविला; व सर्व विधि उरकल्यावर, विश्वामित्रानें शुनःशेपास आपल्या मांडीवर दत्तक घेतलें. त्यावेळीं, आपला मुलगा आपल्यास परत मिळावा म्हणून, अजीगर्तानें पुष्कळ तक्रार केली. परंतु, तिजपासून कांहीं एक उपयोग झाला नाहीं. कारण, एकतर खुद्द शुनःशेपच आपल्या पहिल्या घरीं जावयास नाकबूल झाला. आणि दुसरें असें कीं, काळाच्या जबड्यांतून त्याला देवांनीं सोडविल्यामुळें, तो देवरात होऊन त्याला प्रत्यक्ष विश्वामित्रांनींच दत्तक घेतलें, सबब त्यांनीं त्यास पुनश्च परत देण्याचें नाकारलें.

सदर्हू शुनःशेपाच्या कथानकावरून येवढें चांगलें व्यक्त

---

१ अग्नेर्वयं प्रथमस्यामृतानां मनामहे इ० ॥ २ ॥

२ अभित्वा देवसवितरीशानं इ० ॥ ३ ॥

३ अबुध्नेराजा वरुणो इ० ॥ ७ ॥ (ऋ. मं. १. अ. ६. सू. २४).

त्यावरून प्राक्कालीन चालीचें दिग्दर्शन.

होतें कीं, वेदकालीं म्हणजे कृतायुगांत, पुरुषमेध करण्याची चाल असे. इतकेंच नव्हे तर, विश्वामित्र क्षत्रिय कुळांतला असूनही, त्यानें ब्राह्मणवर्गांतला अजीगर्ताचा मुलगा जो शुनःशेप त्यास दत्तक घेतला. त्यावरून, त्याकाळीं ब्राह्मण क्षत्रियांचा, किंबहुना अन्य वर्णांचाही शरीरसंबंध व परस्पर रोटीव्यवहार होत होता, यांत शंका नाहीं. आतां, पुरुषमेधाची चाल मात्र खरोखरच रानटी दिसते; व ती आर्यांच्या एकंदर सुधारणेस, त्यांच्या उदार बुद्धीस, आणि त्यांच्या करुणाशील व ज्ञानपरायण वृत्तीस मुळींच शोभण्यासारखी नाहीं, असें म्हटल्यावांचून राहवत नाहीं. मग, ती कशी प्रचारांत आली असेल ती असो !

वेदांचा अर्थ, व त्यांजवरील टीका.

येथपर्यंत, ऋक्संहितेंतील ठळक ठळक आणि ऐतिहासिक महत्वाच्या गोष्टींचा उल्लेख झाला. सबब आतां, वेदांचा अर्थ करण्याच्या संबंधानें, अथवा त्यांचा सामान्य जनास बोध व्हावा एतदर्थ, कोणाचे कशाप्रकारचे परिश्रम आहेत, याविषयींचें यथावकाश विवेचन करूं.

तत्संबंधीं शंका आणि तिचें निवारण.

वेद हे ईश्वरप्रणित असल्याचें पूर्वीच निवेदन केलें असून, ते अपौरुषेय आहेत असें आम्हीं भारतीय मानतों. तेव्हां, त्यांचा अर्थ करावा किंवा करूं

१ भारतीय साम्राज्य. पु. २. ( पान ४६–५१ ).

नये, ह्याबद्दल मोठाच प्रश्न आहे. हा वादविवाद आजकालचा नसून, तो प्राचीन कालापासूनच चालत आला आहे. कारण, वेदांवरील अत्यंत पुरातन टीकाकार जे यास्कऋषि, त्यांनीं सुद्धां एतद्विषयक ऊहापोह करून, शेवटीं वेदार्थनिषेधक मंडळींचें चरचरीत खंडन केलें. ते म्हणाले,

**स्थाणुरयं भारवाहः किलाभूद्**
**धीत्य वेदान्न विजानाति योऽर्थम् ।**

वेदांचें अध्ययन करणारास जर त्यांतला अर्थच कळत नाहीं, तर तो केवळ भार वाहणाऱ्या खांबाप्रमाणेंच निरुपयोगी होय. सबब, त्यांतील गूढ अर्थ लोकांत समजेसा करणें, हें विशेष इष्ट आणि फारच आवश्यकतेचें वाटल्यावरून, त्यांनीं त्या सत्कृत्यास हातबोट लाविलें. पुढें, सुप्रसिद्ध सायणाचार्यांस देखील प्रथमारंभीं हीच अडचण आली. परंतु, त्यांनीं सुद्धां त्या अडचणीचें यथान्याय निराकरण करून, अखिल जनांस वेदार्थज्ञानामृत पाजण्याचा निश्चय केला, आणि पुढें तें गाडें सुरळीत चाललें.

वेदांतलिशब्दांचा कोश

आमच्या ऋक्कालीन ऋषींनीं ऋग्वेदाच्या ऋचा गाइल्यावर, कालान्तरानें त्यांतील शब्दकाठिण्य आणि भाषाक्लिष्टता, हीं थोड्या बहुत प्रमाणांनीं आपोआपच भासमान होऊं लागलीं. त्यामुळें, ही गरज भागवून, अशा प्रकारच्या उणीवेचें व अडचणीचें निवारण व्हावें एतदर्थ, वेदांतील कठिण शब्दांचाच अगोदर अर्थ देण्याविषयींचा प्रथम यत्न सुरू झाला.

ह्या वेदशब्दार्थयत्नालाच निग्रंथु असें नामधेय असून, "निग्रंथु" शब्दाचा "निघंटु" असा अपभ्रंश झाला आहे. व अशा प्रकारचे निघंटुग्रंथ रचणारांस, अथवा वेदशब्दकोशकारांस, नैघंटुक अशी संज्ञा असे. शुक्लयजुर्वेदाचें निगम परिशिष्ट आणि अथर्वसंहिता, यांजवर देखील अशाप्रकारचे निघंटु किंवा शब्दार्थकोश असल्याचें समजतें.

निघंटु.

या निघंटूचीं पांच पुस्तकें असून, पहिल्या तीन पुस्तकांत पर्यायशब्द दिले आहेत. चवथ्या पुस्तकांत वेदांतील कठिण शब्दांचा अर्थ सांगितला आहे. आणि पांचव्यांत वेदांतील अनेक देवतांचें वर्गीकरण केलें आहे.

त्यांतील विषयविवेचन.

ह्या निघंटूवरच यास्काची वृत्ति आहे. हींत मूल शब्दार्थाचें जास्त विवरण आणि विशेष स्पष्टीकरण करण्याचा प्रयत्न केला असून, ही वृत्ति फार पुरातन असल्याचें दिसतें. हिला निरुक्त अशी संज्ञा आहे. ह्या निरुक्ताचीं मुळची बाराच पुस्तकें होतीं. परंतु त्यांतच आणखी दोन पुस्तकांचा समावेश होऊन, त्या सर्वांमिळून एकंदर चवदा पुस्तकांची संख्या झाली.

यास्ककृत निरुक्ति.

वेदांगें म्हणून ऋग्वेदाचा जो परिशिष्टादाखल भाग आहे, त्यांतच ह्या निरुक्ताचा समावेश केला आहे.

निरुक्ताची वेदांगांत गणना.

हीं वेदांगें सहा असून, तीं पूर्व निवेदनाअन्वयें, खालीं लिहिल्याप्रमाणें समजण्यांत येतात. १ शिक्षा, २ छन्दस, ३ व्याकरण, ४ निरुक्त, ५ ज्योतिष, आणि ६ कल्प.

निरुक्तांत, पर्यायशब्दांखेरीज, व्याकरणाचा प्रादुर्भाव.

निरुक्तांत ज्याप्रमाणें पर्याय शब्द देऊन कठिण शब्दांचा अर्थही सांगितल्याचें दिसतें, त्याचप्रमाणें त्यांत व्याकरण संबंधीही सर्व साधारण आणि सामान्य कल्पनांचा प्रथमतःच प्रादुर्भाव होऊं लागल्याचें भासतें. आतां, ह्या निरुक्तांचा काल कोणता असावा, याविषयींची जिज्ञासा सहजीं उत्पन्न होण्यासारखी आहे. सबब, त्याबद्दलही थोडेंसें विवेचन केलें पाहिजे. यास्क निरुक्तकार हा बराच पुरातन असावा, असें वाटतें. कारण, ह्याचें नांव पैंगी असून, हें नामधेय शतपथ ब्राह्मणांत दृष्टीस पडतें. तसेंच, ह्याच्या नांवाचा प्रत्यक्ष उल्लेख सर्वश्रुत ऋक्प्रातिशाख्य सूत्रांतही केला असल्याचें दिसतें.

यास्क काल,

शिवाय, कृष्णयजुर्वेदसंहिताविधान यास्कानेंच केलें असल्याविषयीं, भट्टभास्कर मिश्राच्या लेखावरून ध्वनित होतें. परंतु, येवढ्यानेंच त्याच्या पौराणत्वाची सिद्धता होत नसल्यामुळें, ज्यास्त शोध करितांना असें कळून येतें कीं, हा वैशंपायनाचा शिष्य असून तित्तिरीचा गुरु होता. इतकेंच नव्हे तर, यास्काचें नांव पाणिनीच्या सूत्रांत देखील आढ-

ळून येतें. त्यावरून तो पाणिनीच्यासुद्धां पूर्वी उदयास आल्याचें उघड होतें.

व त्याची पाणिनीच्या कालावरून सिद्धि.

आतां, पाणिनीचा काल इ. स. पूर्वी सातशें वर्षें असल्याविषयीं, विद्वन्मुकुटमणि डा॰ रामकृष्ण गोपाळ भांडारकर यांचें[1] मत असून, यास्क आणि पाणिनी यांच्यांत बराच काल गेला असल्याबद्दल, जर्मन पंडित वेबेर[2] यांचा अभिप्राय आहे. त्यावरून, यास्क हा वेदकालाच्या अगदीं शेवटीं शेवटीं, व पाणिनीच्या अगोदर बरींच शतकें होऊन गेला असल्याविषयीं, मुळींच संशय नाहीं.

निरुक्त ग्रंथाच्या एकंदर अवलोकनानें, इतकें सहजीं ध्यानांत येण्यासारिखें आहे कीं, शब्दव्युत्पत्तीच्या संबंधानें आमच्या पूर्वजांनीं त्यांत जे परिश्रम केले आहेत, तसे, तितक्या पुरातन काळीं, पृथिवीच्या पाठीवर अन्य कोणत्याही राष्ट्रानें केले नव्हते. आणि म्हणूनच, इतर शास्त्र व कलांप्रमाणें, भाषेच्या ह्या शास्त्रांत देखील आम्हां भारतीयांचेंच अग्रेसरत्व कबूल करणें भाग पडतें; आणि मोठमोठे पंडित सुद्धां तें निमुटपणें कबूल करितात.

ग्रीस देश सर्व शास्त्रांत निपुण व अखिल कलासमुच्चयांत पुढें सरसावलेला होता, म्हणून त्याची ख्याति आहे.

---

[1] Ecarly History of the Dekkan. पंडित सत्यव्रतसामश्रमीच्या अभिप्रायाप्रमाणें, पाणिनीचा काल इ. स. पू. २४०० वर्षें असल्याचें होतें. ( मागें पान ८७ पहा. )

[2] History of Indian Literature. P. 26.

परंतु भारतीय विज्ञानसूर्यापुढें तो केवळ काजव्यासमानच भासूं लागतो; आणि ह्याच्या प्रकाशदीप्तीमुळें, त्याचें तेज सहजीं मावळलेसें दिसतें.

ह्याविषयीं विवेचन करीत असतांना, एके ठिकाणीं सुप्रसिद्ध विद्वान व अनेक भाषाकोविद डाक्तर मोक्षमुलर असें लिहितात कीं,

" There are some discussions in the beginning of the *Nirukta*, which are of the highest tnterest, with regard to Etymology.

While in Greece, the notions of one of her greatest thinkers, as expressed in the Cretylus, represent the very infancy of Etymological science, the Brâhmans of India had treated some of the vital problems of Etymology with the utmost sobriety. "

( Muller's Ancient Sanskrit Literature ).

खालीं लिहिलेले निरुक्तकार यास्काच्याही अगोदर उद्यास आले असल्याचें कळून येतें.

१ अग्रायण २ औदुंबरायण, ३ और्णवाभ, ४ कात्थक्य ५ कौत्स, ६ क्रौष्टुकि, ७ गार्ग्य, ८ गालव, ९ चर्मशिरस्, १० तैटीकी, ११ वार्ष्यायणि, १२ शतबलाक्ष, १३ मौद्गल्य, १४ शाकटायन, १५ शाकपूणि, १६ शाकल्य, आणि १७ स्थौलाष्टीवि.

यास्काच्या पूर्वी जे निरुक्तकार ( नैरुक्त ) आणि वैयाकरणी होऊन गेले, त्यांचीं नांवें त्यानें दिलीं आहेत. त्याव-

---

[१] Sir William Jones, Max Mnller, Sir Moniar Williams यांचे लेख पहावेत.

रून, त्यावेळीं, विद्येच्या ह्या महत्वाच्या शाखेसंबंधीं बरीच चळवळ असल्याचें भासमान होतें; व विद्यामृतपरिपाकाच्या सुचिन्हाचें जणूकाय सजीव चित्रच आपल्या डोळ्यापुढें प्रत्यक्ष उभें रहातें.

यास्क निरुक्तावर दुर्गाची टीका.

विशेष स्पष्टीकरणार्थ, यास्काच्या निरुक्तावर दुर्गानें टीका केली आहे. परंतु, ही फारशी पुरातन नाहीं. कारण, ती इ. स. च्या तेराव्या[1] शतकातील असल्याचें दिसतें.

निघंटूवर देवराजयज्वनूची व्याख्या, व त्याच्या पूर्वीचे वृत्तिकार.

यास्काप्रमाणें देवराजयज्वन् यानें सुद्धां निघंटूवर व्याख्या केली आहे. हा इ. स. च्या पंधराव्या[1] किंवा सोळाव्या शतकांत उदयास आल्याचें कळून येतें. ह्याच्या लिहिण्यावरून, निघंटूवर व्याख्यार्थवृत्ति करण्यासंबंधाचे प्रयत्न, आणखीही कित्येक विद्वानांनीं केले असल्याचें होत असून, भट्टभास्कर मिश्र, माधवदेव, भवस्वामी, गुहदेव, श्रीनिवास, भरतस्वामी, आणि उवट्ट, इत्यादि आपल्या पूर्वी होऊन गेले, व त्यांनीं वेदभाष्य केलें, असें देवराजयज्वन् म्हणतो.

यास्कानंतर, स्कन्दस्वामी शिवाय निघंटूवर साद्यन्त

---

१ वेबरकृत भारतीय ग्रंथसंपत्तीचा इतिहास. पान ४१ पहा. ( आवृत्ति दुसरी )

१ वेबरकृत संस्कृत भाषेचा इतिहास पहा.

निघंटूवर स्कन्दस्वामीची टीका.

व्याख्या करणारा असा दुसरा कोणीही वृत्तिकार उदयास आला असल्याचें आढळून येत नाहीं. देवराजयज्वनूनें निघंटूचें अध्ययन करण्यासंबंधीं जी थोडी-शी हकीकत दिली आहे, तींत स्कन्दस्वामीचा उल्लेख केला आहे. त्यावरून हा त्याच्या पूर्वीचा, ह्मणजे देवराज-यज्वनूच्याही अगोदरचा होता, ह्यांत संशय नाहीं.

ऋग्वेदावर आनन्दतीर्थाची टीका.

याप्रमाणें, वेदांतील कठिण शब्दांचा अर्थ व्यक्त कर-ण्याच्यासंबंधानें, आपापल्या श-क्त्यनुरूप कित्येकांनीं प्रयत्न केल्यावर, वेदऋचांचा ह्मणजे वेदवाक्यांचा अर्थ देऊन, अखिल जगाचें तद्विषयक कुतूहल पुरें करण्याची इच्छा शनैः शनैः जागृत झाली; आणि त्यामुळें, एकामागून एक असे अनेक टीकाकार उदयास आले. आनन्दतीर्थानें ऋग्वेदाच्या पहिल्या अष्टकाच्या दुसऱ्या व तिसऱ्या अध्यायावर टीका केली आहे. हा आनन्दतीर्थ सुप्रसिद्ध आणि जगद्विख्यात शंकराचार्यांचा शिष्य होता. त्यावरून, तो इ. स. च्या नवव्या शतकाच्या प्रारंभींच उदयास आला असावा, असें वाटतें.

आनन्दतीर्थाच्या टीकेवर जयतीर्थाची वृत्ति.

आनन्दतीर्थाच्या टीकेवर जयतीर्थाची वृत्ति आहे. ह्या वृत्तीची एक प्रत पाश्चात्यांस त्यांच्या दीर्घ प्रयत्नामुळें मिळाली असून, ती लंडन शहरांतील इंडिया हौस नामक कचेरीच्या पुस्तकालयांत हल्लींही उपलब्ध होण्या-

सारखी आहे. ह्या व अशा प्रकारच्या असंख्य अमूल्य ग्रंथाची खरी किंमत आम्हांस न कळल्यामुळें, ते आम्हांपासून बहुमोलानें खेरदी करून पाश्चात्यांनीं आपल्या देशांत नेले आहेत; व सांप्रत काळीं ते त्याचा निःसंशयच सदुपयोग करीत आहेत.

शंकराचार्य, व कपर्दी, रावण, आत्मानंद, कौषिक, इत्यादि टीकाकार.

ह्या सर्व टीकाकारांत शंकराचार्यांची टीका फारच महत्वाची आहे. परंतु, ती फक्त वेदांच्या उपनिषद् भागावरच असल्यामुळें, त्याबद्दलचा विचार पुढें करूं. ह्याशिवाय, सायणाचार्यांच्या अगोदर होऊन गेलेले नांवाजण्यासारखे टीकाकार म्हटले म्हणजे, कपर्दी, आत्मानन्द, रावण, आणि कौशिक, इत्यादि होत.

सायणाचे चारही वेद, ब्राह्मणें, आणि कित्येक उपनिषदें, यांजवर टीका.

शंकराचार्य हे इ. स. च्या आठव्या शतकांत उदयास आले, व सदरीं लिहिल्याप्रमाणें त्यांनीं फक्त उपनिषदांवरच टीका केली. त्यावेळीं, ऋक्संहितेवर टीका करण्याचें त्यांच्या मनांत देखील आलें नव्हतें; किंवा अनन्तकार्यव्यापृतत्वामुळें, त्यांजला अवश्य ती फुरसूदही मिळाली नव्हती. त्या कारणानें, हें महत्वाचें काम थेट चवदाव्या शतकापर्यंत, तसेंच मागें पडून राहिलें. किंबहुना, त्याचा कालच न आल्याच्या योगानें, तें घोंगडें तसेंच भिजत पडलें, असें सुद्धां म्हणण्यास हरकत नाहीं. पुढें, इ. स. च्या चवदाव्या शतकांत, सायणप्रतापसूर्य क्षितितलावर चमकूं लागला. त्यामुळें, एकंदर वेदाभ्या-

सास मोठें प्रोत्साहन मिळालें; आणि अहोरात्र वेदपठनानें, ह्या दाही दिशा एकसारख्या दुमदुमूं लागल्या. कारण, सायण हा बुक्क राजाच्या पदरीं मुख्य मंत्री, म्हणजे प्रधान कारभारी, किंवा दिवाण असे. त्यामुळें, विजयनगरच्या ताब्यांतील प्रांतांत, व इतर मांडलिक प्रदेशांत, अगर संस्थानांत, वेदाध्ययनाला हवें त्या प्रकारें उत्तेजन देण्याला, त्याला उत्कृष्ट प्रकारची आणि खरोखरच अमूल्य संधि मिळाली होती.

त्याच्या उच्च पदवीमुळें प्राप्त झालेली संधि, व तिचा सुविनियोग.

अशा प्रकारें, आपोआप जमून आलेल्या अपूर्व योगाचा सायणाचार्यानें यथार्थ उपयोग करून, हातांत सांपडलेला कोणताही प्रसंग, अथवा समय, त्यानें वांया म्हणून बिलकूल जाऊंच दिला नाहीं. इतकेंच नव्हे तर, काया, वाचा, मन, आणि धन, इतकीं सर्व तत्प्रीत्यर्थ समर्पण करून, अत्यन्त परिश्रमानें त्यानें ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद, व अथर्वणवेद, यांजवर साद्यन्त टीका केली. पण इतक्यानेंच झालें नाहीं. ह्या महात्म्यानें ऐतरेय ब्राह्मणें, आणि ऐतरेय आरण्यकें, यांजवर टीका केली आहे; तशींच तांडयब्राह्मण, षड्विंशब्राह्मण, व छान्दोग्योपनिषद् यांजवरही त्याची टीका आहे. छान्दोग्योपनिषद्, आणि शतपथब्राम्हण, व तैत्तिरीयारण्यक, यांजवर हरिस्वामी आणि द्विवेदगंगा यांच्या देखील टीका आहेत. शिवाय, सामविधान, अपस्तंबसंहिता, तैत्तिरीयसंहिता, शतपथब्राह्मण, अथर्वोपनिषद्, आणि बौ-

ध्यायनसूत्र, यांजवर सुद्धा सायणाची टीका आहे. सायणाशिवाय, सदरहू बौध्यायनसूत्रावर आणखी कपर्दिस्वामीनेंही टीका केली असल्याचें आढळून येतें.

असो. खरोखर विचार केला तर, ऋक्संहितेवर उत्तम अशी टीका म्हटली म्हणजे सायणाचार्याचीच होय. ह्यानें वेदांच्या बहुतेक शाखांवर फारच उपयुक्त टीका केल्या असून, वेदाभ्यासाला केवळ आपल्या स्वतःच्या परिश्रमानेंच त्यानें मोठें उत्तेजन दिलें, असें म्हणण्यास तिळप्रायही हरकत नाहीं. ह्या टीकांपासून वेदांची अति प्राचीन भाषा, तिच्यांतील गूढ श्लेष, अपरिचित शब्द, आणि कठिण वाक्यार्थ, इत्यादि समजण्यास खचितच अत्युत्तम साधन झालें आहे. इतकेंच नव्हें तर, त्यामुळें वेदांची खरी योग्यता कळली जाऊन, धार्मिक, नैतिक, सामाजिक, व ऐतिहासिक दृष्टीनेंही त्यांपासून अखिल मानवी जातीचा किती आणि कसा फायदा आहे, ह्याचा सहजीं प्रकाश पडत चालला आहे.

सायणाचार्यांच्या भाष्याची खरी योग्यता, व त्याचा उपयोग.

आतां, वेदांचा अर्थ करण्याविषयींचे, अथवा त्यांजवर कांहीं टीकारूप लेख लिहिण्याबद्दलचे, आमच्या आधुनिक विद्वानांनीं कसकसे प्रयत्न केले आहेत, याविषयीं थोडेंसें विवेचन केलें पाहिजे. एतद्विषयक बंगाल्यांत विशेष चळवळ चालू असून, बाबू रोमेशचन्द्र दत्त ( सी. एस. ) यांनीं समग्र ऋग्वेदाचें बंगालींत भाषांतर

ऋग्वेदाचा अर्थ करण्याबद्दल आधुनिक विद्वानांचे प्रयत्न.

केलें आहे. तथापि, हें भाषांतर हवें तसें नसल्याकारणानें, त्याचें दुसरें चांगलें भाषांतर करण्याबद्दलचा उद्योग सुरू आहे. आमच्या महाराष्ट्रांत, वेदार्थयत्न नांवाचें एक मासिक निघत होतें, व हें कैलासवासी रा० रा० रावबहादूर शंकर पांडुरंग पंडित काढीत असत. परंतु, तें शेवटास न जातां तसेंच अर्धवट राहिलें. ह्यांत ऋक्संहितेंतील प्रत्येक ऋचेचें मराठींत आणि इंग्रजींत भाषांतर करून, शिवाय ठिकठिकाणीं भरपूर खुलाशासहित चांगल्या टीपाही दिल्या आहेत.

तत्संबंधीं युरोपांतील चळवळ.

ह्यासंबंधानें, यूरोपखंडांतील प्रयत्न खरोखरच नांवाजण्यासारखे आहेत; व त्यांतही विशेषत: जर्मन लोकांनीं तर ह्या कामीं अगदीं शिकस्तच करून सोडिली आहे. डा. मोक्षमुलरनें सुमारें तीस वर्षे अश्रान्त परिश्रम करून, ऋक्संहिता सायणाचार्यांच्या भाष्यासहित छापून प्रसिद्ध केली आहे; व शेवटीं ऋग्वेदांतील ऋचा, पदें, शब्द, देवतांचीं नांवें, आणि ऋषींचीं नांवें, इत्यादींचे वर्णानुक्रमवार कोशही जोडले आहेत. सर्व ऋक्संहितेचीं इंग्रजींत दोन पूर्ण भाषांतरें आहेत. तसेंच, ऋग्वेदांतील भाषेच्या संबंधानेंही कांहीं व्याकरणें तयार झालीं आहेत. शिवाय, ऋग्वेदांतील ऋचांचा बरोबर अर्थ व्हावा एतदर्थ, त्यांत आढळणाऱ्या नामांच्या प्रत्येक विभक्तीवर स्फुट लेख लिहून, त्या त्या विभक्तींचा विवक्षित अर्थ ठरविण्याचाही त्यांचा प्रयत्न ज्यारीनें सुरू आहे. आणि ऋग्वेदांतील

क्रियापदें, विशेषणें, क्रियाविशेषणें, व अव्ययें, इत्यादींचा खरा अर्थ कोणता होतो, याविषयींच्या खटपटींत ते अगदीं व्यग्र आहेत.

ऋग्वेद, आणि त्याशिवायचे दुसरे वेद, यांजकडे पाश्चात्यांचें प्रथम लक्ष्य पोहोंचण्याला कोलब्रूकचा लेख[1] कारणीभूत झाला. रोझेन्नें कांहीं ऋक्संहिता छापली असून, त्यापैकीं पहिल्या अष्टकाचें त्यानें ल्याटिन्मध्यें भाषांतर केलें आहे. ( सन १८३८ ). रॉथ्नेंही ऋग्वेदावर टीका केली आहे. ( इ. स. १८४६ ). मोक्षमुलरचें ऋक्संहितेचें पहिलें अष्टक इ. स. १८४९ सालीं छापून प्रसिद्ध झालें. लॉंगलॉईचें ऋक्संहितेचें समग्र भाषांतर फ्रेंच भाषेंत झालेलें आहे. ( इ. स. १८४८–५१ ). विल्सन्नेंही कांहींचें भाषांतर इंग्रजींत केलें आहे. मुलरनें सायण भाष्यासहित ऋक्संहिता छापिली असून, शिवाय शब्दांची सूचि, व प्रतीकाची यादीही दिली आहे. ह्याचे सहा भाग आहेत. ( इ. स. १८४९–७५ ). पाहिल्या मंडळाची संहिता ( पदपाठासहित ), आणि ह्याखेरीज दुसरी दहा मंडळें, ह्यांनींच छापून प्रसिद्ध केलीं. ( इ. स. १८५६ ६०–१८७३ ). रोमन् लिपींत समग्र संहिता प्रथम ऑफ्रेचट्नें छापून प्रसिद्ध केली होती. ( इंडिश्शी स्टुडीन. इ. स. १८६१–६३ ). रूभरनें फक्त पहिले दोन अध्या-

[1] हा लेख वेदावर असून, तो एशियाटिक् रिसर्चेस् नांवाच्या पुस्तकांत छापला आहे.
( Asiatic Researches, vol. VIII. Calcutta. 1805. )

यच छापलेले आहेत. ( बिब्लिओथिका इंडिका. नंबर १-४. कलकत्ता. १८४९ ). स्टीव्हन्सन्चे देखील दोनच अध्याय प्रसिद्ध झाले आहेत. ( इ. स. १८३३ ). विल्सनचें ऋक्संहितेचें भाषांतर आठव्या मंडलाच्या विसाव्या सूक्तापर्यंत झालेलें आहे. ह्याचें पांच भाग असून, शेवटला इ. स. १८६६ सालीं प्रसिद्ध झाला. बेन्फेनें पहिल्या मंडळाचें भाषांतर ( १. १–११८ ) आपल्या ओरिएन्ट आणि ऑकसिडेन्टांत छापिलें होतें. ( इ. स. १८६०–६८ ). ह्या शिवाय, खालीं लिहिलेल्या दुसऱ्या संस्कृतज्ञांनीं सुद्धां ऋग्वेदाच्या अर्थप्रकाशनार्थ, अथवा तद्विषयक ज्ञानार्थ, थोडाबहुत प्रयत्न केल्याचें दिसतें. ग्रासमन् ( इ. स. १८७३ ). डेलब्रूक ( १८७४ ). बेन्फे ( १८७४ ). बोलेन्सेन ( इ. स. १८६८ ). रॉथ ( १८७९ ). आल्फ्रेड् लड्विग् (१८४७.१८७९). आल्फ्रेड हिलेब्रॅन्ड ( १८७६ ). आणि मूरचे संस्कृतपाठ, (Muir's Sanskrit Texts ), पांच भाग, दुसरी आवृत्ति. ( इ. स. १८६८ ).

असो. येथपर्यंत ऋक्संहितेसंबंधीं उपलब्ध असलेल्या साधनांवरून, अवश्य तें विवरण करण्याचा प्रयत्न केला. सबब, आतां पुढील विषयाकडे वळतों.

ऋक्वेदाचीं दोन प्रकारचीं ब्राह्मणें असून, त्या दोहोंत भिन्न भिन्न विषय आहेत. १ शांख्यायन ब्राह्मणांत एकंदर यज्ञविधि सांगितला आहे: आणि २ ऐतरेय

ऋग्वेदाचीं शांख्यायन, व

ब्राह्मणांत फक्त सोमयज्ञविधींचेंच विवेचन आहे. शांख्यायन ब्राह्मणांसच कौषीतकि ब्राह्मण म्हणतात, व ह्यांत एकंदर तीस अध्याय आहेत. नैमिषारण्यांत जो सर्वश्रुत प्रचंड यज्ञ झाला, त्यासंबंधाचें कथन ह्यांत दिसून येतें. शुक्लयजुर्वेदाच्या संहितेच्या शेवटल्या पुस्तकाचा काल आणि ह्या ब्राह्मणांचा काल एकच असावा, असें पाश्चात्यपंडितांपैकीं काहींचें[1] मत आहे. ऐतरेय ब्राह्मणांत एकंदर चाळीस अध्याय असून, त्याच्या आठ पंचिका केल्या आहेत; व त्यांची रचना कुरुपांचाल देशांत झाली असावी, असें कांहींचें म्हणणें आहे. ह्या दोन्ही ब्राह्मणांत आख्यानविद, गाथाकार, व कारिकाकार, इत्यादींचा वारंवार उल्लेख केल्याचें आढळून येतें. त्यावरून, त्यावेळीं, विद्येची हालचाल, ज्ञानाची चळवळ, आणि पारमार्थिक उन्नतीची हाव, याची अगदीं गर्दी उडून गेली होती, असें कोणाच्याही लक्षांत आल्यावांचून राहणार नाहीं. शांख्यायन ब्राह्मणांवरून, तत्कालीन विद्वान मंडळींचा कटाक्ष व्याकरणाचें अध्ययन करण्याकडे विशेष असावा; अथवा, संस्कृतभाषा परिपक्वतेप्रत आणण्यासाठीं त्यांचें चित्त अंशतः तरी खचितच वेधलें असावें; असें अनुमान करण्यास जागा राहते. ऐतरेयब्राह्मणांवर सायणाचार्याची टीका असल्याविषयीं मागें सांगितलें असून, कौषीतकी ब्राह्मणांवर माधवाचा पुत्र जो विनायक, त्यानें टीका केली आहे.

ऐतरेय ब्राह्मणं.

ऋग्वेदाच्या ब्राह्मणानंतर त्यांतील अरण्यकांसंबंधीं थोडासा विचार केला पाहिजे. कारण, ह्याच अरण्यकांत उपनिषद् भाग असून, आर्यांचें आत्मानात्मज्ञान, त्यांचे गूढ विचार, आणि त्यांची प्रगल्भ बुद्धि, इत्यादींचे ते केवळ द्योतकच आहेत, असेंही ह्मणण्यास हरकत नाहीं. ब्राह्मणांप्रमाणेंच, ह्यांत १ शांख्यायनारण्यक, व २ ऐतरेयारण्यक, असे दोन भेद आहेत. शांख्यायनारण्यकांस कौषीतकारण्यकें अशी संज्ञा आहे. ह्याचीं तीन पुस्तकें आहेत; आणि त्यांपैकींच, तिसऱ्या पुस्तकास कौषीतक्युपनिषद् अशी संज्ञा आहे. ह्याजवर शंकराचार्यांची टीका आहे. किंबहुना, बहुतेक उपनिषदांवर ह्यांचेच टीका आहे, असें म्हटलें असतां देखील चालेल. कौषीतक्युपनिषदें आणि शुक्लयजुर्वेदाचीं बृहदारण्यकें, हीं समकालीन असल्याविषयीं पाश्चात्य पंडितांचा अभिप्राय आहे. कौषीतक्यारण्यकाच्या तिसऱ्या पुस्तकावर शंकराचार्यांचीच टीका आहे.

शांख्यायन आरण्यकें.

---

१ हें उपनिषद् विशेष उपयोगीं आणि फारच महत्वाचें आहे. कारण, ह्याच्या पहिल्या अध्यायांत स्वर्गवासाचें सौख्य व तद्विषयक विवेचन आहे. दुसऱ्या अध्यायांत तत्कालीन कुटुंब-प्रीति, प्रेमबंधन, व स्नेहवात्सल्य, हीं उत्कृष्ट रीतीनें व्यक्त होण्यासारखीं आहेत. तसेंच, तिसऱ्या अध्यायांत, त्या वेळच्या ऐतिहासिककथा, त्यांचा संग्रह, आणि फैलाव, यासंबंधाचेंही दिग्दर्शन आहे.

शिवाय, ह्या उपनिषदांत, भूगोलविषयक माहिती देखील बरीच असल्याचें व्यक्त होतें. कारण, त्यांत गंगा, हिमालय, विंध्याद्रि, ह्यांनीं परिवेष्टित झालेला प्रांत, तन्निकट प्रदेश, व त्यांतील जातिवर्ग, इत्यादींचें सामान्य विवेचन असल्याचें आढळून येतें.

ऐतरेयारण्यकाचीं पांच पुस्तकें आहेत. ह्यांपैकीं, दुसरें व तिसरें पुस्तक सुप्रसिद्ध महिदास ऐतरेय यानें केलीं असून, ह्याच्या बापाचें नांव विशाल आणि आईचें नामधेय इतरा होतें. आणि हा कवि इतरेचा मुलगा असल्या कारणानेंच त्याजला ऐतरेय ह्मणत, यांत तिलप्रायही शंका नाहीं. हा फार विद्वान असे; व त्यामुळेंच, "बाबा वाक्यं प्रमाणं," या म्हणीप्रमाणें, त्याचें वचन सदैव प्रमाणभूत मानण्यांत येई. ह्याचें चवथें पुस्तक आश्वलायनानें केलें; आणि पांचवें शौनकानें रचलें. आश्वलायन हा शौनकाचा शिष्य होय. ऐतरेयारण्यकाच्या दुसऱ्या पुस्तकाच्या शवटल्या चार अध्यायास ऐतरेयोपनिषद् अशी संज्ञा असून, ह्या ऐतरेयारण्यकाच्या दुसऱ्या आणि तिसऱ्या पुस्तकांवर, शंकराचार्यांची सुप्रसिद्ध टीका आहे.

ऐतरेय आरण्यकें.

आनन्दगिरि, आनन्दतीर्थ, आनन्दज्ञान, व दुसरे कित्येक जण, शंकराचार्यांचे शिष्ये होते. सबब, आपल्या परमपूज्य आणि जगन्मान्य गुरूच्या ठिकाणीं असलेला आदर प्रकट करण्यासाठीं, ह्यांच्या वृत्तीवर देखील त्यानीं टीका केलेल्या असल्याचें दिसतें.

ऐतरेयब्राह्मणाची आवृत्ति ( मूळ संस्कृत आणि भाषांतरासहित ) मार्टिनहौनें काढिली होती. हिचें दोन भाग असून, ती इ० स० १८६३ सालीं मुंबईस छापिली होती.

ऋग्वेदाचें वाष्कलोपनिषद् नांवाचें दुसरें एक उपनिषद् खचितच असावेंसें वाटतें. कारण, वाष्कलश्रुतीचा

सायणाचार्य वारंवार उल्लेख करितात. इतकेंच नव्हे तर, इ० स० १६९१ सालीं, मुख्य मुख्य उपनिषदांचें जें भाषान्तर अँकिटिलनें लाटिन्मध्यें केलें, त्यांत देखील हें बाष्कलोपानिषद आहे.

ऋगवेदाच्या आणि इतर वेदांतील ब्राह्मणांत भेद.

ऋक आणि इतर वेदांच्या ब्राह्मणांत भेद म्हणून इतकाच कीं, ऋग्वेदाच्या ब्राह्मणांत एकंदर यज्ञविधीचें विवेचन करितांना, होतारानें ह्मणजे ऋग्वेदाच्या ऋचा म्हणणारानें जीं जीं कर्मे करावयाचीं आहेत, त्या सर्वांचें विशेष तपशिलवार वर्णन ऋग्ब्राह्मणांत दिलें आहे. परंतु, यजुर्वेदाच्या ब्राह्मणांत तसें नाहीं. ह्यांत फक्त अध्वर्यूनें, ह्मणजे प्रत्यक्ष यज्ञ करणारानेंच जीं जीं कामें करावयाचीं आहेत, त्या विषयींचाच साद्यन्त ऊहापोह केला आहे. आणि सामवेदांत तर, उद्गातारांचींच ह्मणजे सामगाणारांचीं जेवढीं म्हणून कर्तव्यकर्मे आहेत, तेवढ्यांचेंच विस्तृत विवेचन करण्यांत आलें आहे. आतां, बाकी राहिलेल्या अथर्व ब्राह्मणांसंबंधीं मात्र विश्वसनीय माहिती अजून उपलब्ध नाहीं. सबब, त्याविषयीं हल्लीं ज्यास्त लिहितां येत नाहीं.

शांख्यायन ब्राह्मण आणि ऐतरेय ब्राह्मण, ह्यांच्या अवलोकनानें, त्याकालीं ( ह्मणजे हे ब्राह्मण रचले त्यावेळीं ),

---

१ "ब्राह्मण" हा शब्द नपुंसकलिंगीं असून, त्याचें अनेक वचन "ब्राह्मणें," असें व्हावयाचें. तथापि, व्यवहारांत हा शब्द पुल्लिंगाप्रमाणेंच वापरण्यांत येतो.

शांख्यायन आणि ऐतरेय ब्राह्मणकालांत ज्ञानार्जनाची गोडी.

किंबहुना त्याच्याही पूर्वी अनेक शतकें, ह्या भरतभूमींत विद्येची विलक्षण चळवळ, ज्ञानार्जनाची निस्सीम गोडी, व शास्त्रीय विषयांची उत्कट जिज्ञासा होती, असें खचित भासतें. कारण, त्यांत आख्यानविद, गाथा, अभियज्ञगाथा, कारिका, इत्यादि अनेक शब्दांचा उल्लेख असल्याचें दिसतें. इतकेंच नव्हे तर, त्यांत चालत असलेल्या अनेक विषयप्रतिपादनावरून, तितक्या पुरातनकाळीं देखील, भाषाशास्त्राचा विशेष रीतीनें व्यासंग होत असावा, असें निःसंशय अनुमान होतें.

आतां, ऋग्वेदाच्या सूत्रांसंबंधीं थोडासा विचार करूं.

श्रौत आणि गृह्यसूत्रें.

हीं सूत्रें दोन प्रकारचीं आहेत. १ श्रौतसूत्रें, आणि २ गृह्यसूत्रें. यज्ञविधि, शास्त्रसंस्कार, अथवा गृहाचार, इत्यादींचे, हीं सूत्रें केवळ पाठच होत, असें देखील म्हणण्यास कांहीं हरकत नाहीं. सदरहू दोन प्रकारच्या सूत्रांशिवाय, आणखी एक शौनकाचेंही सूत्र आहेसें वाटतें. कारण, त्याचा वारंवार उल्लेख येतो. परंतु, तें हल्लीं कोठेंही उपलब्ध नाहीं.

श्रौतसूत्रांत दोन भेद आहेत. १ आश्वलायनसूत्रें, आणि २ शांख्यायनसूत्रें.

आश्वलायनसूत्रें, व त्यांजवरील टीका.

आश्वलायनसूत्रांचे बारा अध्याय असून, त्यांचा ऐतरेय ब्राह्मणांशीं निकट संबंध असल्याचें दिसतें. अश्वलाचें नामधेय प्रथमारंभीं शुक्लयजुर्वेदाच्या आरण्यकांत आढळून येतें; व विदेह दे-

शाचा राजा जो जनक, त्याचा हा होता असल्याचें कळतें. ह्याच्याच कुळांत आश्वलायन झाला, आणि तो पाणिनीचा समकालीन असल्याविषयीं वेबरचें[1] मत आहे. आश्वलायनसूत्रांवर नारायण नरसिंहाची टीका आहे; तसेंच त्यांजवर देवत्राताची देखील व्याख्या असून, कांहीं भागांवर विद्यारण्यस्वामीची वृत्ति असल्याचें समजतें.

शांख्यायनसूत्रें.

शांख्यायनसूत्रांचे अठरा अध्याय आहेत; व त्यांचा शांख्यायन ब्राह्मणांशीं विशेष संबंध आहे. हीं सूत्रें बरींच पुरातन असावींत, असें वाटतें. आश्वलायनसूत्रापेक्षां शांख्यायनसूत्रांत खालीं लिहिलेल्या यज्ञविधींच्या संबंधानें ज्यास्त तपशिलवार विवेचन केलें आहे.

वेदकालीन यज्ञांचे प्रकार.

१ वाजपेय. हा यज्ञ उपजीविकेचीं साधनें विपुल प्राप्त व्हावींत, एतदर्थ करण्यांत येतो.

२ राजसूय. हा यज्ञ सार्वभौमपदप्राप्त्यर्थ राजे लोक करतात; आणि एकंदर दिग्विजयाचें काम आटोपल्यावर राजाला अभिषेक होऊन, सार्वभौमपदावर त्याची प्रतिष्ठापना होते.

३ अश्वमेध. ह्या यज्ञांत शास्त्रोक्त विधीप्रमाणें घोड्याला बळी देतात.

४ पुरुषमेध. ह्यांत मनुष्याला बळी देत असत. शुनः-

[1] History of Indian Literature.

शेपाच्या कथानकावरून, एतद्विषयक हकीकत थोडीबहूत ध्यानांत येण्यासारखी आहे.

१ सर्वमेध. हा विश्वयज्ञ किंवा सार्वलौकिक यज्ञ होय.

असो. सदरहू सूत्रांतील पितृतर्पणांत, ऋक्संहितेंतल्या ऋषींचीं नांवें, अथवा त्यांचे शाखाध्यायी म्हणून म्हणविणारांचीं नांवें आल्याचें दिसत असून, त्यांजबरोबरच

सूत्रांत उल्लेख केलेले ऋषी, व ज्ञानी ऋषिकन्या.

१ गार्गीवाचक्नवी, २ वडवाप्रातिथेयी, आणि ३ सुलभामैत्रेयी, या तीन महाज्ञानी अशा ऋषिकन्यांचीं नांवेंही गोंवलेलीं आहेत. ह्यांपैकीं, गार्गीचें नांव शुक्लयजुर्वेदाच्या बृहदारण्यकांत ठायीं ठायीं दृष्टिगोचर होतें; व त्यावरून ती सुप्रसिद्ध जनकराजाच्या पदरीं असल्याचें उघड दिसतें. आतां, दुसरी ऋषिकन्या जी वडवाप्रातिथेयी, तिच्या विषयींची ज्यास्त माहिती कळून येत नाहीं. मात्र, प्रतीथिऋषीचें नांव सामवेदाच्या वंशब्राह्मणांत आलेलें असल्याचें आढळतें. सुलभामैत्रेयीचें नांव देखील गार्गीप्रमाणें विशेषत: जनकराजाच्या संबंधानेंच वारंवार दृष्टीस पडतें, आणि तें महाभारतांतील कथानकांवरून अगदीं उघड होतें.

श्रीपतीचा नातु, आणि कृष्णजिताचा मुलगा जो

---

१ वाष्कल, शाकल्य, मांडुकेय, ऐतरेय, पैंग्य, कौषीतक, शौनक, आश्वलायन, शांखायन, इत्यादि.

२ जनक हा राजा असूनही, मोठा ब्रह्मज्ञानी होता. तथापि, गार्गीची त्याच्याहीपेक्षां ज्यास्त कडी होती.

शांख्यायन सूत्रांवरील टीकाकार.

नारायण, त्याची शांख्यायनगृह्य-सत्रावर टीका आहे. शिवाय, नारायणपशुपतिशर्मानें ब्रह्मदत्ता-प्रमाणेंच शांख्यायनपद्धति नांवाचा एक ग्रंथ केला आहे. ह्याचा काल निश्चितपणें समजत नाहीं. तथापि, तो इ. स. च्या सोळाव्या शतकांतील असावा असें कित्येकांचें म्हणणें आहे. हा मलयदेशचा राहणारा असल्याचें कळतें. वरदत्तसुत आनर्तीय याची देखील शांख्यायनसूत्रावर टीका आहे. हिचे तीन अध्याय नाहींसे झाले आहेत; व ते नऊ, दहा, आणि अकरा असे होत. परंतु, ही उणीव दासशर्मामुंजसुनूनें भरून काढिल्यासारिखें दिसतें. शिवाय, शांख्यायन सूत्राच्या सतरा व अठरा ह्या शेवटल्या दोन अध्यायावर गोविन्दाची ही वृत्ति आहे. ह्या व अशा प्रकारच्या टीका पुष्कळच होत्या. परंतु, त्या हल्लीं उपलब्ध नसून नाहींशा झाल्या असल्याचें, आनर्तीयाच्या लेखावरून कळून येतें.

श्रौत व स्मार्त सूत्रांतील भेद.

श्रौतसूत्रांत, श्रुति म्हणजे वेद ह्यांसच प्रमाण मानून, एकंदर सूत्रांची योजना केली आहे; आणि ह्यांत यज्ञविधि सांगितला आहे. गृह्यसूत्रांत मात्र गृहाचाराचें व गृहस्थाश्रमधर्माचें विवेचन आहे. सदहु श्रौतसूत्रें स्मार्तसूत्रांपासून भिन्न आहेत. कारण, हीं स्मृति, संप्रदाय, आणि आचार, इत्यादि प्रमाण मानून, त्याअन्वयें रचलेलीं आहेत.

---

१ वेबर.

शांख्यायन गृह्यसूत्रांत, सुमंतु, जैमिनि, वैशंपायन, पैल, गार्ग्य, आणि बभ्रु, यांचीं नांवें आलीं असून, सूत्र व भाष्य, यांचें दिग्दर्शन झालें आहे. तसेंच आश्वलायनगृह्यसूत्रांत, सुमंतु, जैमिनि, वैशंपायन, व पैल, या चार ऋषींचीं नांवें आलीं आहेत; आणि सूत्र, भाष्य, भारत, महाभारत, व धर्म, असे ग्रंथ सांगितले आहेत. परंतु, ह्यावरून, सुमन्तूचें सूत्र आणि भाष्य, जैमिनीचें भारत, वैशंपायनाचें महाभारत, व पैलाचें धर्मशास्त्र, असें समजण्याचें कीं काय, हा मात्र बोध होत नाहीं.

आतां, ह्यांत भारत आणि महाभारत, यांजविषयींचा उल्लेख आहे. त्यावरून, त्यासमयीं तत्संबंधी कथा खचितच सर्वांस माहीत होती, असें उघड दिसतें. इतकेंच नव्हे तर, त्या काळीं, भारताचा मूळ ग्रंथ ( मग तो केवढ्याही लहान मोठ्या प्रमाणाचा असो, पण तेवढा तरी ) अस्तित्वांत होता, याबद्दलची अगदीं शंका राहत नाहीं.

असो. ऋग्वेदाचीं १ श्रौत आणि २ गृह्य अशीं जीं दोन प्रकारचीं सूत्रें पूर्वीं सांगितलीं, तत्संबंधीं आणखी ज्यास्त तपशील देतों. श्रौतसूत्रांत आश्वलायन सूत्रांचे बारा अध्याय असून, त्यांचा ऐतरेय ब्राह्मणांशीं संबंध आहे; व शांख्यायनसूत्रांचे अठरा अध्याय असून, त्यांचा शांख्यायन ब्राह्मणांशीं संबंध आहे. ह्या

ऋग्वेदाचीं श्रौत आणि गृह्यसूत्रें.

---

१ सुमन्तु जैमिनिवैशंपायनपैलसूत्रभाष्यभारतमहाभारतधर्माचार्याः ।

श्रौतसूत्रांत यज्ञयागादि विधींचें संपूर्ण कथन, आणि १ वाजपेय, २ राजसूय, ३ अश्वमेध, ४ पुरुषमेध, व ५ सर्वमेध, इत्यादि यज्ञांचें तपशीलवार विवेचन आहे.

पूर्वषट्क व त्यांतले विषय.

श्रौतप्रकरणाच्या बारा अध्यायात, १ पूर्वषट्क, आणि २ उत्तरषट्क, असे दोन विभाग आहेत. पूर्वषट्कांत, पहिल्या अध्यायाच्या तेरा कंडिका अथवा खंडें असून, त्याचीं २३७ सूत्रें आहेत; व त्यांत दर्शपूर्णमासासंबंधीं वृत्तांत आहे. दुसऱ्या अध्यायाच्या वीस कंडिका, व ४१० सूत्रें आहेत. ह्यांत इष्टिप्रकरण आहे. तिसऱ्या अध्यायाच्या चवदा कंडिका, आणि २८८ सूत्रें असून, त्यांत पशुयज्ञासंबंधीं विवेचन आहे. चवथ्यांत पंधरा कंडिका व १९४ सूत्रें आहेत, आणि सोमयागाची हकीकत आहे. पांचव्याच्या वीस कंडिका व ३४१ सूत्रें आहेत; आणि त्यांत अग्निष्टोम प्रकरण आहे. सहाव्या अध्यायांत चवदा कंडिका असून २२३ सूत्रें आहेत, व त्यांत अतिरात्रादिकांचें वर्णन आहे.

उत्तर षट्कांतले विषय.

उत्तरषट्कांत, सातव्या अध्यायाच्या १२ कंडिका आणि १९९ सूत्रें आहेत. आठव्या अध्यायांत चवदा कंडिका असून, त्यांची २८४ सूत्रें आहेत नवव्या अध्यायांत अकरा कंडिका व १३७ सूत्रें आहेत. दहाव्यांत, दहा कंडिका आणि २६३ सूत्रें आहेत. अकराव्यांत ७ कंडिका व ९९ सूत्रें आहेत. आणि बाराव्यांत, पंधरा कंडिका असून, २३० सूत्रें आहेत. ह्या

उत्तरषट्कांत सत्रयाग व त्याबद्दलची सर्व हकीकत आहे.

गृह्यसूत्रांत, आश्वलायन गृह्यसूत्रांचे चार अध्याय असून, शाख्यायनगृहसूत्रांचे सहा अध्याय आहेत. ह्यांत १ वर्णाश्रमधर्म, २ विवाहविधि, ३ नित्यनैत्तिक कर्म, ४ उत्तरकार्यविधि, आणि ५ पितृतर्पण, इत्यादींचें सविस्तर विवेचन आहे ह्या दोन्ही गृह्यसूत्रांवर व आश्वलायन श्रौतसूत्रांवर नारायणाची टीका आहे.

गृह्यसूत्रांतले विषय.

ह्यांतील पहिल्या अध्यायाचीं चोवीस खंडें असून, २९९ सूत्रें आहेत; व त्यांत १ उपनयन, २ विवाह, ३ नित्याग्नि सेवा, ४ स्थालीपाक, आणि ५ गर्भालंभन, इत्यादि विधी सांगितले आहेत. दुसऱ्या अध्यायाचीं दहा खंडें असून, त्याचीं १२२ सूत्रें आहेत; व त्यांत १ श्रवणाकर्म (म्हणजे श्रावणी पौर्णिमेच्या दिवशींचा अग्निहवना-संबंधी विधि), आणि २ आश्वयुजीकर्म (म्हणजे आश्विनी पौर्णिमेच्या दिवशींचा पूर्ववत विधि), इत्यादींचें विवेचन आहे. तिसऱ्या अध्यायांत १ पंचमहायज्ञ, २ स्वाध्याय-विधि, व ३ उपाकरणोत्सर्जन, इत्यादि बद्दलची हकीकत आहे. आणि चवथ्या अध्यायांत १ और्ध्वदैहिक क्रिया, व २ शांतिकर्म, यांविषयींचा तपशील आहे.

ह्या गृह्यसूत्रांस परिशिष्टादाखल म्हणून एक भाग जोडल्याचें दिसतें, व त्याचे चार अध्याय आहत. १ पहिल्यांत स्नानसंध्यादिविधि, वैश्वदेव, आणि पार्वणस्थालीपाक, इत्यादि जातक कर्मापर्यंतचा विधि सांगितला आहे. २ दुसऱ्यांत गृह्ययज्ञ (गृहमख) व श्राद्धं, यांचें विवेचन आहे. तिसऱ्यांत

सर्व अंत्यकर्माचा विचार आहे. आणि ४ चवथ्यांत नदी, विहीरी, देवालयें, इत्यादि संबंधाचीं कृत्यें सांगितलीं आहेत.

प्रातिशाख्य सूत्रें.

प्रातिशाख्य म्हणून ऋग्वेदाचीं आणखीं सूत्रें आहेत. हीं ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद, आणि अथर्वण वेद, ह्या चाऱ्ही वेदांचीं उपलब्ध असल्याचें समजतें. ह्यांत वेदांचीं मूळ संहिता, तिचा पाठ, तिच्यांतील शब्दोच्चार, ऋचा म्हणण्याची पद्धति, स्वशास्त्राविषयीं विवेचन, व व्याकरणासंबंधीं निबंधन असून, वेदशाखांत शब्दांचें रूपान्तर कसकसें होत गेलें आहे, हें त्यांत विशद रीतीनें व्यक्त केलें आहे.

त्यांजवरील टीका.

ऋग्वेदाचीं शाकलशाखेंतील प्रातिशाख्य सूत्रें शौनकानें केलीं. ह्याचीं तीन कांडें व सहा पटलें आहेत, आणि त्या सर्वांमिळून एकशे तीन कंडिका आहेत. ह्यांजवर ऊअट ( किंवा उवट्ट ) याची उत्तम टीका असून, विष्णु पुत्राची हिच्याही पूर्वींची जी टीका होती, तिजवरूनच उवटानें हल्लींची तयार केली असल्याचें दिसतें.

उपलेख.

उपलेख हे प्रातिशाख्य सूत्रांच्या परिशिष्टा दाखलच असून, त्यांजला संग्रहसार अशी उपमा देण्यासही हरकत दिसत नाहीं. ह्यांतच १ पदपाठ, २ क्रमपाठ, ३ जटापाठ, ४ मालापाठ, ५ शिखापाठ, ६ रेखापाठ, ७ ध्वजपाठ, ८ दंडपाठ, ९ रथपाठ, आणि १० घनपाठ, असे भेद आहेत; आणि ते मागील व पुढील शब्दाची नियमित घरसोड करून, श्रोत्रिय वर्ग म्हणतात.

---

१ ह्याचें मॉक्समुलरनें जर्मनींत भाषांतर केलें आहे. २ मार्गे पा. ८०-८१.

# भाग ६० वा.

## वैदिकग्रंथोदधि.

## यजुर्वेद.

मागील भागांत, ऋग्वेदासंबंधीं अवश्य तो विचार झाला. सबब, आतां यजुर्वेदाकडे वळूं, आणि तद्विषयक तपशीलवार हकीकत देऊं.

कृष्ण यजुर्वेद.

यजुर्वेदांत १ कृष्ण यजुर्वेद, व २ शुक्ल यजुर्वेद, असे दोन प्रकार आहेत. परंतु, त्यांत भेद म्हणून फक्त व्यवस्थेच्या संबधानेंच आहे. म्हणजे कृष्ण यजुर्वेदांतल्या संहितेंत प्रथमतः यज्ञविधीचें विवेचन करून, त्यानंतर लागलींच त्याबद्दलची व्याख्या, आणि तिच्यामागून पूर्वकथित यज्ञकर्माचा तपशील दिला आहे. कृष्ण यजुर्वेदाच्या ब्राह्मणांत देखील बहुतेक अशाच प्रकारचें निरूपण आहे. मात्र, ह्यांत, कित्येक ठिकाणीं, यज्ञक्रियांसंबंधीं अगदीं सविस्तर माहिती दिली आहे; व कांहीं प्रसंगीं, व्याख्येचा ऊहापोह विशेष रीतीनें करून, कित्येक ज्यास्त नियमही सांगण्यांत

त्याचे प्रकार व भेद.

१ शिवाय, कृष्णयजुर्वेदांत, होता व त्याचीं कामें, यांजवर विशेष लक्ष्य पुरविलें आहे. परंतु तसें शुक्लयजुर्वेदांत दिसून येत नाहीं.

आले आहेत; अथवा, क्वचित् ठिकाणीं, नवीनच विषय[1] घातला आहे.

परंतु, हा प्रकार शुक्ल यजुर्वेदांत दिसून येत नाहीं.

भेदाचें कारण.

कारण, ह्यांत यज्ञविधि, तत्संबंधीं व्याख्या, व त्याचे नियम, इत्यादींचे वेगवेगळे भाग पाडून, त्यांचें अगदीं पृथक् ठिकाणीं स्वतंत्रच विवेचन केलें आहे. म्हणजे, शुक्ल यजुर्वेद संहितेंत फक्त यज्ञविधिच सांगितला असून, शुक्लयजुर्वेद ब्राह्मणांत, त्याची व्याख्या व नियम यांचा सविस्तार वृत्तांत दिला आहे. अशाच प्रकारची व्यवस्था ऋग्वेदांत[2] आणि सामवेदांतही[4] असल्याचें दिसून येतें. मात्र, कृष्णयजुर्वेदांत[3] तसें नाहीं. कृष्णयजुर्वेद व शुक्लयजुर्वेद यांची रचना कुरुपांचाल[5] क्षेत्रांत झाली असल्याविषयीं, प्रोफेसर वेबरचें मत आहे.

---

१ उदाहरणार्थ, पुरुषमेधासंबंधीं विवेचन संहितेंत नसून ब्राह्मणांत आहे.

२ ऋग्वेदांत देवतास्तुति, यज्ञप्रकरण, आणि विशेषेंकरून सोमयागक्रिया सांगितली आहे. ऋग्वेदाध्यायांस बव्हृच ह्मणतात.

३ यजुर्वेदांत एकंदर यज्ञविधींचें नियमन आहे. यजुर्वेदाध्यायांस अध्वर्यु म्हणतात, आणि कृष्णयजुर्वेदाध्यायांस चरक अशी संज्ञा आहे.

४ सामवेदांत फक्त सोमयागासंबंधींच ज्यास्त तपशील आहे सोमवेदाध्यायास छंदोग असें नामधेय आहे.

५ ह्याची ह्या वेळेस, फारच सुधारणेची व भरभराटीची स्थिति होती, असें वाटतें.

## कृष्णयजुर्वेद.

कृष्णयजुर्वेदाचें दुसरें नांव तैत्तिरीय.

कृष्णयजुर्वेदास "तैत्तिरीय" अशी ही दुसरी संज्ञा आहे; व ती त्याच्या प्रातिशाख्य सूत्रावरून आणि सामसूत्रावरून मात्र कळून येतें. ह्या संबंधानें अशी एक चमत्कारिक आख्यायिका आहे कीं, वैशंपायन ऋषीनें आपल्या शिष्यवर्गास यजुर्वेद शिकविला होता. पुढें, कांहीं कारणानें, ह्यांपैकीं एका शिष्याचें आणि वैशंपायन ऋषीचें भांडण झालें, व आपसांत तेढ आली. त्यावेळीं, ह्या शिष्याला आपल्या गुरूचा राग येऊन, तो ह्याजपासून जें कांहीं शिकला होता, तें सर्व ओकला. तेव्हां, त्याच्या दुसऱ्या शिष्यमंडळींनीं तित्तिरीचें रूप धारण करून,

तें पडण्याचें कारण.

त्याच्या तोंडांतून बाहेर पडलेलें सर्व कांहीं भक्षण केलें. त्यानंतर, हा अशा प्रकारें तित्तिरिरूपानें ग्रहण केलेला कृष्णयजुर्वेद सर्वांस प्रकट झाला, आणि त्याला "तैत्तिरीय" हें नांव सहजींच पडलें.

युरोपस्थांच्या मतें.

ह्याबद्दलची दुसरी एक अशी कल्पना आहे कीं, ह्या वेदांत ठिकठिकाणच्या ऋचा घेतलेल्या असल्यामुळें, कृष्णयजुर्वेद संहिता ही जणूकाय अनेक ठिगळांची गोधडी अथवा अठरा धान्यांचें कोडबोळेंच झालें आहे. आणि तित्तिरीच्या पंखाचा रंग जसा चित्रविचित्र असतो, त्याचप्रमाणें ह्या

वेदसंहितेचें वैचित्र्य असल्याकरणानें, कदाचित् तिला हें अन्वर्थच नांव पडलें असावें.

पाणिनीच्या मतें.

तथापि, एतद्विषयक पाणिनीचा असा अभिप्राय आहे आहे कीं, तैत्तिरेय हें नांव तित्तिरिऋषीपासूनच प्राप्त झालें. आणि ह्या गोष्टीला आत्रेयशाखेच्या अनुक्रमणीवरून पुष्टीकरण मिळत असल्यामुळें, तेंच मत विशेष सप्रमाण दिसतें. शिवाय, कृष्णयजुर्वेदाच्या एका शाखेचें नांव देखील खांडिकीयच[1] आहे; व तेंही खंडिक ऋषीवरूनच पडलें असल्याचें पाणिनि लिहितो.

कृष्णयजुर्वेदाच्या संहिता.

कृष्णयजुर्वेदाच्या, थोड्याबहुत फेरानें, तीन संहिता आहेत. १ तैत्तिरीय, २ काठक, आणि ३ हारिद्रविक. तैत्तिरीयसंहिता आपस्तंब शाखेंतील असून, ही शाखा खांडिकीय शाखेचा पोटभेद आहे. काठकसंहिता चरक व चारणीय शाखेंतली आहे. आणि चारायणीय ही चरकाची उपशाखा आहे. आत्रेय शाखेची देखील एक निराळीच संहिता असल्याचें अनुक्रमणीवरून कळून येतें. तथापि, आत्रेय हा औखीय शाखेचा पोटभेदच समजावयाचा. काठकसंहिता कांहीं अंशानें स्वतंत्रपणें झाल्याचें भासतें. मात्र, अन्तर्गत

१ ह्याची आपस्तंबही एक पोट शाखा आहे.

२ खंडिक (औद्भारि) हें नांव शुक्लयजुर्वेदाच्या ब्राह्मणांत आढळतें.( ९. ८. ४. १. ).

व्यवस्थेच्या संबंधानें ती कृष्णयजुर्वेदसंहितेशीं साम्य पावते; आणि पाठांच्या दृष्टीनें विचार केला तर, ती शुक्लयजुर्वेदाशीं मिळती असते. हारिद्रविक संहिता हल्लीं कोठेंच उपलब्ध नाहीं. त्यावरून, ती कोठें तरी गाहाळ झाली असावी, अथवा तिचा नाश झाला असावा, असें वाटतें. तथापि, इतकें अगदीं खात्रीपूर्वक कळून येतें कीं, ही हारिद्रवीय शाखेपैकीं असून, हारिद्रवीय हा मैत्रायणीयशाखेचा पोटभेद होय. ह्यांचा उल्लेख निरुक्त, अष्टाध्यायी, अनुपदसूत्र, व बृहद्देवता, यांत केलेला आहे.

कठ व त्यांची प्रतिष्ठा.

महाभाष्याच्या वेळीं, काठक संहिता आणि कठ[1] ह्यांचें विशेष महत्व असल्याचें दिसतें. कारण, त्यांत त्यांचा उल्लेख वारंवार येतो. ह्यांचा प्रवर्तक कठ असून, तो वैशंपायनाचा शिष्य होता. हे कठ, व कालाप, आणि कौथुम, यांचा निकट संबंध असावा, असें वाटतें. कालाप व कौथुम हे सामवेद शाख्याध्यायी होत. कठ-कालाप यांचा रामायणांत देखील उल्लेख आहे. इतकेंच नव्हे तर, त्यांची अयोध्येंत मोठी प्रतिष्ठा असल्याविषयींचें वर्णन आहे.

आपस्तंब संहिता.

असो. आपस्तंब[2] संहितेचीं सात अष्टकें असून, त्यांचे चव्वेचाळीस प्रश्न[3], सहाशें एकावन अनुवाक, व दोन हजार एकशे

---

१ अर्वाचीन ग्रंथमालेंत, ह्याचे अनेक भेद झाल्याचें दृष्टिगोचर होतें. उ० प्राच्यकठ, कठ, कपिष्ठलकठ, कपिष्ठलसंहिता, इ०.

२ ही कृष्ण यजुर्वेदाची शाखा आहे, व तिला तैत्तिरीय म्हणतात.

३ प्रश्न हा विभाग तैत्तिरीय संहितेचाच विशेषेंकरून दिसतो.

अठ्याण्णव कंडिका, असे दुसरे विभाग पाडले आहेत. प्रत्येक कंडिकेंत बहुतकरून पन्नास शब्द असावयाचे, असा सामान्य नियम आहे. आत्रेय संहितेचे देखील कांड, प्रश्न, आणि अनुवाक, असेच पोटविभाग आहेत.

काठकसंहिता.

काठकसंहितेचे कांहीं निराळ्याच धर्तीवर पोटविभाग पाडल्याचें दिसतें. कारण, तिचे मुख्य पांच भाग केलेले असून, त्यांपैकीं पहिल्या तीन भागांचीं चाळीस स्थानकें व आणखी कित्येक पादही केले आहेत. चवथ्या भागांत ऋचाच असून, त्या होत्यानें गावयाच्या आहेत. आणि पांचव्यांत फक्त अश्वमेधाचा विधिच सांगितला आहे. पहिल्या तीन भागांच्या मुखपृष्ठावरून, चरकशाखेला १ इठिमिका[1], २ मध्यमिका, आणि ३ ओरिमिका[2], अशीं परस्पर नावें दिल्याचें दिसून येतें. काठक ब्राह्मणांतील यागविधि शुक्लयजुर्वेद संहितेंत सांगितल्याप्रमाणेंच आहे. परंतु, ह्यांतील पौराणिक कथानकें विशेष महत्वाचीं आहेत. ह्यांत धृतराष्ट्र-वैचित्र्यवीर्याचें नांव आलें असून, पांचालदेश व कुंतिदेश यांत परस्पर भांडण असल्याविषयींचाही उल्लेख आहे. त्यामुळें, ऐतिहासिक दृष्टीनें ही गोष्ट विशेष ध्यानांत ठेवण्यासारखी आहे, यांत संशय नाहीं.

---

१ "इठिमिका" हा शब्द हेट्टिम शब्दावरून झाला असून, हा, हेट्ट (म्हणजे अधस्तात्) याचेंच रूप होय, असें कित्येक विद्वान समजतात.

२ "ओरिमिका" हा शब्द उवरिम शब्दापासून झाला आहे. आणि उवरिम हें उपरि शब्दाचें रूप आहे, असें कांहींचें मत आहे.

यास्काच्या निरुक्तांत काठकाचा उल्लेख आहे. त्यावरून, काठकसंहिता व ब्राह्मण हे त्याच्या वेळेमच पुरे झाले असावे, असें सहजीं अनुमान होतें. हा

काठक ब्राह्मणांशीं यास्काचें समकालीनत्व.

यास्क, तित्तिरीचा गुरु जो वैशंपायन, त्याचा शिष्य असल्याविषयीं, आत्रेयसंहितेच्या अनुक्रमणीवरून दिसतें. परंतु भट्टभास्करमिश्र यांच्या मतें, यास्क हा वैशंपायनाचा शिष्य नसून, याज्ञवल्क्य हाच त्याचा शिष्य होता, असें दिसतें.

काठक संहितेशिवाय, मानव संहिता आणि मैत्रायणी संहिता अशा आणखी असल्याचें कळून येतें. मानव संहितेचा उल्लेख शुक्ल यजुर्वेदाच्या कातीय

मानवसंहिता, व मैत्रायणी संहिता.

सूत्रांत केलेला असून, मैत्रायणी संहितेचीं हल्लीं पांच कांडें उपलब्ध आहेत. ह्या पांच कांडांपैकीं, दुसरें उपनिषत् कांड आहे, व शेवटलें खील कांड आहे. मानव हा मैत्रायणीचा पोटभेद असल्याचें दिसतें.

तैत्तिरीय (अपस्तंब) संहितेवर भट्टभास्करमिश्राची

---

१ तित्तिरि हा उख ऋषीचा गुरु असून, उख हा आत्रेयाचा गुरु होता. आत्रेय हा आपल्या शाखेचा पदकार असून, कुंडिन हा वृत्तिकार होता.

२ यास्काचा प्रत्यक्ष उल्लेख ऋक्प्रातिशाख्यांत आणि बृहद्देवतांत केला असून, शिवाय आत्रेयी शाखेच्या कांडानुक्रमांत, वंशांत, व शतपथ ब्राह्मणाच्या शेवटल्या पुस्तकांतही तन्नामनिर्देश आहे. कांडानुक्रमांत त्याला पैंगी अशी संज्ञा आहे, आणि तो वैशंपायनाचा शिष्य व तित्तिरीचा गुरु असल्याविषयीं वर्णन आहे.

तैत्तिरीय संहितेवरील टीकाकार.

टीका आहे. परंतु ती समग्र नसून, फक्त कांहीं अष्टकांवरच असल्याचें दिसतें. त्याचप्रमाणें, सायणाचार्यांची देखील सर्व तैत्तिरीय संहितेवर टीका नाहीं. मात्र, ती कांहीं भागावर आहे. ह्याशिवाय, कृष्णयजुर्वेदावर दुसरे टीकाकार म्हटले म्हणजे, काशकृत्स्न, एकचूर्णि, आणि यास्क, हे असून, ते बरेच प्राचीन असावेत असें वाटतें. कारण, आपस्तंब (तैत्तिरीय) संहितेचा काल[1] सुमारें अडीच हजार वर्षांचा (इसवी सनापूर्वीचा) असल्याचें दिसतें. भट्टकौशीकभास्करमिश्र याची सुद्धां आपस्तंब संहितेवर टीका आहे, व तिचें नामधेय ज्ञानयज्ञ असल्याविषयीं कळून येतें. हा आपल्या टीकेंत, भवस्वामीचाही आत्रेयशाखेच्यासंबंधानें वगैरे विशेष रीतीनें उल्लेख करतो. त्यावरून, भवस्वामी हा त्याच्याही पूर्वीचा टीकाकार होऊन गेला असावा, असें सहजीं वाटतें. भट्टकौशीक भास्करमिश्र हा सायणाचार्यापूर्वी चारशें वर्षे होऊन गेला असून, सायणाचे नानाविध ग्रंथ हा चतुर्थाश्रमी झाल्यावर, इ. स. १३३१ पासून इ० स० १३८६ पर्यंतच्या काळांतच ह्यानें श्रृंगेरीच्या मठांत लिहिले असावे; आणि

---

१ ह्या संहितेंतच कांहीं नक्षत्रांचा उल्लेख आहे, व त्यावरून ह्या संहितेचा काल इ. स. पू. २७८० ते १८२० च्या दरम्यानचा असावा, असें प. वेबर, जर्मन् प्रोफेसरचें मत आहे.

( History of Indian Literature P. 30 1882. )

हाच सुप्रसिद्ध विद्यारण्य स्वामी व माधव ही होय, असें बर्नेलचें मत[1] आहे.

पैशाची भाष्य.

आपस्तंब संहितेवर आणखीही कोणा एका बालकृष्णाची टीका आहे. परंतु, हा बालकृष्ण कोण, याजविषयींची हकीकत कळून येत नाहीं. ह्याशिवाय, पैशाची भाष्य ह्मणून ही कृष्णयजुर्वेद संहितेवर पैशाची भाषेंत एक टीका असल्याचें समजतें.

भारतीय आधुनिक प्रयत्न.

आतां, एतद्विषयक भारतीयांचे आधुनिक प्रयत्न म्हटले ह्मणजे, महेशचन्द्रन्यायरत्नाची तैत्तिरीय संहितेची नवीन आवृत्ति होय. हींत सायणाची समग्र टीका आहे. परंतु, हें काम अजून शेवटपर्यंत तडीस गेल्याचें दिसत नाहीं. कारण, ह्या संहितेची टीकेसहित फक्त चार[2] अष्टकेंच पुरीं झालीं असल्याचें कळून येतें.

तद्विषयक युरोपस्थांचे प्रयत्न.

ह्यासंबंधानें, युरोपियन लोकांच्या प्रयत्नाबद्दल विचार करता असें कळून येतें कीं, बिब्लिओथिका इंडिकामध्यें, सायण भाष्यासहित तैत्तिरीय संहिता छापण्याचें रुअरनें इ. स. १८५४ सालीं मनावर घेतलें होतें. परंतु, तें काम त्याच्या हातून तडीस न गेल्याकारणानें, कॉवेल आणि रामनारायण यांस तें हातीं घ्यावें लागलें.

१ बर्नेलची वंशब्राह्मणाची आवृत्ति. प्रस्तावना. पान ८. १८७३.
२ इ. स. १८७४. ( ४, ३, ११ ).

तथापि, त्यांजकडूनही तें पुरें न होतां अर्धवटच राहिलें त्यामुळें, तें **महेशचन्द्र न्यायरत्न** यांजकडे सोंपविलें गेलें व तें अद्यापि पुरें झालें असल्याचें कळून येत नाहीं.

असो. येथपर्यंत **कृष्णयजुर्वेदाच्या संहितेसंबंधीं** विचार झाला. सबब, आतां त्याच्या **ब्राह्मणांकडे** वळूं, आणि त्यांजबद्दलची उपलब्ध असलेली हकीकत देऊं.

कृष्णयजुर्वेदाचे ब्राह्मण.

**आपस्तंब** आणि **आत्रेय** शाखेचे निरनिराळे **ब्राह्मण** आहेत. मात्र, **काठकसंहितेचे** स्वतंत्र **ब्राह्मण** नसून, त्यांचा अंतर्भाव सदरहू शाखांच्या **ब्राह्मणां**तच झालेला असल्याचें दिसतें. **आपस्तंब ब्राह्मणाचे** तीन भाग आहेत, व ते **सायणाच्या** टीकेसहित **राजेन्द्रलाल** मित्रानें **बिब्लिओथिका इंडिकांत** छापलेले आहेत. (इ. स. १८५५–७० ). तिसऱ्या भागाचे बारा **प्रपाठक** आहेत. ह्यापैकीं, शेवटले तीन **प्रपाठक कठऋषीनें** केले असल्याविषयीं, **आत्रेय** शाखेच्या अनुक्रमणिकेवरून कळून येतें. ह्यांत एके ठिकाणीं, **नचिकेताचें** पाताळांत गमन झाल्याविषयाचा उल्लेख असून, **अथर्ववेदाच्या काठकोपनिषदांचा** तोच विषय असल्याचें दिसतें. कित्येक स्थळीं, **महामेरु, क्रौंच, मैनाग, वैशंपायन, व्यासपाराशर्य, अथर्वांगिरस्, ब्राह्मण, इतिहास, पुराण, कल्प, गाथा, नाराशंसी,** इत्यादींचा उल्लेख आहे; आणि एक परिच्छेद **अरुण** किंवा **आरुण** यानें केल्याविषयींचें वर्णन आहे.

आपस्तंब, आत्रेय, व काठक ब्राह्मण.

मैलवी आणि शाट्यायनी ब्राह्मण देखील कृष्णयजुर्वेदाचेच आहेत, व ते बरेच पुरातन असल्याचें दिसतें. कारण, त्याचा उल्लेख कैयटानें केला असून, तो बृहद्देवतांतही आहे. शिवाय, शाट्यायनी ब्राह्मण हे याज्ञवल्कानी, ब्राह्मणानी, आणि सौलभानी ब्राह्मणांचे समकालीन असल्याविषयीं कैयट म्हणतो. इतकेंच नव्हे तर, महाभाष्यांत मैलवी व शाट्यायनी यांचा बरोबरच नामनिर्देश केला आहे. त्यावरून, महाभाष्याच्या[२] पूर्वीचे हे ब्राह्मण आहेत, याविषयीं शंका नाहीं. मैलवी हे भल्लु नांवाच्या आचार्यापासून झाले असल्याबद्दल कैयटाचें[१] म्हणणें आहे.

मैलवी आणि शाट्यायनी ब्राह्मण.

कृष्णयजुर्वेदाचीं आरण्यकें देखील आहेत. तैत्तिरीय-आरण्यक हें आपस्तंब आणि आत्रेय शाखेचें असून, त्याचे दहा भाग आहेत. ह्यापैकीं, पहिल्या सहा भागांत यज्ञविधीच सांगितला आहे. म्हणजे, पहिल्या व तिसऱ्या भागांत यज्ञासाठीं पवित्र अग्नि तयार करण्याविषयींचें विवेचन आहे. दुसऱ्यांत, वेदाध्ययन करण्यासाठीं अवश्य त्या साधनांचा विचार केला आहे. आणि चवथ्या, पांचव्या,

कृष्णयजुर्वेदाचीं आरण्यकें.

---

१ कैयट हा मोठा वैय्याकरणी असून, त्याची पतंजलीच्या महाभाष्यावर टीका आहे. कदाचित हा इ. स. च्या सातव्या शतकांत होऊन गेला असावा, असें प्रोफेसर वेबर म्हणतो, व मैलवी आणि शाट्यायनी ब्राह्मण उत्तरेकडील असावे, असेंही त्याचें मत आहे.

२ महाभाष्याचा काल इ. स. पूर्वी १४० वर्षे होय.

व सहाव्या भागांत, शांतिक्रिया आणि श्राद्धविधि सांगितला आहे. बाकी राहिलेल्या चार भागांत, दोन उपनिषदें आहेत. म्हणजे, सातव्या, आठव्या, आणि नवव्या भागांमिळून एक उपनिषद् झालें असून, त्यालाच तैत्तिरीयोपनिषद् अशी संज्ञा आहे; व दहाव्या भागाला, याज्ञिकी किंवा नारायणीया–( उपनिषद् ) म्हणतात.

तैत्तिरीयोपनिषद्.

तैत्तिरीयोपनिषदाचे तीन भाग आहेत. १ संहितोपनिषद् (अथवा शिक्षावल्ली). २ आनन्दवल्ली. आणि ३ भृगुवल्ली. पहिल्यांत किंचित् व्याकरणनिरूपण असून, शिक्षेसंबंधीं विचार केला आहे, व तदनंतर लागलीच अध्यात्म विषयाचें प्रतिपादन आहे. दुसऱ्या आणि तिसऱ्या भागाला (दोन्ही मिळून) वारुणी–( उपनिषद् ) म्हणतात, व त्यांत ध्यान, समाधियोग, आणि चैतन्यस्वरूप, यांचें विवेचन आहे.

द्राविडी, आंध्र, व कर्नाटक लिपींतलें याज्ञिकी उपनिषद्.

तैतिरीयोपनिषदाच्या दहाव्या भागाच्या म्हणजे याज्ञिकी उपनिषदाच्या, द्राविड, आन्ध्र, आणि कर्नाटक लिपींत प्रती असल्याचें सायणाचार्य म्हणतात. तैत्तिरीय आरण्यकावर सायण व भट्ट भास्कर मिश्र यांची टीका आहे; व भट्ट भास्कर मिश्राच्या

---

१ तैत्तिरीयोपनिषदाचें भाषांतर, ( शंकराचार्यांच्या वृत्तीसहित ) झालें आहे; व शंकराच्या व्याख्येसहित हें तैत्तिरीय उपनिषद् रुअरनें बिब्लिओथिका इंडिकांत छापिलें आहे. मूळ उपनिषद् राजेन्द्रलाल मित्रानेंही छापिलें आहे.

टीकेला ज्ञानयज्ञ अशी संज्ञा आहे. हें आरण्यक सायणाच्या टीकेसहित राजेन्द्रलाल मित्रानें समग्र छापलें असल्याचें समजतें.[1] द्राविड लिपींतल्या चौसष्ट अनुवाकांवर, आणि आन्ध्र लिपींतल्या भिन्न भिन्न पाठांसहित ऐंशी अनुवाकांवर, सायणाची टीका आहे.

छागेय व श्वेताश्वतरस् उपनिषद्.

छागेय किंवा छागलेय–उपनिषद् आणि श्वेताश्वतरस्–उपनिषद् यांचा उल्लेख चरणव्यूहांत[2] केला आहे; व त्यावरून, तीं कृष्णयजुर्वेदांचींच उपनिषदें असल्याचें कळून येतें. श्वेताश्वतरस्–उपनिषदांत सांख्य आणि योगदर्शनाचें संमिलन करून, त्यांत सांख्य दर्शनाचा प्रवर्तक जो कपिलमुनि, त्याला देवाप्रमाणें मानल्याचें दिसतें.

मैत्रायण उपनिषद्.

मैत्रायण–उपनिषद ह्या दोन्हींपेक्षां विशेष पुराणतर असावेसें वाटतें. ह्यांतील कथाभाग असा आहे कीं, बृहद्रथ[3] राजाला ह्या सृष्टींतील वैभवाची क्षणभंगुरता वाटून, उपरति झाली. त्यामुळें, त्यानें आपल्या मुलाच्या हातीं सर्व राज्यकारभार सोंपला, आणि आपण तपश्चर्यार्थ वनांत गेला. पुढें, का..-

---

१ इ. स. १८६४–७२. ( बिब्लिओथिका इंडिका. )

२ वेदांच्या भिन्न भिन्न शाखांची ही एक अर्वाचीन सूचीच होय.

३ हा मगध देशाचा राजा असल्याचें महाभारतावरून दिसतें. ( २. ७५६ ). ह्याच्या मुलांचें नांव जरासध असून, त्याला पांडवांनीं मारलें.

न्तरानें, त्या तपोवनांत त्याची व शाकायन्य ऋषिवर्याची गांठ पडल्यावरून, ह्यांनीं त्याला उपदेश केला, आणि आत्मा व माया, अथवा प्रपंच आणि परमार्थ, यांचा कार्यकारण भाव त्यास समजावून सांगितला.

मैत्रायणोपनिषदावर रामतीर्थाची टीका.

मैत्रायणोपनिषदाचे सात प्रपाठक असून, त्याजवर रामतीर्थाची टीका आहे. हें, टीका व इंग्रजी भाषांतरासहित, कॉवेलनें बिब्लिओथिका इंडिकांत छापलें आहे. ( इ. स. १८६२-७० ).

आतां, कृष्णयजुर्वेदाच्या सूत्रांसंबंधीं थोडासा विचार करूं. ह्याचीं श्रौत आणि गृह्य अशीं दोन प्रकारचीं सूत्रें आहेत. श्रौतसूत्रें खालीं लिहिल्याप्रमाणें होत.

कृष्णयजुर्वेदाचीं श्रौतसूत्रें.

१ कठसूत्र. २ मनुसूत्र. ३ मैत्रसूत्र. ४ लौगाक्षीसूत्र. ५ मानवसूत्र. ६ मानवकल्पसूत्र. ७ कल्पसूत्र. ८ बौधायनसूत्र. ९ भारद्वाजसूत्र. १० आपस्तंबसूत्र. ११ हिरण्यकेशीसूत्र. १२ वाधूनसूत्र. १३ वैखानससूत्र. १४ भारद्वाजीयसूत्र. व १५ बौधायन-धर्मसूत्र.

मानवकल्पसूत्राची गोल्डस्टकरनें एक प्रत लिहिविली आहे. ( १८६१ ). हींत वैदिक संस्कारविधि आणि कुमारिलस्वामीची त्या सुत्रावरील टीका आहे. कल्पसूत्र हें सत्याषाढ हिरण्यकेशीचें असून, त्याचे सत्तावीस भाग आहेत, व त्या प्रत्येकाला प्रश्न अशी संज्ञा आहे. ह्यापैकीं, एकोणीसाव्या आणि विसाव्या प्रश्नांत, गृह्य व स्मार्तसूत्रां-

तील गृहसंस्कार सांगितले आहेत; व एकविसाव्या प्रश्नांत वंशावळीची यादी दिली आहे. ह्या कल्पसूत्रावर महादेव, मातृदत्त, आणि वांचेश्वर, यांची टीका असल्याचें कळून येतें. बौधायनसूत्र सदरहू महादेवाच्या मतें बरेंच पुरातन असून, ह्याच्या एका प्रश्नांत कल्पसूत्राप्रमाणेंच वंशावळ दिली आहे. ह्या सूत्रावर कपर्दस्वामी, भवस्वामी, सायण, अनंतदेव, नवहस्त, व शेष, यांची टीका आहे. आपस्तंब सूत्राचे तीस प्रश्न आहेत. ह्यांपैकीं पहिल्या तेवीस प्रश्नांत, दर्शपूर्णमासापासून तों सत्रायणपर्यंतचा यज्ञविधि सांगितला आहे. चोविसाव्या प्रश्नांत सामान्य नियम व परिभाषा दिली असून, शिवाय त्यांत प्रवरखंड आणि हौत्रकही आहे. प्रश्न पंचवीसपासून सत्तावीसपर्यंत गृह्यसूत्र आहे. प्रश्न अठ्ठावीस आणि एकोणतीसांत धर्मसूत्र आहे, व तिसाव्यांत शुल्वसूत्र आहे. ह्या सूत्रावर धूर्तस्वामी आणि तालवृंतनिवासी यांची टीका असल्याचें दिसतें. बौधायनधर्मसूत्रावर गोविंदस्वामीची टीका आहे.

कृष्णयजुर्वेदाचीं गृह्यसूत्रें.

कृष्णयजुर्वेदाचीं गृह्यसूत्रें म्हटलीं म्हणजे १ काठकगृह्यसूत्र, २ बौधायनगृह्यसूत्र, ३ भारद्वाजगृह्यसूत्र, ४ सत्याषाढ किंवा हिरण्यकेशीसूत्र, ५ आपस्तंबगृह्यसूत्र, ६ मैत्रायणीयगृह्यसूत्र, ७ मानवगृह्यसूत्र, ८ अत्रिसूत्र, ९ छागलेयसूत्र, १० लौगाक्षिसूत्र, व शाटयायनसूत्र, इत्यादि होत. ह्यांपैकीं, मानवगृह्यसूत्रें दृषद्वती आणि सरस्वती या दोन नद्यांच्या टापूंत तयार झालीं असावींत, असें जोहान्‌जेन्‌चें मत आहे.

कृष्णयजुर्वेदाचें प्रातिशाख्यसूत्रही आहे. ह्याचे वीस प्रवर्तक असल्याचें कळतें. त्यांपैकीं, आत्रेय, कौंडिन्य, (स्थविर कौंडिन्य ?), भारद्वाज, वाल्मीकि, अग्निवेश्य, अग्निवेश्यायन, आणि पौष्करसादि, इत्यादि मुख्य होत. बौद्धग्रंथांत, कौंडिन्य, अग्निवेश्यायन, व पौष्करसादि, हे बुद्धाचे शिष्य किंवा त्याचे समकालीन असल्याविषयीं वर्णन आहे. शिवाय, पौष्करसादि हा बौद्धग्रंथांचा प्रवर्तक असल्याबद्दल, कात्यायनानें देखील आपल्या पाणिनीवरील वार्तिकांत उल्लेख केला आहे.

कृष्णयजुर्वेदाचें प्रातिशाख्यसूत्र.

ह्या प्रातिशाख्यसूत्राची व्हिट्नेनें एक सुरेख आवृत्ति छापून काढिली आहे.[1] हींत मूळ संस्कृत, त्याचें भाषांतर, आणि त्रिभाष्यरत्न नांवाची टीका दिली असून, शिवाय, त्यानें आपल्या स्वतःच्या विस्तृत टीपा ही जागजागीं दाखल केल्या आहेत. त्रिभाष्यरत्न टीकेचा कोण प्रवर्तक आहे, हें नक्की समजत नाहीं. परंतु, तो कदाचित् कार्तिकेय असावा, असें वाटतें. ह्या सूत्रावर आत्रेय, माहिषेय, आणि वररुचि, यांची देखील पुरातन टीका असल्याचें कळून येतें. ह्या सूत्राचा काल इ. स. पूर्वीं, सहाशें वर्षें असावा, असें अनुमान करण्यास बरेंच साधन मिळतें, कारण, पौष्करसादि हा ह्या सूत्राचा एक प्रवर्तक असल्याविषयीं मागें सांगितलें असून, त्याच नांवाचा दुसरा गृहस्थ बुद्धाचा

त्याचें भाषांतर व टीका.

---

१ जर्नल. अमेरिकन ओरिएंटल सोसायटी ( ९. १८७१ ).

समकालीन असल्याचेंही वर्णन आहे. सबब, ह्या दोन्ही व्यक्ती एकच असल्यास, हें सूत्र बुद्धाच्यावेळीं झालें असावें, असें सहजीं अनुमान होतें. आणि ज्यापक्षीं बुद्धाचा निर्वाणकाल इ. स. पूर्वी ५४७ वर्षे होता, त्या पक्षीं हें सूत्र ह्याच्याही अगोदर झालें असावें, असें वाटतें.

कृष्णयजुर्वेदाची अनुक्रमणी.

आतां, फक्त कृष्णयजुर्वेदाच्या अनुक्रमणीचाच विचार करणें राहिला आहे. ह्या अनुक्रमणीका दोन आहेत. एक आत्रेयशाखेची, व दुसरी काठक शाखेंतील चारायणीय पोटभेदाची. पहिलीचे दोन भाग आहेत. १ गद्य, व २ पद्य. एकांत फक्त गोषवारा आणि नांवनिशी असून, दुसऱ्याचें चौतीस श्लोक आहेत; व त्यांतही बहुतेक तोच प्रकार आहे. ह्या दोन्ही भागांवर टीका असल्याचें कळून येतें. काठकानुक्रमणींत, आंतील मजकुराचा फारसा गोषवारा दिला नसून, प्रत्येक ऋचेचे अथवा सूक्ताचे ऋषी व त्यांचीं नांवें मात्र दिलेलीं आहेत. ही आत्रि ऋषीनें केली, व नंतर त्यानेंच ती लौगाक्षीला सांगितली, असें समजतें.

## शुक्ल यजुर्वेद.

शुक्ल यजुर्वेद व त्याचीं नांवें.

यजुर्वेदाचा दुसरा प्रकार म्हटला म्हणजे शुक्ल यजुर्वेद होय. ह्यालाच बृहदारण्यकांत "शुक्लानि यजूंषि" म्हटलें असून, कृष्ण यजुर्वेदाच्या आरण्यकांत "शुक्रयजूंषि" अशी त्याला संज्ञा दिली आहे. ह्याला वाजसनेय

असेंही आणखी नांव आहे. त्याचें कारण असें कीं, याज्ञवल्क्य हा शुक्लयजुर्वेदाचा प्रवर्तक असून, त्याच्या बापाचें नांव वाजसनि होतें. तेव्हां अर्थातच, वाजसनी-पासून झालेला जो वाजसनेय, त्याचेंच टोपण नांव त्याच्या कृतीला पडलें. ह्या संबंधानें महीधर[1] हा अशाच प्रकारचा खुलासा करतो. अथवा, कदाचित्, वाजसनेय म्हणजे हवन देणारा, असा देखील अर्थ होऊं शकेल. कारण, ह्या शब्दाचे घटकावयव पाहूं गेलें तर, ते वाज+सनि असेच दृष्टीस पडतात. आतां "वाज" शब्दाचा अर्थ बलि, हव्य, हवन, इष्टि, इत्यादि होत असून, "सनि" शब्दाचा अर्थ दान किंवा देणें, असा होतो. तेव्हां, देवांस हविर्भाग देऊन संतुष्ट करणारा तो वाजसनेय, असें समजावयाचें. ह्या वाजसनेय शब्दापासूनच वाजसनेयक[2] आणि वाजसनेयिन[3], अशीं रूपें झालेलीं आहेत.

कृष्णयजुर्वेदापेक्षां, शुक्लयजुर्वेदांत विषयव्यवस्था खरो-खरच चांगली असून, एकंदर विवेचनही विशेष पद्धतशीर रीतीनें केल्याचें दिसतें. ह्यांत, काण्व आणि माध्यंदिन अशा दोन शाखा आहेत, व त्याबद्दलचा

शुक्लयजुर्वेदांतील विषयव्यवस्था.

१ महीधर हा शुक्ल यजुर्वेद संहितेवरील टीकाकार होय. महीधराची टीका सोळाव्या शतकाच्या अंतीं झाली असल्याचें कळतें.

२ तैत्तिरीय आपस्तंब सूत्र. (कृष्णयजुर्वेद). कातीय सूत्र. (शुक्लयजुर्वेद).

३ अनुपद सूत्र. (सामवेद).

ह्या वेदाच्याच **प्रा**तिशाख्य सूत्रांत स्पष्ट उल्लेख आहे. सदरहू दोन्ही शाखांपैकीं, **का**ण्व शाखा विशेष पुराणतर असावीसें वाटतें. कारण, **का**ण्व हे अगदीं पुराणतम ऋषिपैकीं घराणें होय.

शुक्लयजुर्वेदाची काण्व शाखा.

**का**ण्वशाखेचे चाळीस अध्याय आहेत. ह्यांत **रा**जसूय यज्ञ आणि **अ**श्वमेध, यांचें विवेचन केलें आहे. **रा**जसूययज्ञांत, राजा पसंत करण्याचा विधि आहे. "**एषवो राजेति कुरवः पांचालाः**"[1] । अश्वमेधांत पुत्रप्राप्तीसाठीं जे कित्येक संस्कार सांगितले आहेत, ते फारच चमत्कारिक दिसतात. कारण, ज्या राजानें **अ**श्वमेध सुरू केला असेल, त्याच्या पट्टराणीनें ( ह्मणजे **म**हीषीनें ) हवनार्थ तयार केलेल्या एका अश्वाजवळ सर्वरात्र शयन केलें पाहिजे. इतकेंच नव्हे तर, त्याचें शिश्न तिच्या उपस्थावर ठेवण्याविषयींचाही विधि सांगितला आहे. ह्या **म**हिषी बरोबर दुसऱ्या राजपत्न्या देखील असतात; आणि त्यासर्वांस तिच्या समवेत जाणें अगदीं भाग पडतें. तदनंतर, त्या जमलेल्या समाजात, ती असे उद्‍गार काढतें कीं, " हे अंबे, हे अंबिके, हे अंबालिके, मजला येथें बलात्कारानें कोणीही आणिलें नसून, मी ह्या घोड्यापाशीं जुलमानें ही निजत नाहीं. परंतु, मी आपल्या स्वसंतोषानें ह्याच्या जवळ शयन करिते. कारण, मी जर ह्याच्याजवळ निजलें

१ ( ११; ३. ३. ६.३ ).

नाहीं तर, हा मत्सरी घोडा कांपील[1] नगरींत राहणाऱ्या दुष्ट सुभद्रेजवळ जाईल."[2]

माध्यंदिन शाखेचे देखील काण्व शाखेप्रमाणेंच चाळीस अध्याय आहेत. मात्र, त्यांचे तीनशें तीन अनुवाक असून, एक हजार नऊशें पंचाहत्तर कंडिका आहेत. पहिल्या पंचवीस अध्यायांत, यज्ञक्रियेचा सामान्य तपशील आहे. म्हणजे, पहिल्या आणि दुसऱ्या अध्यायांत, दर्श व पूर्णमासीचे यज्ञसंस्कार सांगितले आहेत. तिसऱ्यांत, सायंसंध्या आणि चातुर्मास्याचा होमविधि निवेदन केला आहे. चवथ्यापासून आठव्या अध्यायापर्यंत, सोम यज्ञाचें सर्वसाधारण निरूपण आहे. नवव्यांत व दहाव्यांत त्याचें रूपान्तरविधान आहे. अकरा ते अठरापर्यंतच्या अध्यायांत, वेदिरचना[3], किंवा स्थंडिलें कशीं करावीं याविषयींचें विवेचन आहे. एकोणवीसपासून एकवीसपर्यंत सौत्रामणीविधि, म्हणजे सोमरस अतिशय प्यायल्याकारणानें जे दुष्परिणाम भोगावे लागतात, त्यांचा निरसनविधि सांगितला आहे. आणि बावीसपासून पंच-

शुक्ल यजुर्वेदाची माध्यंदिन शाखा, व तिच्यांतील विषय.

---

१ हें शहर पांचाल देशांत आहे. कांपिल्य ही मध्यदेशाची पूर्व सीमा समजावयाची. (प्रतिज्ञा परिशिष्ट).

२ सुभद्रा ही पांचाल देशाच्या राजाची कन्या होय. "**सुभद्रिकां कांपीलवासिनीम्**"

३ त्यांचा मुख्य प्रवर्तक शांडिल्य होय; व त्याला त्या कामांतला शास्त्राच समजतात.

तीसपर्यंतच्या अध्यायांत **अश्वमेधाचें** वर्णन आहे. सत्तीसपासून पस्तीसपर्यंतच्या अध्यायांस **खिल** अशी संज्ञा दिली असून, त्याचा उल्लेख **परिशिष्टांत, महीधरटीकेंत**[1], व **कात्यायनकृत शुक्ल यजुर्वेदानुक्रमणींत** आहे. आणि छत्तीसपासून चाळीसपर्यंतच्या अध्यायांस **शुक्रिय** असें नांव पडलें आहे.

विज्ञानेश्वराचा तत्संबंधीं अभिप्राय.

**याज्ञवल्क्याच्या स्मृतीवर मिताक्षरा** म्हणून **विज्ञानेश्वराची** टीका आहे. तिजवरून असें दिसतें कीं, तिसाव्या अध्यायाच्या तिसऱ्या अनुवाकापासून तों पस्तीसाव्या अध्यायाच्या शेवटपर्यंत शुक्रिय आहे, व छत्तिसाव्या अध्यायाच्या पहिल्या अनुवाकापासून **आरण्य**काला प्रारंभ होतो. तीसपासून एकुणचाळीस अध्यायापर्यंत **पुरुषमेध, सर्वमेध, पितृमेध,** आणि **प्रवर्ग्य,** यांचें विवेचन आहे; व चाळीसाव्या अध्यायाला **उपनिषदच** मानतात. कारण, त्यांत यज्ञप्रकरण किंवा यागविधि असा मुळींच सांगितलेला नाहीं.

विषयविवेचनावरून तत्कालीन सामाजिक स्थिति.

सोळाव्या अध्यायांत **रुद्राची** आराधना सांगितली असून, एकुणचाळीसाव्या अध्यायांत, त्याला **ईशान** व **महादेव** अशीं नांवें दिलीं आहेत. तिसाव्या अध्यायांत **पुरुषमेधाला** योग्य पुरुष कोणता व कशाप्रका-

---

१ **महीधराची शुक्ल यजुर्वेद संहितेवर** टीका आहे.

रचा निवडावयाचा, एतद्विषयक विवेचन[1] आहे. आणि कित्येक अध्यायांत, **नक्षत्रदर्श, गणक,** इत्यादि ज्योतिःशास्त्रविषयक शब्द आढळतात. त्यावरून, तत्कालीन लोकमत, धार्मिक व सामाजिक स्थिति, विद्याव्यासंग, आणि शास्त्रावलोकन, इत्यादींचें दिग्दर्शन होतें. तसेंच, **नक्षत्रदर्श, गणक,** वगैरे शब्दांवरून, त्याकाळीं ज्योतिःशास्त्र आणि दैवज्ञविद्या, इत्यादींचें मोठ्या परिश्रमानें परिशीलन होत असल्याचें दिसतें, यांत संशय नाहीं.

शुक्लयजुर्वेदावर टीका.

**वा**जसनेयि–**सं**हितेची ( म्हणजे **का**ण्व आणि **मा**ध्यंदिन या दोन्ही शाखांची ) आवृत्ति **म**हीधरकृत टीकेसहित **ए. वे**बरनें[2] छापिली आहे. **म**हीधराशिवाय, **उ**अट व **मा**धव[3] यांनीं ही **वा**जसनेयि–**सं**हितेवर टीका केली होती. परंतु, **उ**अटाच्या टीकेपैकीं कांहीं भाग मात्र उपलब्ध असून, **मा**धवाची फक्त **का**ण्व शाखेवरच असलेली टीका अजिबात गाहाळ किंवा नाहींशी झाल्याकारणानें, कोठें सुद्धां मिळत नाहीं. **वाज-सनेयि–सं**हितेची आवृत्ति ( **म**हीधरकृत टीकेच्या **हिं**दी भाषांतरासहित ) **गि**रिप्रसादवर्मानें[4] छापिली आहे.

येथपर्यंत **शुक्ल यजुर्वेदाच्या सं**हितेबद्दलचा विचार झाला.

---

१ ह्यांत, मागध, अतिकुष्ट, सूत, शैलूष, क्लीब, अयोगू, पुंश्चलू, इत्यादि अर्पण केलेले इसम होत. मागध ह्मणजे मगधदेशोत्पन्न असावा असें वाटतें.

२ **बर्लिन** (इ० स० १८४९–५२). ३ हा **बे**स्माचा राजा होय. ४ इ० स० १८७०–७४.

शुक्ल यजुर्वेदाचे ब्राह्मण, व

सबब, आतां त्याच्या ब्राह्मणाकडे वळूं. हे ब्राह्मण शतपथ नांवानें सर्वांस महशूर असून, त्यांच्या नांवाप्रमाणेंच त्याचे शंभर पथ किंवा अध्याय आहेत.

माध्यंदिन शाखेतील विवेचन.

माध्यंदिन शाखेंत, शतपथ ब्राह्मणाचीं चवदा कांडें आहेत, आणि त्यांतील मजकुराप्रमाणें त्या प्रत्येकाचें नामधेयही अगदीं भिन्नभिन्न आहे. मात्र, ह्याला दुसरें व सातवें कांड अपवाद असून, त्यांचीं नांवें एकपादिका आणि हस्तिघट अशीं आहेत. सदर्हू चवदा कांडांचे १०० अध्याय, ( अथवा ६८ प्रपाठक ), ४३८ ब्राह्मण, व ७६२४ कंडिका केल्या आहेत.

शुक्लयजुर्वेदसंहितेच्या पहिल्या अठरा अध्यायांत जें विवेचन आहे, त्याबद्दलचा ऊहापोह करून तत्संबंधीं तपशीलवार व्याख्यान, माध्यंदिन शाखेच्या पहिल्या नऊ कांडांत दिलें आहे. ह्या नऊ कांडांमिळून साठ अध्याय आहेत.[1] दहाव्या कांडांत अग्निसंबंधीं निरनिराळ्या पौराणिक आख्यायिका दिल्या आहेत; व ह्या कांडाचें नांव अग्निरहस्य असल्याप्रमाणें, तद्विषयक बराच तपशील त्यात सांगितला आहे. अकराव्या[2] कांडाला अष्टाध्यायी म्हणतात; आणि ह्यांत पूर्व कथित गोष्टींचाच बहुतेक अनुवाद आहे. बाराव्या[3] कांडाला मध्यम अशी संज्ञा असून, त्यांत प्रायश्चित्त-

---

१ आणि म्हणूनच ह्यांस षष्टिपथ अशी संज्ञा मिळाली असावी. २ ह्या कांडांला संग्रह असें ही म्हणतात. ३ बारावें, तेरावें, व चौदावें कांडामिळून परिशेष अशी संज्ञा आहे.

विधि सांगितला आहे; व यज्ञविधींत न समजून झालेल्या, किंवा होत असलेल्या, अथवा होणाऱ्या दोषाबद्दलच्या प्रतिकारार्थ योजना आहे. तेराव्या कांडास अश्वमेध असें नांव आहे. ह्यांत अश्वमेधाचें प्रथमतः तपशिलवार विवेचन देऊन, नंतर अगदीं थोडक्यांत पुरुषमेध, सर्वमेध, आणि पितृमेध, यांची हकीकत दिली आहे. चवदाव्या कांडाला आरण्यक म्हणतात, व त्याचे एकंदर नऊ अध्याय आहेत. ह्यांपैकीं पहिले तीन अध्याय प्रवर्ग्य विषयक असून, शेवटल्या सहा अध्यायांत उपनिषद् विवेचन आहे, आणि त्यास बृहदारण्यक म्हणतात. ह्याचे पांच प्रपाठक किंवा सहा अध्याय आहेत, व त्यांतही पुनः कांडात्मक विभाग आहेत. म्हणजे अध्याय १–२ मिळून मधुकांड होतें. अध्याय ३–४ चें याज्ञवल्क्य[१] कांड समजावयाचें. आणि अध्याय ५–६ चें खिलकांड होय.

आरण्यकोपनिषद्.

शुक्लयजुर्वेदाच्या ब्राह्मणावरून, त्यावेळीं विद्येची खरोखरच पुष्कळ चळवळ असावी, असें निःसंशय वाटतें. इतकेंच नव्हे तर, विद्येच्या अनेक शाखा परिपूर्णतेस आणण्याविषयींची अगदीं ज्यारीनें खटपट सुरू होती, हें चांगल्या रीतीनें व्यक्त होतें. कारण, ऋग्वेद हे आदिवेद असल्याकारणानें, त्यांतील तत्वें प्रातिष्ठापित

तत्कालीन विद्येची चळवळ.

१ याज्ञवल्क्य–कांडांत, मैत्रेयी आणि कात्यायनी अशा याज्ञवल्क्याच्या बायका असल्याविषयीं सांगितलें आहे.

करण्याबद्दल सर्वांचेंच एक दिल असे. यजुर्वेदाचें अध्ययन तितक्याच उत्सुकतेनें व आनंदानें होई. कित्येकजण सामवेदाचें परिशीलन करीत. आणि कांहींजण अथर्ववेदाचें अध्ययन करण्याविषयींची लालसा दाखवीत. ज्ञानार्जनाच्या संबंधानें तर, प्रत्येकाचीच उत्कट इच्छा असे. त्यामुळें, जो तो शिक्षण घेण्यास एका पायावर तयार होई. कारण, शिक्षण देण्याच्या संबंधानें कोणत्याच प्रकारची उणीव नसे. शिवाय, शिक्षण कसें द्यावें, व तें कोणत्या प्रकारें द्यावें; छात्रवर्गाच्या मनांत तें कसें बिंबवावें, आणि त्याचा कायमचा संस्कार कसा करण्यांत यावा; वंशपरंपरेनें त्याचें अनुकरण कसें व्हावें, व हें आर्यज्ञानभांडार ह्या भरतभूमींत कशा प्रकारें चिरायु रहावें; विद्याभिवृद्धि कशी व्हावी, आणि ज्ञानाचा लाभ सर्वांस सुलभ रीतीनें कसा मिळावा; याविषयीं आमच्या पुण्यपूर्वजांनीं फारच परिश्रम केले होते. त्यामुळें, ज्ञानार्जन आणि विद्यादान, यांत ते अगदीं निपुण झाले असून, ह्या दोन्ही कला त्यांनीं अगदीं परिपूर्णतेस आणिल्या होत्या, असें म्हणावें लागतें. किंबहुना, लोकशिक्षणपद्धतीची एक अपूर्व कलाच त्यांनीं साध्य केली होती, असेंही म्हणण्यास काडीमात्र देखील हरकत नाहीं.

लोकशिक्षणार्थ आर्यांचे उदार परिश्रम.

ह्यावेळीं, कदाचित्, माझ्या प्रिय वाचकांस असें वाटेल कीं, मी आपल्या पूर्वजांचा स्तुतिपाठ गातांना, अगदीं निष्कारण अतिशयोक्ति करीत आहे; किंवा त्यांच्या

तद्विषयक पाश्चात्यां-
चा सानुकूल अभिप्राय.

अंगीं नसलेल्या गुणांचा फाजील देऽहारा माजवीत आहे. परंतु, तसें बिलकुल नाहीं. तथापि, हा मजवरील आरोप टळून मजला त्यांचा बोल लागू नये म्हणून, ज्र मीं जें सदरीं लिहिलें आहे तें केवळ यथार्थ आहे हें दाखविण्यासाठीं, एक पाश्चात्य विद्वन्मुकुटमणि डाक्तर मोक्षमुलर यांचेच उद्गार येथें नमुद करतों. म्हणजे त्यावरून, वाचकाची सहजींच खात्री होईल.

ते असें म्हणतात कीं, आर्यांची शिक्षणकला तितक्या पुरातन काळींही अगदीं परिपूर्णतेस आली होती. "The *art of teaching* had even at that *early time* been reduced to a *perfect system*." (What can India teach us ? P. 214. )

ह्याशिवाय, वाक्पांडित्य, वक्तृत्व, आणि विवादनैपुण्य,

विद्येच्या अन्य शाखांचा व्यासंग.

यांत देखील त्यांचा पुष्कळ व्यासंग अ(.ल्याचें दिसतें पौराणिक कथानकांत, त्यांचा हात धरणारें किंवा त्यांची बरोबरी करणारें राष्ट्र, ह्या पृथ्वीच्या पाठीवर एकसुद्धां सांपडणार नाहीं. आणि गाथादि ग्रंथांत त्यांचें भांडार खरोखरच अपूर्व आहे, हें कोणासही कबूल करावें लागेल. तेव्हां, ह्या दोन्ही शाखांत त्यांचे परिश्रम फार दिवसापासूनचे असून, त्यांस ह्या वेळीं विशेष प्रोत्साहन मिळालें असावें, असें वाटतें. यातुविद्या (चेटक), सर्पविद्या, मंत्रविद्या, इत्यादींचाही अभ्यास त्यावेळीं पुष्कळ लोक करीत असाव, असें अनुमान होतें. आतां, इति-

ह्यासारख्या अति महत्वाच्या शाखेचें परिशीलन कर-ण्याबद्दल त्यांनीं वारंवार लिहिलें असल्याविषयीं इतस्ततः दृष्टिगोचर होतें खरें. तथापि, ही शाखा आमच्या पूर्वजांनीं सुगमतेस आणिल्याचें दिसत नाहीं; अथवा, आधुनिक शास्त्रीय पद्धतीस अनुसरून, ती त्यांनीं नांवारूपास आ-णिल्याचेंही भासत नाहीं. असो, आर्यांचें अलौकिक ज्ञान म्हटलें म्हणजे आध्यात्मिक विद्या होय. आणि ह्यामुळेंच त्यांचा कीर्तिपरिमल अखिल जगांत पसरला. तेव्हां, ह्या त्यांच्या आवडत्या विषयाचा व्यासंग, शुक्लयजुर्वे-दकाळीं देखील त्यांनीं अगदीं ज्यारीनें तसाच चालू ठेविला होता, हें ज्यास्त सांगावयास नलगे.

सर्वांस विद्यामृतपान.

अशा प्रकारची आमच्या आर्यसमाजाची प्राचीन स्थिति असल्या कारणानें, त्यावेळीं तरुण अथवा वृद्ध, श्रीमंत किंवा गरीब, लहान अगर थोर, उच्च वा नीच, यां सर्वांस आमचे उदार पूर्वज मोठ्या प्रेमानें ज्ञानामृत पाजीत. आणि म्हणूनच त्याकाळीं विद्यार्जनाची खरी व साधार-णतः विशेष चळवळ होती, असें मानण्याला बलवत्तर कारण मिळतें.

अनेक आचार्यांचीं नांवें, व विशेष शाखांचें अध्य-यन करण्याबद्दलची अ-नुज्ञा.

कित्येक[1] कांडांत नामांकित आचार्यांचीं नांवें दिलीं आहेत. उदाहरणार्थ, आषाढसाव-यस, बर्कुवार्ष्णे, औपोदितेथ, पांचि, तक्षन्, रौहिणायन, सायकायन, वामकक्षायन, जीवलचैलकि, आ-

1 कांड ७-८-९-१४. वाजसनेयि-संहिता. माध्यंदिनशाखा.

सुरि, माधुकि, कहोड, कौषीतकि[1], वार्ष्णयसात्ययज्ञ, सात्ययज्ञि, राजस्तंबायन, शांडिल्यायन, सात्यायनि, सात्यायनी, तांड्य, बुडिलआश्वतराश्वि, रामऔपतास्विनि, कौकूस्त, माहित्थि, मुडिभ-औदन्य, जाबाल, शैलालि, शांडिल्य, तुरकावषेय[1], इत्यादि. माध्यंदिन शाखेच्या अकराव्या आणि चवदाव्या[2] कांडांत ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद, अथर्वांगिरस, इतिहास, पुराण, विद्या, उपनिषदें, श्लोक, सूत्र, अनुव्याख्यायन, व्याख्यायन, इत्यादींचें अध्ययन करण्याबद्दल विशेष रीतीची अनुज्ञा आहे. शिवाय, तैत्तिरीय-आरण्यकांत देखील अथर्वांगिरस, ब्राह्मण, इतिहास, पुराण, कल्प, गाथा, नाराशंसी, वगैरेचें पठण करण्याविषयीं सांगितलें असून, सदरहू सर्व विषयांस स्वाध्याय असें म्हटलें आहे. त्यावरून, सदरहू विद्येच्या शाखा, त्यावेळीं, आमच्या आर्यपूर्वजांच्या विशेष आवडीच्या होत्या, असें चांगलें व्यक्त होतें.

शतपथब्राह्मणाच्या काण्व शाखेचा तपशील.

शतपथब्राह्मणांची काण्व शाखेंतील सतरा कांडें आहेत; व त्यांचे १०४ अध्याय, ४४६ ब्राह्मण, आणि ५८६६ कंडिका, असे पोटविभाग केले

---

१ हा कवषाचा वंशज होय कवषाचें दिग्दर्शन ऐतरेय ब्राह्मणांत आहे, व तो सरस्वती नदीच्या तीरीं राहात असावा, असें वाटतें. हा जनमेजयाचा समकालीन असल्याचें ऐतरेय ब्राह्मणावरून होतें. कारण त्याचा तो पुरोहित होतासें दिसतें.

२ याज्ञवल्क्य कांड. ( अ० ६–१०. )

आहेत. ह्यांत, कांडांचीं नांवें बहुतेक एकसारखींच दिसतात; म्हणजे माध्यंदिन शाखेप्रमाणें प्रत्येक कांडाबरहुकूम तीं मिळतींच आहेत. परंतु, काण्व शाखेंत, पहिल्या, पाचव्या, व चवदाव्या कांडाचे पृथक् पृथक् दोन भाग केले असून, क्वचित् ठिकाणीं दुसराही थोडासा फेरफार आहे.

शतपथ ब्राह्मणावरील टीका, व भारतीय प्रयत्न.

शतपथब्राह्मणाच्या **माध्यंदिन** आणि **काण्व** अशा दोन शाखा असल्याचें पूर्वी सांगितलेंच आहे. ह्यापैकीं, **माध्यंदिन** शाखेवर **हरिस्वामी** व **सायण** यांची टीका आहे. मात्र, ती समग्र नसून, फक्त कांहीं भागाचीच उपलब्ध असल्याचें दिसतें. ह्याच **ब्राह्मणांपैकीं** **माध्यंदिन** शाखेंतील चौदाव्या कांडाचें उत्तरार्ध **बृहदारण्यक** होय; आणि ह्याजवर **शंकराचार्य** व **गुजराथचे द्विवेदगंग** यांची टीका आहे. शतपथ**ब्राह्मणाच्या** **काण्व** शाखेवर **शंकराचार्यांची** टीका असून, **वाजसनेयि-संहितेच्या** सोळाव्या[1], एकतिसाव्या[2], बत्तिसाव्या[3], चौतिसाव्या[4] ( प्रारंभीच्या ), व चाळीसाव्या[5] अध्यायाला **उपनिषद्** म्हणतात; त्यापैकीं **इशोपनिषद्वर** देखील त्याचीच टीका आहे. ह्या टीकेवर **शंकराचार्यांच्या** कित्येक शिष्यांची व्याख्या असल्याचें समजतें.

---

१ ह्याला **शतरुद्रिय** अशी संज्ञा आहे.

२ ह्याला **पुरुषसूक्त** म्हणतात.

३ ह्याचें **तदेव** असें नामधेय आहे.

४ ह्याला **शिवसंकल्प** अशी संज्ञा आहे.

५ ह्याला **ईशोपनिषद्** म्हणतात.

ह्या संबंधानें पाश्चात्यांच्या प्रयत्नाबद्दलचा विचार केला म्हणजे असें कळून येतें कीं, वेबरनें पहिल्या कांडाची आवृत्ति त्याजवरील व्याख्येसहित काढिली आहे. (इ० स० १८५९.) आणि पहिल्या अध्यायाचें व किंत्येक कथानकांचें भाषांतरही त्यानें केलें आहे. (इ० स० १८६८.) काण्वशाखेंतील बृहदारण्यकाची आवृत्ति पोले आणि रुअर यांनीं छापिली असून, रुअरनें पहिल्या अध्यायाचें भाषांतरही केलें आहे. (इ० स० १८५८).

तत्संबंधीं पाश्चात्य प्रयत्न.

शुक्ल यजुर्वेदाचीं १ श्रौत आणि २ गृह्य अशीं दोन प्रकारचीं सूत्रें आहेत. ह्यांपैकीं पहिलें कात्यायनकृत असून, त्यास कात्यायनसूत्र म्हणतात. आणि दुसरें पारस्करानें केलेलें असून, त्यांस कातीयगृह्यसूत्र ह्मणतात.

शुक्लयजुर्वेदाचीं सूत्रें.

श्रौतसूत्राचें सव्वीस अध्याय आहेत. त्यापैकीं पहिल्यांत सामान्य परिभाषा सांगितली असून, नंतरच्या सतरा अध्यायांत एकंदर यज्ञविधीचा तपशील, त्याचा परस्परांशीं संबंध, व अवश्य त्या प्रसंगीं तद्विषयक व्याख्या किंवा टीकाही दिली आहे. एकोणीसाव्या अध्यायांत सौत्रामणि नांवाच्या विधीचें विवेचन आहे. विसाव्यांत अश्वमेधाचा वृत्तान्त असून एकविसाव्यांत पुरुषमेध, सर्वमेध, आणि पितृमेध सांगितला आहे. बावीस, तेवीस, व

श्रौतसूत्राचा तपशील व त्यांतील विषय.

चोवसाव्या अध्यायांत, एकाह[1] अहीन[2] आणि सत्रे[3], या यज्ञांचें विवेचन आहे. पंचविसाव्या अध्यायांत प्रायश्चित्त-विधि सांगितला आहे; व सव्वीसाव्यांत प्रवर्ग्याचा विचार केला आहे.

श्रौतसूत्रांतील आचार्यांचीं नांवें खालीं लिहिल्याप्रमाणें होत. १ लौगाक्षी. २ भारद्वाज. ३ जातुकर्ण्य. ४ वात्स्य. ५ बादरी. ६ काशकृत्स्नि. आणि ७ कार्ष्णाजिनि.

श्रौतसूत्रावरील टीकाकार.

श्रौतसूत्राला कात्यायन सूत्र म्हणत असल्याचें पूर्वी सांगितलेंच आहे. ह्याजवर पुष्कळ टीकाकार असल्याचें कळतें. परंतु, त्यापैकीं खालीं लिहिलेले मुख्य म्हणण्यास हरकत नाहीं. १ यशोगोपि. २ महीधर. ३ कर्क[4]. ४ पितृभूति. ५ भर्तृयज्ञ. ६ श्रीअनंत. ७ देवयाज्ञिक ( किंवा याज्ञिकदेव ). व ८ महादेव[5].

---

१ एक दिवस चालणारा यज्ञ संस्कार. २ अनेक दिवस चालणारा यज्ञ विधि ३ हा यज्ञ तेरा दिवसांपासून शंभर दिवसपर्यंत चालतो.

४ हा संवत् ३८० ( इ० स० ३२४ ) च्या सुमारास किंवा त्यापूर्वी होऊन गेला असावा, असें वाटतें. कारण, श्रीदत्तकुशली ( प्रशान्तराग ) याच्या ताम्रपटांत, धूम्रायण सगोत्रक कर्काध्यापक असें लिहिल्याचें आढळून येतें, व ह्याचा काल संवत ३८० असल्याचें कळतें.

५ हा इ. स. च्या सोळाव्या शतकांत ( पूर्वार्धांत ) झाला असल्याबद्दल, व मुहूर्तमार्तंडाचा कर्ता जो नारायण त्याचाच हा बाप असल्याविषयीं कित्येक विद्वानांचें मत आहे.

श्रौतसूत्राच्या पद्धति व परिशिष्टें.

ह्या सूत्राच्याच कांहीं पद्धती ह्मणजे स्थूलवर्णनात्मक लेख आहेत, व त्यांचे प्रवर्तक गदाधर, हरिहरमिश्र, रेणुदीक्षित, आणि गंगाधर, इत्यादि असल्याचें समजतें. त्याचप्रमाणें, ह्याचीं कित्येक परिशिष्टेंही असून, तीं कात्यायनानें केलीं असल्याविषयीं कळून येतें. सदरहू परिशिष्टांपैकीं, निगमपरिशिष्ट व प्रवराध्याय हीं विशेष महत्वाचीं होत. निगमपरिशिष्ट ह्मणजे शुक्लयजुर्वेदांतील पर्याय शब्दांचा कोशच समजावयाचा. प्रवराध्यायांत मात्र भिन्न भिन्न कुलपरंपरा दिली असून, त्यांतील कोणकोणत्या कुटुंबांचा अन्य कुटुंबाशीं शरीरसंबंध होणें इष्ट अगर अनिष्ट आहे, अथवा निदान हरकती सारखें तरी नाहीं, याविषयींचें विवेचन आहे. चरणव्यूहांत प्रत्येक वेदाच्या भिन्नभिन्न शाखांचें वर्णन आहे.

आणि चरणव्यूह.

कातीय गृह्यसूत्राचा प्रवर्तक पारस्कर.

कातीय गृह्यसूत्राचा प्रवर्तक पारस्कर होय. पारस्कर ही एक संज्ञा किंवा विशेषनाम असावें; अथवा कदाचित् तें नांव एकाद्या प्रांतावरूनही पडलें असल्याचा संभव आहे. पारस्करकृत एक स्मृतिशास्त्र देखील असून, तें ह्याच गृह्यसूत्राच्या आधारानें रचलें असल्याचें दिसतें. शिवाय, पराशकृत कल्प आणि पाराशर्यकृत भिक्षुसूत्रही आहे. परंतु, हीं दोन्हीं त्याचींच समजावयाचीं कीं कसें, हें ध्यानांत येत नाहीं.

कातीय गृह्यसूत्रावर जयराम व रामकृष्ण यांची टीका आहे. ह्यापैकीं रामकृष्णाची टीका अत्युत्तम असून, त्याच्या अभिप्रायाप्रमाणें यजुर्वेदाच्या एकंदर शाखांत काण्वशाखा श्रेष्ठतम असल्याचें दिसतें. ह्याच्या टीकेला संस्कार गणपति असें नामधेय आहे. कातीय गृह्यसूत्रावर एक पद्धति ही आहे, व तिचा प्रवर्तक वासुदेव होय.

कातीय गृह्यसूत्रावरील टीकाकार.

वैजपाचें देखील एकादें गृह्यसूत्र असल्याचें कळून येतें.

वैजपसूत्र.

ह्याशिवाय, शुक्लयजुर्वेदाचें वाजसनेयि गोत्रापैकीं माध्यंदिनशाखेचें प्रातिशाख्यसूत्र, आणि अनुक्रमणी, अशीं आहेत, व त्यांचा प्रवर्तक कात्यायन असल्याविषयीं त्यांच्याच शेवटीं उल्लेख आहे. ह्यालाच वाजसनेयि प्रातिशाख्य म्हणतात. ह्या प्रातिशाख्यसूत्राचे आठ अध्याय असून, पहिल्या अध्यायांत संज्ञा व परिभाषा दिली आहे. दुसऱ्यांत स्वरविचार आहे. तिसरा, चौथा, आणि पांचवा, यांत संस्कारविवेचन म्हणजे संधिविचार आहे. सहाव्यांत क्रियापदविचार आहे. आणि सातव्या व आठव्या अध्यायांत, स्वर, व्यंजन, आणि पाठ, यांसंबंधीं विवेचन आहे. ह्या प्रातिशाख्यसूत्रावर उवटाची उत्तम टीका आहे; व ह्याचेंच (उवटाचें) मातृमोदक असेंही

प्रातिशाख्यसूत्र; आणि अनुक्रमणी.

दुसरें नामधेय आहे. ह्या सूत्राची आवृत्ति, मूळ संस्कृत, भाषांतर, आणि टिप्पणांसहित, वेबरनें छापिली आहे.

अनुक्रमणींतील विषय.

अनुक्रमणीचे पांच अध्याय असून, ती कात्यायनानें केली असल्याचें पूर्वी सांगितलेंच आहे. हींत शुक्ल यजुर्वेदाच्या ऋचांचे प्रवर्तक, त्यांच्या देवता, त्यांचे छन्द, आणि त्या केव्हां म्हणावयाच्या, इत्यादि विचार आहे. ह्या अनुक्रमणीवरच श्रीहालाची पद्धति आहे.

यजुर्वेदाचीं वेदांगें.

यजुर्वेदाचीं देखील वेदांगें आहेत. मात्र, तीं शिक्षा, छन्द, व ज्योतिष, अशीं तीनच असून, एतद्विषयक विवेचन वेदांगांत पूर्वी केलेलें आहे.

# भाग ६१ वा.

## वैदिकग्रंथोदधि.

## सामवेद.

सामवेद.

येथपावेतों कृष्ण आणि शुक्लयजुर्वेदांसंबंधीं विचार झाला. सबब, आतां सामवेदाकडे वळूं, व त्यांतील विषयांचें विवेचन करूं.

सामवेदांत, ऋग्वेदांतल्याच बहुतेक ऋचा असून, सोमसूक्तांतील ऋचा तर त्यांत विशेषेंकरून घेतल्या आहेत. मात्र, भेद ह्मणून इतकाच कीं, ऋग्वेदांतून ज्या ज्या ऋचा सामवेदांत घेतल्या आहेत, त्या सर्व ऋग्वेदांत असलेल्या अनुक्रमानेंच सामवेदांत सामिल केल्या नसून, त्यांचा उपयोग केवळ प्रसंगानुसार, व भिन्न भिन्न स्थळीं, आणि निरनिराळ्या प्रकारें केला आहे.

पहिल्या दोन वेदांप्रमाणेंच सामवेदाची देखील संहिता, ब्राह्मणें, उपनिषदें, सूत्रें, पद्धति, व परिशिष्टें, अशीं आहेत.

सामवेद संहिता, व तिच्यांतले विषय.

सामसंहितेचे दोन भाग केलेले दिसतात. ह्यापैकीं पहिल्या भागाचे सहा पोटविभाग आहेत, व त्यांस प्रपाठक असें ह्मणतात. प्रत्येक प्रपाठकांत दहा

दशतें ( म्हणजे दसकें ) असून, प्रत्येक दशत किंवा दसक दहा ऋचांचें केलेलें आहे. पहिल्या बारा दसकांत अग्नीचें आवाहन आहे. तदनंतरच्या सदतीस दसकांत इन्द्राची स्तुति आहे. आणि शेवटल्या अकरा दसकांत सोमाची प्रार्थना आहे. सामसंहितेच्या दुसऱ्या भागांत नऊ प्रपाठक आहेत. परंतु, ह्यांतील ऋचांच्या संख्येचा नेम नसून, कांहींत दोन व कांहींत तीन, याप्रमाणें असतात. सदरीं, सामसंहितेचे जे दोन भाग सांगितले, त्यापैकीं पहिल्यास आर्चिक, छन्दस्, किंवा छन्दसिका म्हणतात; आणि दुसऱ्यास उत्तरार्चिक अथवा उत्तरा अशी संज्ञा आहे.

आरण्यक संहिता.

सामसंहितेचा सातवा प्रपाठक सुद्धां हल्लीं उपलब्ध झाला आहे, व ह्याला आरण्यक संहिता म्हणतात. हिची एक आवृत्ति सिग्फ्रीड गोल्ड्स्मिड्नें इ. स. १८६८ सालीं काढिली होती. भरतस्वामीच्या सामवेद विवरणांत ह्याच आरण्यकसंहितेचा विशेष रीतीनें उल्लेख केलेला दिसतो. ह्या संहितेवर सायणाचार्यांचें भाष्य असून, तिची आवृत्ति ह्या भाष्यासहित सत्यव्रत सामाश्रमीनें काढिली आहे. ( कलकत्ता. इ. स. १८७३. )

सामगानें.

ह्याशिवाय, सामवेदाचीं चार गानें देखील आहेत. १ ग्रामगेयगान; [1] ह्यालाच वेयगान म्हणण्याचा परिपाठ असून, ह्याचे सतरा

१ हें त्याच्या नांवावरून, कदाचित् नगरांत किंवा वस्तीच्या ठिकाणीं म्हणण्याचा उद्देश असावा, असें वाटतें.

प्रपाठक आहेत. २ अरण्यगान[1]; ह्याचे सहा प्रपाठक आहेत. ३ ऊहगान; ह्यांत तेवीस प्रपाठक आहेत. व ४ ऊह्यगान; ह्याचे सहा प्रपाठक आहेत.

सामसंहितेंत एकंदर १८१० ऋचा आहेत. ह्यापैकीं पहिल्या भागांतल्या ५८५ असून, दुसऱ्या भागांतल्या १२२५ आहेत. तथापि, ह्यांत देखील कांहीं ऋचा दुबार आल्याचें दिसतें.

सामसंहितेच्या तीन शाखा असल्याचें कळून येतें.

सामसंहितेच्या शाखा.

१ राणायनीय. २ कौथुम. आणि ३ जैमिनी. ह्यापैकीं, राणायनीय शाखा महाराष्ट्रांत प्रचारांत असून, कौथुमशाखा गुजराथेंत, व जैमिनी शाखा कर्नाटकांत अमलांत असल्याचें समजतें. कौथुम शाखेचा आणखी एक पोटभेद आहे, व त्याला नैग किंवा नैगेय म्हणतात. राणायनीय शाखेचें स्टीव्हन्सन् पाद्रानें भाषांतर करून, सायणाचें भाष्य देखील दिलें आहे. (इ. स. १८४२). प्रोफेसर बेनफेनें देखील हिचें भाषांतर केलें आहे, व शब्दांचा कोश आणि टीपा दिल्या आहेत. (इ. स. १८४८). ह्याशिवाय, सत्यव्रत सामाश्रमी नांवाच्या गृहस्थानें सुद्धां आर्चिकाच्या आग्नेय आणि ऐन्द्र पर्वताची सुंदर आवृत्ति गेयगान व सायणाचें भाष्य, यांसहित छापून काढिली आहे. ( वि·

---

१ हें अरण्यांतच म्हणावयाचें आहे, असें दिसतें.

२ ह्या गानांचा अनुक्रम "ऋषि ब्राह्मण" नांवाच्या एका पुरातन अनुक्रमणीवरून समजतो.

ब्लिओथिका इंडिका. इ. स. १८७१-७४). सामवेदावर एक रावणकृत भाष्य असून, तें मलबारास असल्याचें कळून येतें.

ह्याशिवाय, सामवेदाचीं अनेक ब्राह्मणें आहेत. परंतु, त्या सर्वांत विशेष महत्वाचें म्हटलें म्हणजे ताण्ड्य ब्राह्मण होय. हें नांव ताण्ड्य ऋषीवरून प्राप्त झाल्याचें दिसतें. ह्यालाच पंचविंश[1] अशी संज्ञा आहे. कारण त्यांत पंचवीस अध्याय आहेत. ह्या ब्राह्मणांत, मुख्यत्वेंकरून, सोमयागासंबंधीं ज्यास्त विवेचन आहे. हे सोमयज्ञ नाना प्रकारचे आणि अनेक तऱ्हेनें करण्याची पद्धत असल्याचें दिसतें. ह्यापैकीं, कांहीं यज्ञ एक दिवसांतच आटपतात. कित्येकांस दोनपासून बारा दिवस लागतात. कांहीं कांहीं एक वर्षपर्यंत सतत चालतात. आणि कित्येक तर, एक वर्षाहून देखील जास्त मुदत पावेतों करण्यांत येतात. फक्त एक दिवसच चालणाऱ्या यज्ञास एकाह म्हणतात. दोनपासून बारा दिवसपर्यंत लागणाऱ्या यज्ञास अहीन अशी संज्ञा आहे. सबंध वर्षपावेतों चालणाऱ्या यज्ञास सत्र असें नामधेय आहे. आणि एक वर्षापेक्षांही जास्त मुदत पावेतों चालणाऱ्या यज्ञास अयन म्हणण्याचा परिपाठ आहे.

सामवेदाचीं ब्राह्मणें.

ताण्ड्य अथवा पंचविंश ब्राह्मण.

---

[1] ह्याशिवाय प्रौढ किंवा महाब्राह्मण अशी देखील ह्याला संज्ञा आहे.

प्रत्येक यज्ञांत भिन्नभिन्न विधि असतात, व नाना तऱ्हेचे संस्कारही करावे लागतात. त्यामुळें, त्या त्या संस्कारविशेषावरून त्यांस निरनिराळीं नांवें पडलीं असावीं, असें वाटतें. किंवा, ज्या एकाद्या ऋषिवर्यानें हा यज्ञसमारंभ चालविला असेल, त्याचेंही नांव त्याला दिलें असल्याचें संभवतें. अथवा, ज्या कार्याप्रीत्यर्थ तो यज्ञ करण्यांत आला असेल, त्याचें नांव देखील त्याला दिलें असावेंसें दिसतें.

यज्ञाचीं नांवें.

ताण्डय ब्राह्मणांतील कित्येक मंत्रांचीं देखील अगदीं निरनिराळीं नांवें असल्याचें चांगलें व्यक्त होतें. उदाहरणार्थ, ऋक्संहितेंतील अनेक ऋचा घेऊन जे मंत्र ( सामब्राह्मणांत ) तयार झाले, त्यांस शास्त्र अशी पारिभाषिक संज्ञा आहे. त्याचप्रमाणें, अनेक सामऋचांच्या साहाय्यानें जे मंत्र केले, त्यांस उक्थ, स्तोम, किंवा पृष्ठ म्हणतात. आणि कित्येक अन्य ऋचांस स्तोत्र असेंही नामधेय आहे.

मंत्रांचीं नांवें.

तांण्डय ब्राह्मणावरून त्यांत यज्ञासंबंधीं पुष्कळच तपशिलवार वर्णन असल्याचें दिसतें. इतकेंच नव्हें तर, ह्यांतील बहुतेक यज्ञ सरस्वती आणि दृषद्वती नद्यांवर, अथवा त्यांच्या अंतर्वेदिकांत, किंवा त्यांच्या जवळ आसपासच्या प्रदेशांत, शेवटास गेल्याचें चांगलें व्यक्त होतें. ह्याशिवाय, व्रात्यस्तोम देखील येथेंच होत असावेसें वाटतें. हा व्रात्यस्तोम केवळ व्रात्यांकरितांच होय. व्रात्य ह्मणजे आर्य शाखेंतले

व्रात्य स्तोम.

जे कित्येक जण, आह्मां ब्राह्मणांच्या आचार विचाराप्रमाणें न वर्ततां, वेदधर्माविरुद्ध वागूं लागले, ते समजावयाचे. तेव्हां, ह्या व्रात्यांस आपल्या अविहित कर्माबद्दल पश्चात्ताप होऊन, किंवा आर्यांच्या कळपाबाहेर अपंक्त राहिल्यामुळेंच वाईट वाटून, ज्यांनीं पुनश्च आर्यसमाजांत येण्याविषयींची आपली इच्छा प्रदर्शित केली, त्यांनीं हा व्रात्यस्तोम केल्यावर, त्यांजला फिरून ब्राह्मणधर्मांत घेत.

व्रात्यांची चालरीत व पेहेराव.

हे व्रात्य खुल्या किंवा बिनबुरुर्यांच्या गाडींतून, अथवा युद्धासाठीं तयार केलेल्या मजबूत रथांतून, फिरावयास जात. ह्यांच्या बरोबरील आयुधें म्हटलीं म्हणजे, धनुष्य व भाला अशीं असत. ते डोकींत पागोटें घालीत. त्यांच्या अंगांतही अंगरखा असे. मात्र, तो जरा सैल आणि झग्यासारखा असून, त्याच्या किनारीला ते तांबडी झालर लावीत. हा अंगरखा बहुतकरून हल्लीं सारखाच खालीं मुटा व मोकळा असावा, असें वाटतें. ते जोडे घालीत, आणि दुहिरी शिवलेल्या बकऱ्यांच्या कातडयांचा उपयोग करीत. त्यांचे नायक अथवा सेनानी हे तपकिरी रंगाचा पोषाक करून, गळ्यांत रुपेरी कंठी अथवा गोफ घालीत. ते शेतकी करीत नसत, किंवा व्यापार धंद्याकडेही लक्ष्य देत नसत. ते आमची आर्यभाषाच बोलत. कारण, ते आमच्याच कुटुंबांतले होते. तथापि, त्यांचा आचारविचार आणि वागण्याची पद्धति, हीं आमच्या पूर्वजांस बिलकुल

पसंत नसल्याकारणानें, ते त्यास व्रात्य व यज्ञावकीर्ण ( ह्मणजे यज्ञ करण्यास अयोग्य असें ) ह्मणत.

ताण्डय ब्राह्मणावर सायणाचार्यांची टीका असून, ह्या टीकेसहित त्याची आवृत्ति आनन्दचन्द्रवेदान्तवागीशानें काढिली आहे. ( बिब्लिओथिका इंडिका १८६९-७४ ). हल्लीं ह्याला स्वर दिले असल्याचें दिसत नाहीं. परंतु, भाषिकसूत्राच्यावेळीं त्याजवर स्वर होते, असें कित्येकांचें मत आहे. मात्र कुमारिलभट्टाच्या वेळेपासून, ह्मणजे सुमारें इ. स. च्या सातव्या शतकाच्या उत्तरार्धापासून, त्याजवरील स्वर लिहितनासे झाले, असें म्हणतात.

ताण्डयब्राह्मणावर टीका.

ताण्डय ब्राह्मणावरून असें दिसतें कीं, ऋक शाखेंतील आचार्य आणि सामशाखेंतील आचार्य, यांच्यांत परस्परांविषयीं बिलकुल प्रेमभाव नव्हता. इतकेंच नव्हे तर, ताण्डय ब्राह्मणांत ( हें सामवेदांतील होय, सबब त्यांत ), कौषीतकी ब्राह्मणाची ( म्हणजे ऋग्वेदांतील शांख्यायन ब्राह्मणाची ) निंदा देखील केली आहे. कारण, त्यांत कौषतिक्यांस "व्रात्य" व "यज्ञावकीर्ण" अशी संज्ञा दिलेली आढळते.

ह्याचें दुसरें ब्राह्मण म्हटलें म्हणजे षडविंश ब्राह्मण होय. किंबहुना, पंचविंश ब्राह्मणाची ही एक पुरवणी, अथवा सव्वीसावा अध्यायच आहे, असें देखील म्हणण्यास हरकत नाहीं. कारण, पंचविंश ब्राह्म-

षड्विंश ब्राह्मण व त्यांतील विषय.

णांत ज्या बाबतीचा खुलासा केला नाहीं, किंवा ज्या गोष्टीचें विवेचन झालें नाहीं, तत्संबंधीं हकीकत षड्विंश ब्राह्मणांत आहे. ह्यांत प्रायश्चित्तार्थ यज्ञविधि, शापसंस्कार, आणि इतर सामान्य व्यापक नियम, यांबद्दलचें वर्णन आहे. ह्याजवर सायणाची चांगली टीका असून, तींत सदरहू दोन्ही ब्राह्मणांसंबंधीं अवश्य ती तुलना केली आहे.

ह्याचें तिसरें ब्राह्मण, अद्भुत नांवाचें होय. षड्विंश ब्राह्मणाचा जो सहावा अध्याय, तोच अद्भुत ब्राह्मण या नांवानें सुप्रसिद्ध आहे. ह्यांत शकुन, अपशकुन, अरिष्ट, पुढें ओढवणारें संकट, आणि त्याचा प्रतिकार, इत्यादींचें यथाविधि विवेचन आहे. प्रथमतः, घडून येणाऱ्या किंवा घडून आलेल्या क्लेशकारक गोष्टी सांगून, पुढें त्यांच्या निरसनार्थ उपाय सुचाविले आहेत. आणि तदनंतर मनुष्यांच्या व्याधी व जनावरांचे रोग, पिकांची हानि आणि मौल्यवान वस्तूंचा अपहार, भूकंप व उल्कापात, अद्भुत चमत्कार आणि अकल्पित वस्तूचा आकस्मिक प्रादुर्भाव, विद्युत्चमत्कृति व गर्भस्राव, वगैरेबद्दलचा तपशिलवार विचार केला आहे.

अद्भुत ब्राह्मण व त्यांतील विषय.

अद्भुत ब्राह्मणाची आवृत्ति ( मूळ संस्कृत, त्याचें भाषांतर, आणि टिप्पणीसहित ) ए. वेबरनें काढिली आहे.

त्याची आवृत्ति.

सामवेदाच्या चवथ्या ब्राह्मणास छान्दोग्यब्राह्मण अशी संज्ञा आहे. ह्याचे एकंदर दहा अध्याय आहेत. त्यांपैकीं

छान्दोग्योपनिषद् व त्याचें महत्व.

पहिले दोन गहाळ झाले असून, शेवटल्या आठांस छान्दोग्योपनिषद् अशी संज्ञा आहे. हें उपनिषद् ऐतिहासिक दृष्टीनें फारच महत्वाचें असून, तें पुराणे इतिहासाची केवळ खाणच आहे, असें म्हटलें तरी चालेल. कारण, ह्यांत पौराणिक कथानकें, नानाविध प्राचीन गोष्टी, आणि प्राक्कालीन आख्यायिका, यांचें अगदीं प्राचुर्य दिसतें. शुक्लयजुर्वेदाच्या बृहदारण्यकांत देखील अशीच भरपूर ऐतिहासिक कथानकें आहेत. मात्र, हें भरतखंडाच्या पूर्वभागांत, व छान्दोग्य ब्राह्मण पश्चिमेकडील प्रदेशांत रचले असावे, अशी कित्येक विद्वानांची कल्पना आहे.

त्यांतील पुनर्जन्माचा उल्लेख.

बृहदारण्यकाप्रमाणें छान्दोग्योपनिषदांत देखील पुनर्जन्माचा उल्लेख आहे. ह्याच्या पांचव्या अध्यायांत एकंदर सृष्टीच्या उत्पत्तीसंबंधीं विवेचन आहे. अशाच प्रकारचा तपशील मनुस्मृतींत सुद्धां दृष्टीस पडतो. दहाव्या अध्यायांत आत्मविवेचन आहे. ह्मणजे आत्मा, त्याचें रहाण्याचें स्थान, देहावसानानंतर त्याचा परलोकनिवास, परब्रह्माच्या ठिकाणीं त्याचें ऐक्य, इत्यादींचा ऊहापोह आहे. कौषीतक्युपनिषदांत देखील थोडया बहुत फरकानें अशाच मासल्याचें प्रतिपादन केलेलें दिसतें.

ह्या दोन्ही ब्राह्मणांतील आणखी एक साम्य असें

---

१ छान्दोग्योनिषदांत राहूचें नांव प्रथमतःच आलें असल्याविषयीं वेबरचे ह्मणणें आहे.

छान्दोग्योपनिषदांतील आचार्यांची नामावलि.

दिसतें कीं, त्या दोहोंतील आचार्यांची नामावलि एकच आहे. उदाहरणार्थ, प्रवाहणजैवलि, उषस्तिचाक्रायण, शांडिल्य, सत्यकामजाबाल, उद्दालकआरुणि, श्वेतकेतु, आणि अश्वपति.

छान्दोग्योपनिषदाची आवृत्ति शंकराचार्यांच्या टीकेसहित रुअरनें काढिली असून, त्याचें भाषान्तर सुद्धां राजेन्द्रलाल मित्रानें छापिलें आहे. ( बिब्लिओथिका इंडिका इ. स. १८५४-६२ ). फादर विंडिशमननें देखील ह्या उपनिषदांतील कांहीं वेचे मूळ संस्कृतांत देऊन, कित्येकांचें भाषांतरही सादर केलें होतें.

त्यांतील स्मृतिविवेचन.

छान्दोग्योपनिषदांतील कांहीं भाग स्मृतीसारखा भासतो. कारण, त्यांत एकेठिकाणीं नाकबूल केलेल्या चोरीबद्दल देहान्त प्रायश्चित्त सांगितलें आहे. हे व अशा प्रकारचे जे अनेक अपराध समाजाच्या व्यवस्थेविरुद्ध होतात, त्यांस सांगितलेली शिक्षा स्मृतींतच दृगोचर होते. तथापि, हल्लींच्या प्रसंगीं ती उपनिषदांतच नमुद केलेली असल्यामुळें, ही गोष्ट विशेष रीतीनें लक्ष्यांत ठेवण्यासारखी आहे.

केनोपनिषद्.

सामवेदाच्या पांचव्या ब्राह्मणास केनोपनिषद् म्हणतात. ह्या ब्राह्मणाचा जो नववा अध्याय आहे तोच केनोपनिषद् या नामधेयानें सुप्रसिद्ध होय. ह्याचेंच तलवकार असेंही दुसरें

नांव असल्याचें समजतें. परंतु, हें नांव अगदीं अपरिचित असून, तें कोणासही फारसें माहीत नाहींसें वाटतें.

असो. ह्या उपनिषनाचे दोन भाग असल्याचें दिसतें.

त्यांतील विषय.

पहिला पद्यमय किंवा श्लोकबद्ध असून, त्यांत परब्रह्माचें योग्य निरूपण केलें आहे. दुसऱ्या भागांत मात्र कथानक आहे. तथापि, त्यांतही ब्रह्माचें श्रेष्ठत्व प्रतिपादन केल्याविषयीं चांगलें व्यक्त होतें; व ह्यांतच पार्वतीनें (उमाहैमवतीनें) सर्व देवांच्या तर्फेनें ब्रह्मयाजवळ मध्यस्थी केल्याचें ही दिसून येतें.

त्याजवरील टीका.

केनोपनिषदावर शंकराचार्यांची टीका आहे. रूअरनें देखील ह्याची आवृत्ति भाषान्तरासहित काढिली आहे, व तींत शंकराचार्यांची टीका सामील केली आहे. (बिब्लिओथिका इंडिका.)

सामवेदाचीं आठ ब्राह्मणें असल्याविषयीं सायणाचा व कुमारिलाचा लेख.

सदरीं लिहिल्याप्रमाणें, सामवेदाचीं पांच ब्राह्मणें झालीं. परंतु, सायणाचार्यांच्या लिहिण्या[1]वरून असें दिसतें कीं, त्याचीं आठ ब्राह्मणें आहेत. १ प्रौढ (किंवा महाब्राह्मण अथवा पंचविंश). २ षड्विंश. ३ सामविधि. ४ आर्षेय. ५ देवताध्याय. ६ उपनिषद्. ७ संहितोपनिषद्. आणि ८ वंश. ह्याशिवाय, कुमारिलानें सुद्धां ह्यांची आठच संख्या दिली

१ सामविधानावरील सायाणाचार्यांची टीका.

आहे. त्यावरून, एकंदर सामवेदाचीं ब्राह्मणें आठच आहेत, यांत शंका नाहीं. ह्यापैकीं, आर्षेय ब्राह्मण देवताध्यायाची अनुक्रमणी असावी, असें वाटतें. देवताध्यायब्राह्मणांत सामदेवतांच्या ऋचा सांगितल्या आहेत. सामविधि अथवा सामविधान ब्राह्मण, ह्यांतील आशय बहुतेक ऋग्विधानासारखाच असून, त्यांत नानाविध क्रियांची फलश्रुति सांगितली आहे. वंशब्राह्मणांत, कांबोज-औपमन्यव, मद्रगार, शौंगायनि, सात्यौष्ट्राक्षि, शालंकायन, आणि कौहल, इत्यादि आचार्यांचीं नांवें दृष्टिगोचर होतात. त्यावरून हें ब्राह्मण वायव्येकडील प्रांतांत रचलें असावें, असें वेबरप्रभृतींचें मत आहे.

अन्य ब्राह्मणांतील विषय.

देवताध्याय व सामविधान ब्राह्मण, यांजवर सायणाचार्यांची टीका असून, ह्यांची आवृत्ति ह्या टीकेसहित बर्नेल्नें काढिली आहे.

त्यांजवरील सायणाची टीका.

येथपर्यंत सामवेदांतील ब्राह्मणांचा विचार झाला. सबब, आतां त्याच्या सूत्रांकडे वळूं.

चारी वेदांतील सूत्रांत सामवेदाचीं सूत्रें सर्वांहून ज्यास्त आहेत. ह्यांचा तपशील साधारणतः खालीं लिहिल्याप्रमाणें दिल्यानें चूक होणार नाहीं, असें वाटतें.

सामाचीं सूत्रें.

ह्यांत, ४ श्रौतसूत्रें, १ पंचविंश ब्राह्मणावर टीकेदा-

त्यांचा तपशील.

खल असलेलें सूत्र, छन्दावरील आणि ऋचांचीं सामें करण्यासंबंधीं सुत्रें, १ गृह्यसूत्र, १ नैगेयसूत्र, १ स्मृतिसूत्र, १ खादिरगृह्यसूत्र, १ पितृमेधसूत्र १ निदानसूत्र, १ अनुपदसूत्र, १ पुष्पसूत्र, १ पंचविधसूत्र (पंचविध्य किंवा पंचविधेयसूत्र), १ प्रतिहारसूत्र, १ तंडालक्षणसूत्र, १ उपग्रंथसूत्र, १ कल्पानुपदसूत्र, १ अनुस्तोत्रसूत्र, व १ क्षुद्रसूत्र.

मशक श्रौतसूत्र.

सदरीं, जीं चार श्रौतसूत्रें[1] सांगितलीं, त्यांत पहिलें मशकसूत्र, दुसरें लाट्यायनसूत्र, तिसरें द्राह्यायणसूत्र, आणि चवथें गोभिलसूत्र, अशीं आहेत. मशकसूत्राला आर्षेयकल्प, कल्प, कल्पसूत्र, व गार्ग्यसूत्र, अशी देखील संज्ञा आहे. ह्यांत, सोमयागांतील स्तवनाचा नामनिर्देश असून, त्याशिवाय आणखी ही दुसरे कित्येक ज्यास्त संस्कार सांगितले आहेत. ह्या सूत्राचे अकरा प्रपाठक आहेत. त्यापैकीं, पहिल्या पांच प्रपाठकांत, एकाह किंवा एक दिवस चालणाऱ्या यज्ञाचें विवेचन आहे. त्यानंतर दुसऱ्या चार प्रपाठकांत अहीन अथवा अनेक (परंतु बारापेक्षां कमी) दिवस चालणाऱ्या यज्ञविधीचें वर्णन आहे. आणि बाकी राहिलेल्या दोन प्रपाठकांत बारापेक्षां ज्यास्त दिवस चालणाऱ्या

---

१ श्रौतसूत्रांत यज्ञकर्म विवेचन असून, स्मृति किंवा स्मार्तसूत्रांत धर्माचार सांगितलेला असतो. व गृह्यसूत्रांत गृहस्थाश्रम कर्मविधीचें विवेचन असतें.

यज्ञविधींचा वृत्तान्त आहे. मशकसूत्रावर वरदराजाची टीका असून, सामवेदाचें दुसरें जें कात्यायनकृत प्रतिहार नांवाचें सूत्र आहे, त्याजवर देखील त्याचीच टीका आहे. ह्या टीकेला दशतयी म्हणतात.

त्याजवरील टीका.

दुसरें श्रौतसूत्र लाटयायनाचें होय. ह्याचा व पंचविंशब्राह्मणाचा अगदीं निकट संबंध असल्याचें दिसतें, आणि हें कौथुमशाखेंतील असावेसें वाटतें. ह्यांत शांडिल्य, धनंजय, गौतम, स्थविरगौतम, शौचिवृक्षि, भांडितायन, लामकायन, राणायनीपुत्र, शाल्यायनी, शालंकायनी, शाठ्यायनक, क्षैरकलंभि, कौत्स, वार्षगण्य, इत्यादि आचार्यांची नांवें आहेत. ह्याचे दहा प्रपाठक असून, पहिल्या सात प्रपाठकांत सोमयागाचें विवेचन आहे. आठव्या प्रपाठकांत आणि नवव्याच्या कांहीं भागांत, एकाह यज्ञाविषयीं सविस्तर वृत्तान्त दिला आहे. बाकी राहिलेल्या नवव्या प्रपाठकांत, अहीन यागासंबंधीं वर्णन आहे. आणि दहाव्यांत सत्रयागाचें इतिवृत्त आहे.

लाट्यायन श्रौतसूत्र.

ह्या सूत्रावर अग्निस्वामीची उत्तम प्रकारची टीका आहे; व ह्या टीकेसहित त्याची एक आवृत्ति देखील आनन्दचन्द्रवेदान्तवागीश यानें बिब्लिओथिका इंडिकांत छापिली आहे. (इ. स. १८७०।७२). सदहू अग्निस्वामीच्या कालाचें अनुमान करितां येत नाहीं. परंतु, भवस्वामी,

त्याजवरील टीका.

भरतस्वामी, धूर्तस्वामी, हरिस्वामी, खदिरस्वामी, मेघस्वामी, स्कन्दस्वामी, क्षीरस्वामी, इत्यादि जे "स्वाम्यन्त" नांवधारी पुरुष होऊन गेले, त्यांचा समकालीनच हा असावा, असें वेबरचें मत आहे. तथापि, हे सर्व स्वामी तरी केव्हां होऊन गेले, एतद्विषयकही कालनिर्णय करण्यास प्रत्यंतराचें कांहींच साधन नाहीं. त्यामुळें, ह्यांचा काल निश्चित होण्यास बरीच अडचण वाटत आहे.

द्राह्यायण श्रौतसूत्र.

सामवेदाचें तिसरें श्रौतसूत्र म्हटलें ह्मणजे द्राह्यायणसूत्र होय. ह्यालाच वसिष्ठसूत्र अशी देखील संज्ञा आहे. ह्यांत आणि लाट्यायनसूत्रांत फारसा फरक नाहीं. मात्र, संहिता विभागांत क्वचित् अन्तर दिसून येतें. ह्याजवर अंशतः मघस्वामी, रुद्रस्कन्द, व धन्वी, यांची चांगली टीका आहे.

गोभिल श्रौतसूत्र.

सामाचे चौथें श्रौतसूत्र गोभिलानें केलेलें असून, त्यावर कृत्यचिन्तामणीची टीका आहेसें दिसतें.

गोभिल गृह्यसूत्र.

सामवेदाचें गृह्यसूत्र ह्याच गोभिलानें केलेलें आहे. ह्याचे चार प्रपाठक असून ह्याजवर चन्द्रकान्ततर्कालंकाराची टीका बिब्लिओथिका इंडिकांत आली असल्याचें दिसतें. ( इ. स. १८७१–७३ )

गोभिलस्मृति.

ह्या गृह्यसूत्रालाच कर्मप्रदीप नावाचें एक परिशिष्टही जोडलें आहे. परंतु, तें सुद्धां विशेष महत्वाचें असल्याकारणानें, त्याला

देखील स्मृतिशास्त्र किंवा गृह्यसूत्र ही पदवी मिळाली आहे. ह्याचा प्रवर्तक कात्यायन होय. कर्मप्रदीपावर आशार्कानें टीका केली असून, त्यावरून असें दिसतें कीं, हें स्मृतिशास्त्र तिन्ही शाखांस, म्हणजे सामवेदी, कौथुमी, आणि राणायणीय, ह्यांस अगदीं प्रमाणभूत आहे.

द्राह्यायण गृह्यसूत्र.

ह्याशिवाय, द्राह्यायणगृह्य या नांवाचें आणखी एक सूत्र आहे, व त्याचीं चार पटलें आहेत. हें सूत्र खादिरानें केलें असल्याचें म्हणतात, वह्याजवर रुद्रस्कन्दस्वामीची वृत्ति आहे.

खादीरगृह्यसूत्र

खादिरगृह्य नांवाचें जें सूत्र आहे, तें देखील सामवेदाचेंच आहे. ह्याजवर वामनाच्या कारिका असल्याचें कळतें.

पितृमेधसूत्र.

पितृमेधसूत्र हें गौतमाचें होय. ह्याजवरच अनन्तयज्वाची टीका असून, त्याच्या म्हणण्यावरून, अक्षपाद (न्यायसूत्राचा प्रवर्तक) व हा गौतम (धर्मसूत्राचा प्रवर्तक), असे एकच असल्याचें होतें.

आतां, बाकी राहिलेल्या सूत्रांचें सामान्य विवेचन करूं.

गोभिलाचें पुष्पसूत्र.

गोभिलकृत पुष्पसूत्राचे दहा प्रपाठक आहेत. ह्यापैकीं पहिल्या चार प्रपाठकावर कोणाचीही टीका असल्याचें कळून येत नाहीं. कारण, ते बरेच दुर्बोध आहेत. ह्याखेरीज, बाकी जे सहा प्रपाठक राहिले, त्यांजवर मात्र उपाध्याय अजातशत्रूची टीका आहे. ही, त्याचा शिष्य जो विष्णुयशा, त्याजकरितां

त्यानें केली असल्याचें कळतें. ह्यांतील विषय म्हटला म्हणजे, प्रत्येक ऋचा फुलासारखी विकास पावल्याप्रमाणें सामांत कशी म्हणावी, एवढाच होय. आणि ह्यावरूनच, त्याला पुष्पसूत्र असें अन्वर्थ नामधेय दिलें असावें. दाक्षिणात्य हस्तलिखितांत, ह्यालाच फुल्लसूत्र असें नांव असून, तें वररुचीनें केलें असल्याचें म्हटलें आहे.

सामतंत्र.

ह्याच संबंधानें सामतंत्र रचल्याचें दिसतें. ह्याचे तेरा प्रपाठक असून, त्यांत प्रत्येक ऋचेंतील स्वर आणि त्यांचा उच्चार, यांजविषयींचें विवेचन आहे. किंबहुना, ह्यांत स्वरपरिभाषा किंवा सामलक्षणा संबंधीच वर्णन आहे, असें ही म्हणण्यास हरकत नाहीं. "सामलक्षणंप्रातिशाख्यंशास्त्रं" म्हणून जें कैयटानें म्हटलें आहे, तें कदाचित् हेंच असावें असें वाटतें.

पंचविध आणि प्रतिहारसूत्र.

त्याचप्रमाणें, पंचविधिसूत्र आणि प्रतिहारसूत्र, यांत देखील साध्या ऋचा सामांत कशा म्हणाव्या, याविषयींचें विवेचन आहे. हें प्रतिहारसूत्र कात्यायनानें केलें असून, त्याजवर पूर्वी सांगितल्याप्रमाणें दशतयी नांवाची वरदराजाची टीका आहे.

नैगेयसूत्र.

नैगेयसूत्रांत सामवेदांतील छन्दासंबंधीं वर्णन आहे. ह्याचा प्रवर्तक गोभिल होय. ह्यानेंच श्रौतसूत्र, गृह्यसूत्र, पुष्पसूत्र, परिशिष्ट (जें स्मृतिशास्त्र म्हणून सुप्रसिद्ध आहे तें),

इत्यादि रचलीं असून, तद्विषयक माहिती पूर्वी योग्य त्या स्थळीं देण्यांत आलेली आहे. (मागें पान १९७-९८ पहा.)

निदान[1] सूत्रांत देखील छन्दाबद्दलच विवेचन आहे.

निदानसूत्र.

मात्र, त्यांत उक्थ, स्तोम, आणि गान, यांसंबंधाचा ज्यास्त विचार केला असल्याचें दिसतें. ह्याचे दहा प्रपाठक आहेत, व त्यांत अनेक आचार्यांचीं नांवें दिलीं आहेत. ह्याच्या दोन पटलांचें भाषांतर वेबरनें करून, त्यांची निराळी आवृत्ति काढिली असल्याचें समजतें.

उपग्रंथसूत्राचा प्रवर्तक कात्यायन असावा, असें वाटतें.

उपग्रंथसूत्र.

कारण, ऋग्वेदाच्या अनुक्रमणीवर जी षड्गुरु शिष्याची टीका आहे, तींत कात्यायनाला "उपग्रंथस्थ कारक" असें म्हटल्याचें कळतें. ह्या सूत्रांत प्रायश्चित्त विचार आहे.

सामवेदाचें प्रातिशाख्यसूत्र देखील आहे. ह्यालाच

प्रातिशाख्यसूत्र.

ऋक्तंत्र व्याकरण म्हणतात. हें बर्नेलनें इ० स० १८७९ सालीं मंगलोर येथें छापवून प्रसिद्ध केलें होतें.

ह्याशिवाय, बाकी राहिलेल्या सूत्रांचीं ज्यास्त माहिती

कल्पानुपद व क्षौद्रः-सूत्र.

कळून येत नाहीं. मात्र, कल्पानुपदसूत्राचे दोन प्रपाठक, आणि क्षौद्रसूत्राचे तीन प्रपाठक आहेत, इतकें समजतें.

---

१ छन्दोगाचीं श्रुति म्हणून, निदान संज्ञक ग्रंथ असल्याविषयीं, बृहद्देवतेंत वर्णन आहे, असें वेबर म्हणतो.

असो. सामवेद सूत्रांच्या पद्धती म्हणून दुसरे उपग्रंथ आहेत. ह्यांत सूत्रांच्या व्याख्या देऊन, शिवाय अवश्य त्याठिकाणीं ज्यास्त विस्तारही केला आहे. त्याखेरीज, सूत्रांचीं परिशिष्टेंही आहेत. त्यांत मुख्य महत्वाचीं म्हटलीं म्हणजे नैगेय शाखेंतील आर्ष आणि दैवत नांवाचीं परिशिष्टें होत. ह्यापैकीं, आर्षपरिशिष्टांत ऋषींची मालिका सांगितली असून, दैवतपरिशिष्टांत देवतांची नामावलि दिली आहे. दाल्भ्य परिशिष्ट सुद्धां सामवेदापैकींच होय. हीं सर्व फार प्राचीन असल्याविषयीं कित्येक पाश्चात्य पंडितांचा सुद्धां अभिप्राय आहे.

सामवेदसूत्रावरील पद्धती, व त्यांचीं परिशिष्टें.

---

# भाग ६२ वा.

## वैदिकग्रंथोदधि.

## अथर्ववेद.

मागील भागांत, ऋक्, यजुस, आणि साम, या तीन वेदांचा यथावकाश विचार झाला.

अथर्ववेद.

सबब, आतां, बाकी राहिलेला जो चवथा अथर्व वेद, त्याकडे वळूं, व तत्संबंधीं उपलब्ध असलेली माहिती देऊं.

अथर्ववेदाचीं वीस कांडें असल्याचें गोपथ ब्राह्मणावरून आणि वार्तिकांवरून कळून

त्याचीसंहिता.

येतें. तथापि, अथर्व संहितेंत व अथर्वपरिशिष्टांत त्याची सोळाच कांडें असल्याबद्दल उल्लेख आहे. ह्याचे ३८ प्रपाठक आणि ९० अनुवाक, असे पोट विभाग असून, त्याचीं एकंदर ७६० सूक्तें व ६००० ऋचा आहेत. ह्यांतील मुख्य विषय ह्मटला ह्मणजे क्रियासिद्धि होय, व त्यांत शापक्रिया,

तिच्यांतील विषय.

मंत्रक्रिया, भैषज्य, द्यूतसाफल्य, आणि दुःशकुन प्रतिकार, यांचा अन्तर्भाव होतो. ह्याशिवाय, नानाविध देवतांच्या अतर्क्य शक्ती पासून जो ताप किंवा अपकार व्हावयाचा, त्यापासून आपलें संरक्षण

करण्याविषयींचा ही त्यांत उपाय सांगितला आहे. तसेंच, ग्रहकोपापासून बचाव, अथवा उपद्रवी प्राण्यांपासून उद्भवणाऱ्या रोगांचा नाश, शत्रूंना अभिशाप, रोगापहारक वनस्पतींची प्रार्थना, प्रवासक्षेम, व नित्य दिनचर्येंतील सुखावह होणाऱ्या गोष्टी, या सर्वांचा त्यांत ऊहापोह केला आहे.

अथर्ववेदाच्या[1] पहिल्या तेरा कांडांतील विषय फारसे नियमित असल्याचें दिसत नाहीं. चवदाव्या कांडांत विवाहविधि सांगितला आहे. पंधराव्या कांडांत व्रात्यांची प्रशंसा आहे. सोळाव्या आणि सतराव्यां कांडांत मंत्रक्रिया व ऐन्द्रजाल आहे. अठराव्या कांडांत प्रेतक्रिया व पितृयज्ञ सांगितला आहे. एकोणिसाव्या कांडांत संमिश्र विषय असून, विसाव्या कांडांत कुंतापसूक्त आणि इन्द्राची प्रार्थना आहे. मात्र, ह्या इन्द्रस्तवनाच्या ऋचा ऋग्वेदांतूनच घेतल्या असल्याचें दिसतें.

अथर्वसंहितेवर सायणाची टीका.

अथर्ववेदाच्या संहितेवर सायणाचार्यांची टीका आहे. ह्या संहितेची व्हिट्ने आणि रॉथ यानीं देखील आवृत्ति काढिली असून, तिच्या पहिल्या दोन कांडांचें व

1 अथर्ववेदाचा उल्लेख वाजसनेयि संहिता (शुक्लयजुर्वेद); तैत्तिरीय आरण्यक (कृष्णयजुर्वेद); शतपथ ब्राह्मण (शुक्लयजुर्वेद); छान्दोग्योपनिषद्, व निदानसूत्र (सामवेद); इत्यादींत आला असल्याचें आढळतें.

2 इ. स. १८५५-५६.

तेराव्या आणि चौदाव्याच्या कांहीं भागाचें भाषांतर वेबरनें केलें आहे.

अथर्ववेदाचें ब्राह्मण.

अथर्ववेदाचें गोपथ नांवाचें एकच ब्राह्मण असून, त्याचें पूर्वखंड व उत्तरखंड असे दोन विभाग आहेत. पहिल्याचे पांच प्रपाठक, आणि दुसऱ्याचे सहा प्रपाठक आहेत. तथापि, ह्याच्या एका परिशिष्टांत ह्याचे १०० प्रपाठक असल्याविषयीं सांगितलें आहे, असें कळून येतें. ह्याचें पूर्वखंड वेदान्तविषयक आहे. इतकेंच नव्हे तर, त्यांत नानाप्रकारचीं प्राचीन कथानकें असल्यामुळें, त्याला ऐतिहासिक महत्वाची अपूर्व खाणही म्हणण्यास हरकत नाहीं. कदाचित्, हीं कथानकें शतपथ ब्राह्मणांतून घेतलीं असावीं, असें वाटतें. उत्तरखंडांत श्रौतविधीचें विवेचन असून, तें ऐतरेय ब्राह्मणास अनुसरून केल्याचें दिसतें.

गोपथ ब्राह्मणांत वर्षाचे बारा किंवा तेरा महिने, ३६० दिवस, आणि एका दिवसाचे ३० मुहूर्त, असे विभाग केले असल्याविषयीं वर्णन आहे. अशा प्रकारचा उल्लेख यजुर्वेदाच्या ब्राह्मणांतही आहे, असें वेबर म्हणतो. तथापि, ऋग्वेदावरून तर असें खात्रीपूर्वक अनुमान होतें कीं, हे काळविभाग फार प्राचीन काळींच आमच्या पूर्वजांस माहीत होते. ( मागे पान ४८–५१ पहा. )

अथर्ववेदाचीं उपनिषदें.

अथर्ववेदाचीं अनेक उपनिषदें आहेत. किंबहुना, तीं चाऱ्ही वेदांत सर्वांहून ज्यास्त आहेत, असें म्हटलें तरी चालेल.

मात्र, अथर्वोपनिषदांत आत्मविचाराखेरीज अन्य विषयांचें मिश्रण झाल्यासारखें दिसतें. आणि त्यामुळेंच, ह्या उपनिषदांचे साधारणपणें तीन वर्ग करणें इष्ट वाटतें. पहिल्या वर्गांतील उपनिषदांत आत्मविचार अथवा ब्रह्मनिरूपण व त्यांचें वर्गीकरण. केलेलें दृष्टीस पडतें. दुसऱ्या वर्गांतल्या उपनिषदांत समाधिसंबंधीं विचार असून, शिवाय योग कसा साधावा, आणि कोणत्या उपायांनीं व कशा प्रकारें हें साधन करावें, अशाबद्दलचें विवेचन केलेलें आढळतें. आणि तिसऱ्या वर्गांतल्या उपनिषदांत फक्त विभूतिपूजाच सांगितली असल्याचें दिसून येतें. इतकेंच नव्हें तर, परमात्म्याच्या ऐवजीं शिव, विष्णु, अथवा अन्य शक्ति करून, त्यांचीच अर्चना करावी, म्हणून त्यांत वर्णन केलें असल्याचें चागलें व्यक्त होतें.

असो. चाऱ्ही वेदांमिळून एकंदर उपनिषदें २३९ असल्याचें कळतें. ह्यापैकीं, ऋग्वेद, यजुर्वेद, आणि सामवेद, यांच्या उपनिषदांबद्दल पूर्वींच विचार केलेला असल्यामुळें, आतां अथर्ववेदांतील उपनिषदांकडे वळतों.

ह्या अथर्वोपनिषदांचा प्रारंभ मुंडकोपनिषदापासून

१ ह्या शक्ति अथवा सिद्धी आठ प्रकारच्या असून, त्यांचीं भिन्न भिन्न नांवें आहेत. हीं खालीं लिहिल्याप्रमाणें होतः—

१ अणिमन्. २ लघिमन्. ३ प्राप्ति. ४ प्राकाम्य. ५ महिमन्. ६ ईशिता. ७ वशिता. आणि ८ कामावसायिता.

**अणिमा महिमा चैव गरिमा लघिमातथा।**
**प्राप्तिः प्राकाम्यमीशित्वं वशित्वं चाष्टसिद्धयः॥**

होतो. आणि कित्येक लहान लहान उपनिषदांवर नारायण भट्टाची जी टीका आहे, त्यावरून तर असें कळून येतें कीं, ह्या अथर्वोपनिषदांचे केवळ ठरीवच अनुक्रमांक असून, अमुक अंकानें अमुक उपनिषदाचा बोध होतो, अशी त्यावेळीं ठरीव समजूत असे. उदाहरणार्थ, अथर्ववेदाचें "पहिलें (१) उपनिषद्," असें म्हटल्यानें, मुंडकोपनिषद्च समजावयाचें. अठरावें उपनिषद् (१८) म्हणजे ब्रह्मबिंदूपनिषद्. अठ्ठाविसावें उपनिषद् (२८) म्हणजे आत्मोपनिषद्. शेचाळीसावें उपनिषद् (४६) म्हणजे गोपालतापन्युपनिषद्. आणि एकुणपन्नासावें उपनिषद् (४९) म्हणजे वासुदेवोपनिषद्, इत्यादि. तथापि, हा सांकेतिक प्रकार, पुढें तसाच कायम राहिला असल्याचें दिसत नाहीं.

अथर्ववेदाचीं मुख्य उपनिषदें खालीं लिहिल्याप्रमाणें होतः—

पहिल्या वर्गांतलीं उपनिषदें.

१ पहिल्या वर्गांतील १ मुंडकोपनिषद्. २ प्रश्नोपनिषद्. ३ गर्भोपनिषद्. ४ ब्रह्मोपनिषद्. ५ मांडूक्योपनिषद्. ६ आत्मवज्रसूची-उपनिषद्. ७ सर्वोपनिषत्सारोपनिषद्. ८ नीरालंबोपनिषद्. ९ आर्षिकोपनिषद्. १० त्रिपुरी. व ११ प्राणाग्निहोत्रोपनिषद्.

दुसऱ्या वर्गांतील उपनिषदें.

२ दुसऱ्या वर्गांतील. १ तारकोपनिषद्. २ शाकल्योपनिषद्. ३ जाबालोपनिषद्. ४ कठश्रुति. ५ आरुणिकोपनिषद्. ६ भाल्लवि-उपनिषद्. ७

संवर्तश्रुति. ८ संन्यासोपनिषद्. ९ परमहंसोपनिषद्. १० हंसोपनिषद्. ११ आश्रमोपनिषद्. १२ श्रीमद्दत्तोपनिषद्. १३ अथर्वशिखोपनिषद्. १४ ब्रह्मविद्योपनिषद्. १५ शौनकोपनिषद्. १६ हंसनादोपनिषद्. १७ क्षुरिकोपनिषद्. १८ नादबिंदूपनिषद्. १९ ब्रह्मबिंदूपनिषद्, (किंवा अमृतबिन्दूपनिषद्). २० अमृतनादोपनिषद्. २१ ध्यानबिन्दूपनिषद्. २२ योगशिक्षोपनिषद्. २३ योगतत्वोपनिषद्. २४ चूलिकोपनिषद्. आणि २५ तेजोबिन्दूपनिषद्.

तिसऱ्या वर्गांतलीं उपनिषदें.

३ तिसऱ्या वर्गांतील. १ महोपनिषद्; (ह्या नांवाचीं दोन उपनिषदें असल्याचें कळतें). २ नारायणोपनिषद्. ३ आत्मप्रबोधोपनिषद्. ४ नृसिंहतापनीयोपनिषद्; (ह्यांत आणखी सहा उपनिषदें आहेत). मध्यतापिनि उपनिषद्. ६ रामतापनीयोपनिषद्. ७ गोपालतापनीयोपनिषद्. ८ गोपीचंदनोपनिषद्. ९ कैवल्योपनिषद्. १० अथर्वशिरसुपनिषद्. ११ [illegible]उपनिषद्. १२ गणपतिपूर्वतापनीयोपनिषद्; (अथवा गणपतिपूर्वतापिनी, गणेशतापिनी). १३ नारायणरुद्रपूर्वोपनिषद्. १४ देवी-उपनिषद्. १५ मृत्युलंघनीयोपनिषद्. १६ कालाग्निरुद्रोपनिषद्. १७ त्रिपुरोपनिषद्. १८ स्कन्दोपनिषद् १९ सुन्दरतापनीयोपनिषद्; (ह्याचीं पांच निरनिराळीं उपनिषदें पांच भागांनीं आहेत). २० कौलोपनिषद्. २१ गरुडोपनिषद्. व २२ नृसिंहषट्चक्रोपनिषद्.

४ ह्याशिवाय, १ पिंडोपनिषद्, २ नीलरुद्रोपनिषद्,

इतर उपनिषदें.

३ पैंगलोपनिषद्, आणि ४ दर्शनोपनिषद्, अशीं देखील आणखीं उपनिषदें आहेत.

मुंडकोपनिषद्.

१ मुंडकोपनिषदाविषयीं अशी एक आख्यायिका आहे कीं, तें ब्रह्मदेवानें आंगिरास प्रथम प्रकट केलें. हा अथर्वाचा शिष्य असून, ह्यानें आपणास प्राप्त झालेली ब्रह्मविद्या, भारद्वाज, सत्यवाह, आणि शौनक, यांस कांहीं कालानें निवेदन केली. ह्या उपनिषदाचें नांव अन्वर्थ असल्याचें दिसतें. कारण, त्याचें अवलोकन केल्यानें, अनेक कल्पनातरंगांचें छेदन होऊन ते आपोआप मावळतात; व सहजीं संशयनिवृत्ति होते. ह्याची रचना बहुतेक पद्यांतच आहे; आणि शंकराचार्यांची ह्याजवर टीका आहे. रुअरनें देखील ह्याचें भाषांतर केलें आहे.

प्रश्नोपनिषद्.

प्रश्नोपनिषद् गद्यांत असून, तें पिप्पलाद शाखेंतील असल्याचें कळतें. ह्यांत, १ कौशल्य आश्वलायन, २ वैदर्भिभार्गव, ३ कबंधी कात्यायन, ४ हिरण्यनाम ( कोशलांचा राजा ), आणि दुसरे दोघेजण, मिळून एकंदर सहा आचार्यांच्या अभिप्रायासह पारमार्थिक विषयासंबंधीं विवेचन पिप्पलादानें केलें आहे. ह्या उपनिषदावर देखील शंकराचार्यांची टीका आहे; व रुअरनें त्याचें भाषांतर केलें आहे. ( इ. स. १८५३ ).

गर्भोपनिषदांत मनुष्यदेहाचें विवेचन असून, त्यांत

गर्भोपनिषद्. गर्भधारण, गर्भोत्पत्ति त्याचें पोषण, त्याचे घटकावयव, त्यांची संख्या, आणि त्यांचें वजन, इत्यादींचें वर्णन आहे. ह्याजवर नारायणाची टीका असून, ह्या टीकेसहित त्याची आवृत्ति निघाली आहे. (बिब्लिओथिका इंडिका. १८७२). सदरहू टीकेला पंचखंडाऽष्टमी म्हणतात.

ब्रह्मोपनिषद्. ब्रह्मोपनिषदांत दोन प्रकार दिसतात; कांहीं भाग गद्य व कांहीं पद्य. पहिल्यांत आत्मविवेचन असून, दुसऱ्यांत योग्याचा आचरणविधि सांगितला आहे. ह्या उपनिषदावर नारायणाची टीका आहे, व तिला चतुष्खंडादशमी म्हणतात.

मांडुक्योपनिषद्. मांडुक्योपनिषदांत चार उपनिषदांचा समावेश होत असल्याचें दिसतें. ह्यापैकीं पहिल्या गद्य भागांत, ओम् शब्दांतल्या साडेतीन मात्रांचें विवेचन असून, तोच काय तो खरा उपनिषदभाग आहे; व बाकीची गौड पादाची कृति असल्याविषयीं कांहींची समज आहे. ह्याजवर शंकराचार्यांची आगमशास्त्र नांवाची टीका असून, रूअरनेंही त्याच्या कांहीं भागाचें भाषांतर केलें आहे. ( बि. इंडिका. )

आप्तवर्गसूच्युपनिषद्. आप्तवर्गसूचि उपनिषदांत तत्वमसि शब्दाचें विवरण आहे. ह्यांतच ब्राह्मण शब्दाची व्याख्या देऊन, जाति, वर्ण, अथवा पांडित्य, यांच्या समन्वयानेंच केवळ ब्राह्मण होत नसतो; परंतु ब्रह्म जाणतो तोच ब्राह्मण समजावयाचा (ब्रह्म

जानाति स ब्राह्मणः ); असें स्पष्टपणें सांगितलें आहे. त्यावरून, जाति, पंथ अथवा संप्रदाय, यांचा सर्वतोपरि निषेध करण्याविषयीं यांत विशेष रीतीनें उल्लेख केला असल्याचें उघड होतें. ह्यांतच मोक्ष ह्मणजे काय, हें सांगितलें आहे; व जीव आणि परमेश्वर यांचें ऐक्य तीच मुक्ति, असें ध्वनित केलें आहे.

त्रिपुन्युपनिषद्.

त्रिपुरी—उपनिषदांत आत्मा आणि जगत यांचा समवाय संबंध दाखविला आहे; व वेदान्त विषयावर जीं एकंदर सात प्रकरणें शंकराचार्यांनीं लिहिलीं, त्यांपैकीं त्रिपुन्युपनिषद् हें चवथें आहे.

सर्वोपनिषत्सारोपनिषद्.

सर्वोपनिषत्सारोपनिषद् हें वेदान्तसाराची एक प्रश्नोत्तरमालाच आहे, असें ह्मणण्यास हरकत नाहीं. हें गद्यांत असून, नारायणाच्या टीकेसहित छापलें आहे. (बि. इं. १८७४).

निरालंबोपनिषद्.

निरालंबोपनिषद् देखील गद्यांतच असून, त्यांत योगविवेचन आहे. आत्मोपनिषद् गद्यांतच आहे, व त्याजवर नारायणाची टीका आहे. प्राणाग्निहोत्रोपनिषद् देखील गद्यांतच आहे. ह्याजवर नारायणाची टीका आहे, व ह्याबद्दल "खंडत्रयान्विता । अष्टाविंशी ग्रंथसंघे शाखाशौनकवर्तिता ।" असें वर्णन आहे. ह्याची आवृत्ति भाषांतरासहित छापली असल्याचें कळतें. (बि. इंडिका. १८७३). आर्षिकोपनिषदांत आत्म्याविषयीं विवेचन असून, तत्सं-

बंधी ऊहापोह विश्वामित्र, जमदग्नि, भरद्वाज, गौतम आणि, वासिष्ठ, यांजमध्यें चालला आहे.

तारकोपनिषद्, कठश्रुति, वगैरे.

२ तारकोपानिषदांत ओम् शब्दाचें माहात्म्य सांगितलें असून, कठश्रुतींत परमहंस दीक्षेचें वर्णन आहे, व हिजवर नारायणाची टीका आहे. जाबालोपनिषद् शुक्लयजुर्वेदाच्या आरण्यकाचें परिशिष्टच आहे, असें ह्मणण्यास हरकत नाहीं. त्याचप्रमाणें, आरुणिकोपनिषद् हें देखील कृष्णयजुर्वेदाच्या आरण्यकाचें परिशिष्ट होय. ह्याजवर नारायणाची टीका आहे, व तिला पंचविंशी ह्मणतात. ह्याजवर शंकरानंदाची सुद्धां टीका असल्याचें कळतें; आणि ह्याचें भाषांतरही झालेलें आहे. ( बि. इंडिका. १८७२ ). परमहंसोपानिषदावर नारायणाची टीका असून, ती भाषान्तरासहित छापिली आहे. ( बि. इंडिका. १८७४ ). ह्याला " त्रिखंडाऽथर्वशिखरे चत्वारिंशत्तमी । " अशी संज्ञा दिल्याचें दिसतें. हंसोपनिषदावरील नारायणाची टीका बि. इंडिकांत छापली आहे. ( इ. स १८७४ ). ह्याला " अष्टात्रिंशत्तमी । अथर्वणे । " अशी संज्ञा असून, याजवर शंकरानंदाची दुसरी टीका असल्याचें समजतें. अथर्वशिखा–उपनिषदांत ओम् शब्दाची चर्चा आहे, आणि हंसनाद ( गद्य ), क्षुरिका ( पद्य. २४ श्लोक ), नादबिन्दु ( पद्य. २० श्लोक ), ब्रह्मबिंदु ( पद्य. २२ श्लोक ), अमृतबिंदु ( पद्य.

३८ श्लोक ), ध्यानबिंदु ( २३ श्लोक ), इत्यादि उपनिषदांत आत्मस्वरूपांत लीन होण्याबद्दलचें विवेचन आहे.

नारायणोपनिषद्.

३ नारायणोपनिषद् गद्यांत असून, त्यांत शंकरापासून विष्णु झाला असल्याविषयीं वर्णन आहे, व त्यांत विशेषेंकरून " ॐ नमो नारायणाय " ह्या मंत्राचें महत्व सांगितलें आहे.

नृसिंहतापनीयोपनिषद्.

नृसिंहतापनीयोपनिषदांत सहा उपनिषदांचा अंतर्भाव होतो. ह्याचे दोन भाग आहेत. पहिल्या भागांत पांच उपनिषदें असून, त्यांत नृसिंहाच्या अत्युग्र तेजाचें वर्णन आहे, व त्याला काळाचाही काळ असें विशेषण दिलें आहे.

उग्रं वीरं महा विष्णुं ज्वलंतं सर्वतो मुखम् ।
नृसिंहं भीषणं भद्रं " मृत्युमृत्युं " नमाम्यहम् ॥

दुसऱ्या भागांत वेदान्त विषयाचें प्रतिपादन असून, आत्मा किंवा परमात्मा, अथवा ब्रह्म अगर परब्रम्ह, हें नित्य, शुद्ध, सत्य, मुक्त, सर्वव्यापी, आनन्दरूप, ज्ञानमय, विज्ञानमय, आणि सर्वांचें आदिकारण असल्याविषयीं सांगितलें आहे. तथापि, ह्या दोन्ही भागांत, ब्रह्मा, विष्णु, व महेश, यांचा उल्लेख वारंवार केल्याचें आढळून येतें. ह्या उपनिषदावर गौडपाद आणि शंकराचार्य यांची टीका आहे. ह्याचा नक्की काल कळून येत नाहीं. परंतु, तें इसवी सनाच्या चौथ्या शतकांत किंवा त्याच्या आंत बाहेर रचलें

असावें, अशी कांहींची कल्पना आहे. **नारसिंहषट्चक्रो**पनिषदावर **नारायणाची** टीका आहे.

रामतापनीयोपनिषद्.

वर सांगितलेल्या उपनिषदाप्रमाणेंच, **रामतापनीयोप**निषदाचे देखील दोन भाग आहेत. पहिला भाग ९५ श्लोकी पद्य आहे, व त्यांत **रामाचें** त्रोटक चरित्र आहे दुसरा भाग गद्य असून, त्यांत थोड्याबहुत फेरफारानें तीन चार[१] उपनिषदांतील मजकूर घुसडून दिला आहे. मात्र, सर्वशक्तिमान काय तें एक **राम** होय; व त्याच्या खालीं इतर देव, इत्यादि त्याचें खरें इंगित असल्याचें दिसतें. ह्याजवर **आनन्दवनाची** आणि **नारायणाची** टीका असून, ही दुसरी टीका **संस्कृतसहित** बिब्लिओथिका इंडिकांत छापिली आहे. ( १८७३ ). ह्या उपनिषदाला पंचत्रिंशत्तम म्हटल्याचें आढळतें, व ह्याचा काल इ. स. चें अकरावें किंवा बारावें शतक असावें, असें म्हणतात.

गोपालातापनीयोपनिषद.

**गोपालतापनीयोपनिषदांत** **कृष्णाचें** प्राधान्य वर्णिलें आहे. ह्याजवर **विश्वेश्वर** आणि **नारायणाची** टीका असून, त्याची पहिल्या टीकेसहितची आवृत्ति **हरचन्द्रविद्याभूषण**, व **विश्वनाथशास्त्री**, यांनीं छापिली आहे. ( बि. इंडिका. इ. स. १८७० ).

**गोपीचंदनोपनिषदांत** गोपीचंदनाचे टिळे आणि मुद्रा

---

१ तारकोपनिषद्, मांडुक्योपनिषद्, जाबालोपनिषद, आणि नृसिंहोपनिषद.

गोपीचन्द्रोपनिषद्, कैवल्योपनिषद्, वगैरे.

कशा लावाव्या, व त्यापासून पुण्यांश आणि फलप्राप्ति कशी होते, हें सांगितलें असून, त्याजवर नारायणाची टीका आहे. कैवल्योपनिषद् गद्य-पद्य आहे, व त्यांत महादेवाचें माहात्म्य वर्णिलें आहे. ह्याजवर नारायण, शंकर, आणि शंकरानन्द ( विद्यारण्य ? ), यांची टीका आहे, व नारायणानें ह्याला एकचत्वारिंशत्तमी म्हटलें आहे. अथर्वशिरस् उपनिषद् गद्य आहे, व त्यांतही शिवाचाच महिमा वर्णिला असून, त्याजवर नारायण आणि शंकरानन्द यांची टीका आहे. गणपति, नारायण, रुद्र, सूर्य, व देवी, या पांच उपनिषदांचें व्हान्स केनेडीनें भाषान्तर केलें आहे. त्रिपुरोपनिषदावर भट्टभास्कर मिश्राची टीका असल्याचें समजतें. स्कन्दोपनिषद पद्य असून, त्याचे १९ श्लोक आहेत. ह्यांत अद्वैत मताचें प्रतिपादन आहे. सबब, त्यांत शिव आणि विष्णु यांचें ऐक्य व्यक्त केलेलें दिसतें, यांत नवल नाहीं.

सुन्दरीतापनीयोपनिषदांत शक्तीची (म्हणजे पार्वतीची) भक्ति करण्याविषयीं सांगितलें आहे.

शाक्तोपनिषदें.

तथापि, ह्या उपासनेचें मूळबीज पाहूं गेलें असतां, तें केनोपनिषद्[१] आणि नारायणोपनिषदांत[२] प्रथमतः दिसून येतें. कारण, पहिल्या उपनिषदांत उमाहैमवतीचा उल्लेख असून, दुसऱ्यांत शूलपाणि जो

१ सामवेद, मागील पान १९३ पहा.

२ अथर्ववेद, मागील पान २०५।२१२ पहा.

शिव त्याचा महिमा वर्णिला आहे. ह्याचे पांच भाग आहेत. ह्याशिवाय, देवी–उपनिषद व कौलोपनिषद हीं देखील शाक्त पंथाचींच आहेत.

पिंडोपनिषद्, गरुडोपनिषद्, वगैरे.

४ पिंडोपनिषदांत प्रेतांस पिंड देण्याविषयींचा विचार आहे. ह्याजवर नारायणाची टीका आहे, व तो तींत ह्या उपनिषदाला सप्तविंशांतिपूरणी म्हणतो. नीलरुद्रोपनिषद् पद्यात्मक असून, तें रुद्राच्या स्तुतिपर आहे. ह्याजवर देखील नारायणाची टीका आहे, आणि हीं दोन्हीं उपनिषदें टीकेसहित बिब्लिओथिका इंडिकांत छापिलीं आहेत. (इ० स० १८७३). नीलरुद्रोपनिषदाला नारायणानें आपल्या टीकेंत षोडशी अशी संज्ञा दिलेली आढळते. गरुडपुराणांत सर्पारि जो गरुड त्याची प्रशंसा केली आहे. तथापि, ह्यांत प्राक्कालीन विषयक महत्व असल्याबद्दल कित्येक विद्वानांचें मत आहे. ह्याजवर नारायणाची टीका असून, त्याला त्यानें चतुश्चत्वारिंशत्तमी असें नांव दिल्याचें दिसून येतें. (बि. इं. १८७४).

अथर्ववेदाचीं श्रौत आणि गृह्यसूत्रें.

असो. ह्याशिवाय, अथर्ववेदाचीं दोन सूत्रें आहेत. १ श्रौत, आणि २ गृह्य. पहिलें वैतान श्रौतसूत्र या नांवानें प्रसिद्ध असून, दुसऱ्याला कौशिक गृह्यसूत्र म्हणतात. वैतानश्रौतसूत्राबद्दलची माहिती उपलब्ध झाली नसल्याकारणानें, ती देतां येत नाहीं. तथापि,

कौशिकगृह्य सूत्रासंबंधीं थोडीबहुत हकीकत मिळाली आहे. सबब, ती येथें मी नमुद करितों.

गृह्यसूत्रांतील विषय.

कौशिकगृह्यसूत्रांत १४ अध्याय असून, त्यांतील बहुतेक मतलब इतर गृह्यसूत्रांप्रमाणेंच आहे. मात्र, आधारादाखल मंत्र, ब्राह्मण, आणि संप्रदाय, यांजकडे बोट दाखवून "इति ब्राह्मणं," असें स्थलविशेषीं म्हटलेलें आढळतें. तिसऱ्या अध्यायांत निर्ऋतीसंबंधीं विधिनियम सांगितले आहेत. चौथ्यांत भैषज्य किंवा रोगहरप्रतिक्रिया; तदनंतरच्या अध्यायांत शापक्रिया, मंत्रसामर्थ्य, व ऐन्द्रजाल; दहाव्यांत विवाहसंस्कार; अकराव्यांत पितृयज्ञ अथवा पितृतर्पण; आणि बाकी राहिलेल्या अध्यायांत दुःशकुनशांत्यर्थ अनेक उपाय, वगैरे, सुचविले आहेत.

पांच कल्प.

सदरहू सूत्राला जोडूनच पांच कल्प असल्याचें दिसतें. ह्यापैकीं, पहिला १ नक्षत्रकल्प होय. ह्याच्या पन्नास कंडिका असून, त्यांत ज्योतिषविचार व नक्षत्रविवेचन आहे. ह्याशिवाय, आरण्यक ज्योतिष म्हणून निराळेंच असल्याविषयीं मार्टिनहौचें मत आहे. असो. दुसरें २ शांतिकल्प असून, त्यांत नक्षत्रांचा पूजाविधि सांगितला आहे. ह्याच्या पंचवीस कंडिका असल्याचें कळतें. ह्याखेरीज ३ वितानकल्प, ४ संहिताकल्प, आणि ५ अभिचारकल्प, असे असून, ह्या शेवटल्या कल्पाऐवजीं आंगिरसकल्प असल्याचें, विष्णुपुराण व चरणव्यूह, यांजवरून समजतें.

अथर्ववेदाचीं दोन प्रातिशाख्यें असल्याचेंही कळतें.

प्रातिशाख्यें.

ह्यापैकीं एक शौनकाचें आहे, व त्यांत चार अध्याय असल्याकारणानें, त्याला शौनकीया चातुरध्यायिका म्हणतात. ह्यांत विशेषतः व्याकरण विषयच असून, त्यांत शाकटायनादि वैयाकरणांचीं नांवें असल्याचें आढळतें.

अनुक्रमणी.

अथर्ववेदाची अनुक्रमणी देखील आहे. परंतु, तींत वेद प्रवर्तकांचीं जीं नांवें दिलीं आहेत, तीं ऋषींचीं क्वचितच आढळून येतात. इतकेंच नव्हे तर, तीं अमानुषी, दैवी, किंवा ईश्वरी असल्याचें त्यांजवरून ध्वनित होतें, असें कांहींचें मत आहे.

परिशिष्टें.

ह्याशिवाय, अथर्ववेदाचीं चवऱ्याहत्तर परिशिष्टें असल्याचें समजतें. हीं बहुतेक पद्य म्हणजे श्लोकबद्ध असून, त्यांत सामान्यतः गृह्यसूत्राचे विषय, दैवज्ञविद्या, अपशकुन, व दुश्चिन्ह, इत्यादींचें विवेचन आहे. ह्या परिशिष्टांतच निघंटु आणि चरणव्यूह आहे; व चरणव्यूहांत अथर्वसंहितेच्या ऋचा १२३८०, पर्यायांची (सूक्तांची) संख्या २०००; आणि कौशिकोक्त परिशिष्टांची संख्या (कौशिकोक्तानि परिशिष्टानि) ७० दिली आहे. ह्यांतच कांहीं आचार्यांचीं नांवें सुद्धां दिलीं आहेत. त्यापैकीं, कित्येक महत्वाचीं असल्यामुळें, तीं येथें देतों:—

निघंटु व चरणव्यूह.

आचार्य. १ बृहस्पति अथर्वन्. २ भगवंत अथर्वन्. ३ भृगु. ४ भार्गव. ५ अंगिरस. ६ आंगिरस. ७ काव्य ( किंवा कवि ) उशनस्. ८ शौनक. ९ नारद. १० गौतम. ११ कांकायन. १२ कर्मघ. १३ पिप्पलाद. १४ माहाकि. १५ गर्ग. १६ गार्ग्य. १७ वृद्धगर्ग. १८ आत्रेय. १९ पद्मयोनि. आणि २० कौष्टुकि.

---

# भाग ६३ वा.

## वैदिकग्रंथोदधि.

## वेदांगें.

वेदांगें.

याप्रमाणें, ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद, आणि अथर्वण वेद, यांचें तपशीलवार विवेचन झालें. सबब, वेदांगें म्हणून जो वेदांचा महत्वाचा भाग राहिला आहे, त्याविषयींची आतां सविस्तर माहिती देऊं.

त्यांचा उद्देश.

हीं वेदांगें सहा असून, तीं, १ शिक्षा, २ छन्दस, ३ व्याकरण, ४ ज्योतिष, ५ निरुक्त, व ६ कल्प, या नांवांनीं सुप्रसिद्ध आहेत. ह्यांचा मुख्य उद्देश म्हटला म्हणजे, वेदांच्या संबंधानें अवश्य त्या भिन्न भिन्न विषयांत त्यांचा हरएक तऱ्हेनें जरूर तो उपयोग होऊन, त्यांचें सनातनत्व अबाधित रहावें, इतकाच असल्याचें दिसतें; आणि त्याच धोरणानें त्यांची योजनाही असावी, असें वाटतें.

व आवश्यकता.

कारण, प्रथमतः वेद मंत्राचा योग्य रीतीनें उच्चार होण्यासाठीं, व त्यांत कोणतीही चूक भूल राहूं नये एतदर्थ, शिक्षा-शास्त्र उपयोगांत आलें. तसेंच, वेदमंत्र योग्य छन्दांत

ह्मणता आणि लिहिता यावे, याकरितां छन्दश्शास्त्र रचलें. शिवाय, हे मंत्र व्याकरणरीत्या शुद्ध लिहिता येण्या-साठीं, व्याकरणाध्ययनाचे नियम सांगितले. आणि आमचे वेद जसजसे जास्त पुराण होत चालले, तसतसे ते दुर्बोध होऊं लागल्यामुळें, अनेक विद्वज्जनसमूहानें वैदिक कोश रचून त्याला निघंटु अथवा निरुक्त अशी संज्ञा दिली. ह्या खेरीज, वेदानुसार आचरण व होमहवन व्हावें म्हणून, नक्षत्रान्वेषण करणें भाग पडलें; आणि त्याकारणानें, ज्योतिःशास्त्र उदयास आलें. पुढें, यज्ञांत सांगितलेलें कर्म व इष्टि वगैरे कोणत्या प्रकारें करणें अवश्य आहे, हें कळण्याकरितां, तत्संबंधीं यथासांग निरूपण कल्पांत केलें.

याप्रमाणें, सदर्हू शास्त्रें उदयास येण्यास केवळ अव-श्यकताच कारणीभूत होऊन, पुढें कालान्तरानें व समयास अनुसरून, तीं प्रगल्भ दशेप्रतही पावलीं. सबब, तद्विषयक जरूर तो तपशील आपण येथें थोडक्यांत देऊं, म्हणजे त्यावरून अवश्य तें दिग्दर्शन होईल.

शिक्षा.

शिक्षा म्हणजे स्वरशास्त्र किंवा ध्वनिविषयक विवेचन होय. ह्यांत भिन्नभिन्न वर्णांच्या स्थानांचें, त्यांच्या उपपत्तीचें, आणि ते उत्पन्न होत असतांना लागणाऱ्या कालावधीचें, यथाव-काश [1]वर्णन आहे.

---

१ बहुतेक शिक्षांतील विवेचन सामान्यतः एकाच मासल्याचें असून, तें खरोखर विशेष महत्वाचें असल्या कारणानें, मजला उप-

( पुढें चालू )

प्रत्येक वेदाची भिन्नभिन्न शिक्षा असून, त्यांचें प्रवर्तक-

---

( मागील पृष्ठावरून पुढें चालू. )

लब्ध असलेल्या पाणिनीय शिक्षेच्या हस्तलिखितावरून, अवश्य तें अवतरण वाचकाच्या सोईसाठीं येथें देतों:—

त्रिषष्टिश्चतुःषष्टिर्वा वर्णाः शंभुमते मताः ।
प्राकृते संस्कृते चापि स्वयंप्रोक्ताः स्वयंभुवा ॥ ३ ॥
स्वरा विंशतिरेकश्च स्पर्शानां पंचविंशतिः ।
यादयश्च स्मृताह्यष्टौ चत्वारश्च यमाःस्मृताः ॥ ४ ॥
अनुस्वारो विसर्गश्च ᳵकᳶपौ चापि पराश्रितौ ।
दुःस्पृष्टश्चेति विज्ञेयो लृकारः प्लुतएवच ॥ ५ ॥
कंठे माध्यंदिनयुगं मध्यमं त्रैष्टुभानुगम् ।
तारं तार्तीयसवनं शीर्षण्यं जागतानुगम् ॥ ८ ॥
सोदीर्णो मूर्ध्न्यभिहतो वक्त्रमापद्य मारुतः ।
वर्णाञ्जनयते तेषां विभागः पंचधास्मृतः ॥ ९ ॥
स्वरतः कालतः स्थानात्प्रयत्नानुप्रदानतः ।
इतिवर्णविदः प्राहुर्निपुणं तन्निबोधत ॥ १० ॥
उदात्तश्चानुदात्तश्च स्वरितश्च स्वरास्त्रयः ।
ऱ्हस्वो दीर्घः प्लुत इति कालतो नियमा अचि ॥११॥
उदात्ते निषादगान्धारावनुदात्त ऋषभधैवतौ ।
स्वरितप्रभवाह्येते षड्जमध्यमपंचमाः ॥ १२ ॥
अष्टौ स्थानानि वर्णानामुरःकंठःशिरस्तथा ।
जिंव्हामूलंच दन्ताश्च नासिकोष्ठौ च तालुच ॥१३॥
ओभावश्च विवृत्तिश्च शषसारेफएवच ।
जिव्हामूलमुपध्माच गतिरष्टविधोष्मणः ॥ १४ ॥

( पुढें चालू )

ही अनेक असल्याचें दिसतें. कारण, मांडुकीशिक्षा, नारदशिक्षा, पाणिनीयाशिक्षा, इत्यादि निरनिराळ्या नांवांनीं ह्या शिक्षा सुप्रसिद्ध आहेत.

हें शास्त्र बरेंच पुरातन आहे, ह्यांत संशय नाहीं. कारण, त्याचा उल्लेख तैत्तिरीय आरण्यकांत देखील केलेला असल्याचें आढळून येतें.

तिचें प्राचीनत्व.

छन्दःशास्त्र तर याहीपेक्षां विशेष प्राक्कालीन असल्याचें उघड होतें. कारण, आमचा, किंबहुना अखिल भूमंडलावरीलही, पुराणतम ग्रंथ म्हटला म्हणजे ऋग्वेदच असून, त्याच्यांतील यच्चावत् ऋचा केवळ छन्दोबद्धच आहेत. शिवाय, क्रौष्टुकी, तांडी, यास्क, सैतव, रात, माण्डव्य, इत्यादि जे ह्या शास्त्रीय विषयाचे अध्यापक व आचार्य होऊन गेले, ते सुद्धां बरेच पुरातन असल्याचें दिसतें. छन्दश्शास्त्राचा प्रणेता पिंगल असल्याविषयीं पूर्वींच सांगितलें आहे.

छन्दःशास्त्र, व त्याचें पौराणत्व.

---

( मागील पृष्ठावरून पुढें चालू. )

कंठ्यावहा विचुयशास्तालव्या ओष्ठजावपू ।
स्युर्मूर्धन्या ऋटुरषा दन्त्या लृतुलसास्मृताः ॥१७॥
जिव्हामूले तु कुःप्रोक्तो दन्त्योष्ठ्यो वःस्मृतो बुधैः ।
एऐ तु कंठतालव्या ओऔ कंठोष्ठजौ स्मृतौ ॥ १८ ॥
अर्धमात्रा तु कण्ठ्यास्यादेकारैकारयोर्भवत् ।
ओकारौकारयोर्मात्रा तयोर्विवृतसंवृतम् ॥ १९ ॥

१ भारतीय साम्राज्य. पूर्वार्ध. पु. २. पा. १४२.

वेदांचें तिसरें अंग म्हटलें म्हणजे व्याकरण होय. ह्याचा विचार थोडयाबहुत प्रमाणानें प्रातिशाख्य सूत्रांत केला असून, कित्येक वैय्याकरणांचीं नांवें आरण्यकांतही दृग्गोचर होतात. सामवेदाच्या सामतंत्र नामक ग्रंथांतही व्याकरणविषयक विवेचन आहे, आणि त्याच कारणानें त्याला व्याकरण असें नामधेय सरते शेवटीं दिलेलें आढळतें. स्वरपरिभाषा अथवा सामलक्षणम् नांवाचें आणखीही एक पुस्तक असल्याचें कळून येतें. तसेंच, "सामलक्षणं प्रातिशाख्यं शास्त्रम्" म्हणून एक स्वतंत्र शास्त्रच असल्याविषयीं, कैयटाचें ह्मणणें आहे.

व्याकरण, व त्याचें प्रयोजन.

यास्कानें देखील अनेक नैरुक्तांची ( निरुक्तकारांची ) आणि वैयाकरणांचीं नांवें दिलीं आहेत. त्यावरून, त्याच्याही पूर्वी ह्या महत्वाच्या व्याकरण विषयाची पुष्कळ चर्चा चालून, त्यांत अनेक शोधकांचे दीर्घ परिश्रम झाले असल्याचें उघड होतें. शिवाय, कौषीतकी ब्राह्मणावरून तर, भरतखंडाच्या उत्तरेस व विशेषतः त्याच्या वायव्येकडील प्रांतांत, भाषाशास्त्राची चळवळ अगदीं जारीनें सुरू असून, तद्विषयक शोधही फार काळजीपर्वक करीत असत, असें दिसतें.

ऋग्वेदच्या प्रातिशाख्यांत शाकटायन, शाकल्य, आणि गार्ग्य, ह्या तीन वैयाकरणांचीं नांवें असून, तींच शुक्ल यजुर्वेदाच्या प्रातिशाख्य सूत्रांत व अनुक्रमणींतही आढळून येतात. पण, याखेरीज आणखी काश्यप, दाल्भ्य, जातू-

कर्ण्य, शौनक, औपशिवि, काण्व, आणि माध्यंदिन, या वैय्याकरणांचीं नांवें सुद्धां ह्यांत दृग्गोचर होतात.

निरुक्त व त्यांचें कारण.

निघंटु, अथवा निरुक्ति, किंवा निरुक्त, हें वेदांचें चवथें अंग असून, हा निघंटु शब्द निग्रंथु ( म्हणजे "ग्रथित केलेलें" ) याशब्दाचाच अपभ्रंश असल्याचें दिसतें. निघंटु ही वेदांतील कठिण शब्दांची व्याख्या होय; आणि ही व्याख्या करणारास नैघंटुक म्हणतात.

निघंटुवर निरुक्ति म्हणून यास्काची टीका आहे, व तीच विशेषतः सुप्रसिद्ध आहे. ह्याखेरीज देवराजयज्वन्, श्रीनिवास, इत्यादींची देखील निघंटूवर टीका असून, देवराजयज्वन् हा इ. स. च्या १५ व्या किंवा १६ व्या शतकांतील असावा, असें वाटतें. यास्क याहीपेक्षां फारच पुरातन, व पाणिनीच्या आगोदर बरींच शतकें उदयास आला असल्याचें दिसतें.

निघंटु आणि निरुक्ताचा काल, व त्यावरील टीकाकार, यांजविषयींची तपशिलवार हकीकत मागें ( पान ८७ वर ) दिली आहे. सबब, त्यासंबंधानें आतां जास्त लिहिण्याचें कांहीं प्रयोजन नाहीं.

ज्योतिष, व त्याचा कर्म विधींत उपयोग.

ज्योतिष हें वेदांचें पांचवें अंग होय. आम्हां आर्यांचीं वेदांवरील अचलश्रद्धा, आणि तदनुसार आचरण ठेवण्याविषयीं आमच्या मनाची अकुंठित प्रवृत्ति, हींच हें महत्वाचें अंग इतक्या अतिप्राचीन काळीं देखील

उदयास येण्यास कारणीभूत झाली, असें ह्मणण्यास हरकत नाहीं. कारण, वेदविहित आचरण ठेवणें, हेंचि आपली इतिकर्तव्यता, व वेदाज्ञा पाळणें, हाच कायतो पुरुषार्थ, असें समजून, भिन्नभिन्न काळीं पृथक् पृथक् कर्मे करण्यासाठीं,[1] आमचे आर्यपूर्वज आकाशांतील तेजोमय गोळांचें आणि ग्रहनक्षत्रांचें सतत अन्वेषण करीत, व त्यांचा वेधही घेत.

ग्रहावलोकन.

शिवाय, प्रात्यहिक पंचमहायज्ञ, सायंप्रातरग्निहोत्र, दर्शपूर्णमासयज्ञ, चातुर्मासयज्ञ, आणि अयनयज्ञ, इत्यादि नानाप्रकारचे यज्ञ, आमचे वेदकालीन पूर्वज करीत. त्यामुळें, वेदांत सांगितलेल्या रोजच्या यज्ञयागादि क्रिया विशेषतः चन्द्रगतीवरूनच मुख्यत्वेंकरून अवलंबून असत. कारण, त्याकाळीं, यज्ञयागादि क्रियांचा चंद्राशीं इतका कांहीं निकट संबंध असे कीं, मास, पक्ष, तिथि, पौर्णिमा, व अमावास्या, यांचें साहजिक रीतीनें ज्ञान होण्यास चन्द्राखेरीच अन्य साधनच नव्हतें. आणि म्हणूनच "ऋतूंसाठीं चन्द्र निर्माण केला," व "ऋतूंचें नियमन होण्याकरिताच चन्द्र हा पुनः पुनः उगवतो," असें एका ऋचेंत म्हटलें आहे. इतकेंच नव्हे तर, ऋत्विज म्हणजे ऋतुमानाप्रमाणें यज्ञ करणारा, असें सामान्य नांवच हवन करणारास असे.

एतावता, आमच्या धर्मव्यवहाराचा केवळ चंद्राशींच निकट संबंध असल्याकारणानें, चंद्राचें परिवर्तन कसकसें

---

१ ग्रंथकर्त्याचें भाषाशास्त्र पान ५ पहा.

होतें, त्याची गति किती आहे, व तो कोणतें नक्षत्र किती दिवस भोगतो, हें शोधून काढण्याची निःसंशय मोठीच आवश्यकता होती. त्यामुळें, आर्यहिंदूंच्या कल्पनाशक्तीस सहजीं अवकाश मिळाला; आणि त्यांनीं आपल्या बुद्धिप्रभावानें ज्योतिःशास्त्राचीं मूलतत्वें आज सुमारें आठ हजार वर्षांमागें कोणाच्याही साहाय्याशिवाय शोधून काढून, ह्या अमूल्य विद्येचें बीज पेरलें.

अहर्निशीं अवलोकनानें आमच्या वेदकालीन पूर्वजांची अशी पक्की खात्री होऊन गेली होती कीं, चन्द्राचें परिवर्तन होतांना त्याला आकाशांतील क्रान्तिवृत्ताच्या सप्तविंशतिस्थानमालिकेंतून जावें लागतें. आणि म्हणूनच त्या त्या स्थानांतील नक्षत्रांस किंवा तारासमूहांस त्यांनीं पृथक् पृथक् नांवें दिलीं, व आपला कार्यभाग करून घेतला.

भारतीय ज्योतिःशास्त्राचा उदयकाल.

आतां, ह्या ज्योतिः शास्त्राचा उदय कोणत्या कालांत झाला, हें पाहूं. वास्तविक रीतीनें पाहिलें तर, ह्या संबंधानें तपशिलवार विवेचन येथें करण्याचें विशेष प्रयोजनच नाहीं. कारण, तें भारतीयसाम्राज्याच्या पूर्वार्धात सविस्तरपणें केलें आहे. तथापि, प्रकृत विषयाच्या संबंधानें आणि वाचकाच्या सोईसाठीं, तद्विषयक थोडीशी माहिती येथें देतों.

---

१ पुस्तक २ रें. पान ८८ ते ९५ पहा.
पुस्तक ४ थें पान ६६ ते ९५ पहा.

तैत्तिरीयसंहितेंत सत्तावीस नक्षत्रांचीं नांवें दिलीं असून, वाजसनेयिसंहिता व छान्दोग्योपनिषद् यांत "ताराप्रेक्षक" आणि "ज्योतिःशास्त्र" यांचा उल्लेख केलेला असल्याचें आढळून येतें. परंतु, याच्याही पूर्वी आर्यहिंदूंनीं या शास्त्रांत शोध केला असल्याचें ऋक्संहितेवरूनच चांगलें व्यक्त होतें. कारण, ऋग्वेदाच्या एका ऋचेंत, आणि तेंहि पहिल्या मंडलाच्या १६४ व्या सूक्तांत, एक वर्षाचे बारा महिने व तीनशें साठ दिवस असल्याविषयीं स्पष्ट उल्लेख आहे.

त्याचें पौराणत्व.

**द्वादशारं नहितज्जराय वर्वर्तिचक्रं परि द्यामृतस्य। आपुत्रा अग्ने मिथुनासो अत्र सप्त शतानि विंशति-श्चतस्थुः ॥ ११ ॥**

(ऋग्वेद. अ. २. अ. ३. व १६. मं. १ अ. २२. सू. १६४.)

**तात्पर्यार्थः**—हे अग्नि, सूर्याच्या (सत्याच्या) चक्राला बारा अरे (महिने) असून, तें द्यु लोकांच्या भोंवतीं सदैव भ्रमण करीत असतें. हें कधींही नाश पावत नाहीं, व त्याजवर सातशे वीस मुलांचीं जोडपीं आरूढ झालेलीं असतात. ह्मणजे त्याला बारा महिने, आणि तिनशे साठ दिवस व तिनशे साठ रात्री असतात, असा भावार्थ समजावयाचा.

पृथ्वीचें परिवर्तन.

---

१ हीं नक्षत्रें इ. स. पूर्वी १४७२ वर्षांपासून तों ५३६ वर्षांच्या आंत केव्हां तरी शोधून काढिलीं असावींत, असें जर्मनी देशांतला जो प्रोफेसर वेबर त्याचें मत आहे.

दुसरा महत्वाचा शोध म्हटला म्हणजे, ग्रहण कसें लागतें याविषयींचा होय; आणि ह्यासंबंधाचें दिग्दर्शन एका ऋचेंत अगदीं उघडच झाल्यासारखें दिसतें.

ग्रहणाच्या कारणाचा शोध.

**अत्रिः सूर्यस्यदिवि चक्षुराधात्स्वर्भानोरप मायाऽघुक्षत् । यं वै सूर्यं स्वर्भानुस्तमसा विध्यदसुरोऽत्र यस्तमन्वविंदन्नह्यऽन्येऽशक्नुवन् ॥**

(ऋ. अ. ४ अ. २ व ८.)

ह्यावरून, सूर्यमंडळाचें म्हणजे **सुर** अथवा स्वप्रकाशक गोलाचें दर्शन होण्यास, असुर ऊर्फ परप्रकाशक गोळ (ज्यास **स्तर्भानु** किंवा स्वर्भानु अशी संज्ञा आहे ते), अटकाव करितात, असें होतें. फार तर काय सांगावें, पण हा शोध **अत्रि** ऋषीनेंच शोधून काढिला असून, त्याच्या पूर्वी तो कोणास देखील माहीत नव्हता, इतकेंही त्यावरून स्पष्ट दिसतें.

पण, याहिपेक्षां विशेष महत्वाचा शोध आमच्या वेदकालीन आर्यपूर्वजांनीं केला असल्याचें दिसतें. व त्यावरून त्यांजला आकर्षण शक्तीचा प्रभावही चांगला माहीत होता, हें निर्विवाद ठरतें.

सूर्याकर्षणाचें अन्वेपण.

**मित्रोजनान्यातयातिप्रजानन्मित्रोधारपृथिवीमुतद्याम् । मित्रःकृष्टीरनीमिषाभिचष्टेमित्रायहव्यंघृतवद्विधेम ॥**

(ऋ. अ. ३. अ. ४. व ५.)

ह्या ऋचेवरून त्यांनीं असें सुचविलें कीं, सर्व प्रजेला सूर्याचाच आधार असून, हा प्रचंड तेजोराशी पृथ्वीला आपणाकडेसच आपल्या आकर्षणशक्तीनें ओढून घेतो. इतकेंच नव्हे तर, ह्या त्याच्या आकर्षणशक्तींतून, ती निमिषमात्रही बाहेर पडूं शकत नाहीं.

अती प्राचीन काळचे ज्योतिषी.

असो. आमचा अति प्राचीन काळचा ज्योतिषी पराशर असून, तदनंतरचे गर्ग, असुरमय, इत्यादि होत. पुढे, त्याच्या नन्तर, ऐतिहासिक कालात जे जे म्हणून उदयास आले, त्यांजविषयींची साद्यन्त माहिती भारतीय साम्राज्याच्या चवथ्या पुस्तकांतील आतिमाव्या भागांत दिली आहे, त्यावरून एकंदर हकीकत वाचकाच्या लक्षांत येईल.

कल्प व त्यांतील विषय.

कल्प हें वेदाचें सहावें अंग आहे. ह्यांत श्रौत, गृह्य आणि स्मार्त, वगैरे नानाप्रकारच्या सूत्रांचा अन्तर्भाव होतो; व त्यात यज्ञविधि, नित्यनैमित्तिककर्म, आणि वर्णाश्रमधर्म, या विषयींचें विवेचन आहे. हीं सूत्रें भिन्नभिन्न ऋषींनीं केलीं आहेत, व त्यांचें विवेचन प्रत्येक वेदाच्या सूत्राखालीं सविस्तरवार केलेलें असल्यामुळें, तद्विषयक पुनरुक्ति करण्याचें प्रयोजन नाहीं.

---

# भाग ६४ वा.

## वैदिक ग्रंथोदधि.

## वेदकालीन आचारविचार, सामाजिकस्थिति, विद्याभिवृद्धि, आणि मानसिकउन्नति.

वेदकालीन आचारविचार, व

मागील भागांत, आमचे अपूर्व व पुराण वेद आणि त्यांचीं महत्वाचीं अंगें, याविषयींचा यथावकाश विचार झाला. सबब, आतां, ह्या वेदकालांतील आचारविचार, सामाजिक स्थिति, विद्याभिवृद्धि, व मानसिक उन्नति, यांसंबंधीं थोडक्यांत विवेचन करूं.

तत्कालीन एकंदर स्थितीचें दिग्दर्शन.

आतां, आम्हां आर्यांची ही वेदकालीन स्थिति अगदीं बाल्यावस्थेंतच होती. तरी देखील, तितक्याही पुराणतमकालीं, तींत निःसंशय विशेष सतेजता असून, तिच्या समवेतच नागरिक संपत्ति, राजवाडे व नगरें, स्वपराक्रमाविषयींची विलक्षण आर्तता, स्वावलंबनाची निःसीम प्रीति, स्वसंरक्षणाबद्दल दूरवर तजवीज, परावलंबनाचा अत्यन्त तिरस्कार, नीतिमत्तेचें वर्चस्व, आत्मोन्नतीचें श्रेष्ठत्व, इत्यादि महत्वाच्या गोष्टी ठायीं ठायीं भासमान होत असल्याचें चांगल्या प्रकारें व्यक्त होतें.

कारण, आमचे तत्कालीन पूर्वज नगरांत रहात, आणि दूध दुभत्यासाठीं आपल्याजवळ गुरेंढोरें ही बाळगीत. ते शेतीभाती करीत, व त्यांच्या जवळ धनधान्यादि संपत्ति असे. घोडे, रथ, चिलखतें, व आयुधें, इत्यादींची देखील त्यावेळीं उणीव नव्हती. तथापि, अशा सुखोपभोगाच्या स्थितींतही, ते कोणत्याही प्रकारें दुर्व्यसनांत, किंवा निरर्थक ऐषआरामांत बिलकूल रहात नसत; आणि सुरापान तर त्यावेळीं अगदीं निषिद्धच मानलें होतें; असें अनेक प्रमाणांवरून चांगल्याप्रकारें शाबीत करता येईल.

त्यांची शेतीभाती व रहाण्याची पद्धति.

अन्नस्यवाएतच्छमलम् । यत्सुरा ।

अशी यजुर्वेदांतील श्रुति आहे; व त्यावरून, सुराही वेदकालीं निषिद्ध मानली असल्याचें उघड होतें. ह्याशिवाय,

त्यावेळीं सुरापानाचा निषेध, व त्याचें प्रमाण.

चोरस्यान्नं नवश्राद्धंब्रह्महा गुरुतल्पगः ।
गोस्तेयं सुरापानंभ्रूणहत्यातिलाशान्ति
शमयन्तुस्वाहा ।

असा मंत्र देखील विरजा होम प्रकरणीं यजुर्वेदांत आढ-

---

१ त्वंशतावंगृदस्य।भिनत्पुरोऽनानुदः परिषूताऋजिश्वना॥ ८ ॥
( ऋ. अ. १. अ. ४ व १६. मं. १. अ. १०. सू. ५३ )

२ दुरोअश्वस्यदुरइन्द्रगोरसि दुरोयवस्य वसुन इनस्पति ॥ २ ॥
( ऋ. अ. १. अ. ४. व १५. मं. १. अ. १०. सू. ५३ )

ळून येत असून, त्याचा अर्थ "चोराचें अन्न, एकोद्दिष्टादि श्राद्धान्नभोजन, ब्रह्महत्या, गुरुपत्नी गमन, गोस्तेय, दारू पिणें (सरापान), आणि भ्रूणहत्या, यांचा नाश ह्या तिलांजलीनें होवो," इतक्याच मतलबाचा आहे.

सुवर्ण चोरणारा, दारूपिणारा, गुरुपत्नीशीं गमन करणारा, व ब्रह्मघ्न, हे चौघेजण पतित होत. इतकेंच नव्हे तर, ह्यांच्याशीं संसर्ग ठेवणाराही पांचवा पतित होय, अशा-विषयींचें सामवेदांतील छान्दोग्योपनिषदांत आणखी एक प्रमाण आढळतें.

**स्तेनो हिरण्यस्य सुरां पिबंश्च गुरोस्तल्पमावसन्ब्रह्महा चैते पतन्ति चत्वारः। पंचमश्चाऽऽचरंस्तैरिति।**

अथर्ववेदांतील काठकोपनिषदात सुद्धां सुरापानाचा अशाच प्रकारें निषेध केला आहे.[1]

**तस्माद् ब्राह्मणः सुरां न पिबेत्।**

अमो. वेदांतील ऋचावरून, त्यावेळीं विशांचा समूह, अथवा व्यापारी वर्ग, हा चांगल्याच भरभराटीच्या स्थितींत होता, असें दिसतें. कारण, ह्यांपैकीं कित्येक तर, दूरदूरची सफर जलपर्यटनानें मारीत; कांहीं कांहीं लोक देशान्तरीं जाऊन

व्यापाराची भरभराटी.

---

१ अशा तऱ्हेची वस्तुस्थिति असून देखील, कित्येक आधुनिक सुधारलेली मंडळी, सोमरस व मद्य ह्यांस एकाच पंक्तीला बसवून, सुरापान हें वेदकालीं अगदीं प्रचारांत होतें, असें निःशंक विधान करितात, ही विशेष आश्चर्याची गोष्ट होय.

हरएक प्रकारचें साहस[1] करीत; आणि राहिले माहिलेले व्याजेबट्टयानें पुष्कळच व्यापार चालवीत.

देशसंरक्षणाची योजना.

याप्रमाणें, आमच्या आर्यपूर्वजांची उद्यमानिमित्त व्यवसाय करण्याची स्वभावतःच प्रवृत्ति असल्यामुळें, कारणपरत्वें देशान्तरी गेल्यावर स्वदेशाचें संरक्षण होऊन, आपल्या मुलखांत शान्तता राहवी एतदर्थ, आणि आपली सर्वत्र इभ्रत राहून आपला चोहोंकडे दरारा बसावा म्हणून, ते सदैव जागृत असत. इतकेंच नव्हे तर, आपल्या अती अवडत्या व परमपूज्य आर्यदेशाला ( म्हणजे भरतखंडास ) अपयशाचा डाग कोणत्याही प्रकारें लागूं नये यासाठीं, ते आपल्या वीर्यवान पुत्रांस स्वदेश परिपालनार्थ नेहेमींच तयार ठेवीत.

अशाप्रकारें, स्वदेश संगोपनार्थ, आमच्या आर्य पूर्वजांनीं विद्वान, शूर, आणि बलाढ्य पुत्राचें मागणें, आपल्या प्रिय देवतांजवळ वारंवार केलेलें असल्याचें, ठायीं ठायीं दृष्टिगोचर[3] होतें.

---

१ तंगूर्तयोनेमन्निषःपरीणसःसमुद्रंनसंचरणेसनिष्यवः। ८

( ऋ. अ. १ अ. ४ व २१ मं. १ अ. १ सू. ५६ )

२ आनोभरप्रमगन्दस्यवेदो * * * ॥ १४ ॥

( ऋ. अ. ३ अ. ३ व. २१ मं. ३ अ. ४ सू. ५३ )

३ अस्मिन्निन्द्र वृजने सर्ववीराः स्मत्सूरिभिस्तव शर्मन्स्याम ॥ १५ ॥ १८ ॥

( ऋ. अ १. अ ४. व ११. मं १. अ १. सू. ५१ )

( पढें चालू )

अशा तऱ्हेनें, केवळ आपल्या पराक्रमानेंच सर्व कांहीं करण्याची आमच्या पूर्वजांस मोठी हौस असल्यामुळें, स्वकष्टार्जितावर त्याचें मोठें प्रेम असे; व आपल्या निढळ घामानेंच यच्चावत् पदार्थ मिळविण्याची त्यांस हमेश उमेद राही. इतकेंच नव्हे तर, कर्जांत राहण्याचा, किंवा ऋण काढून सण करण्याचा, त्यांजला अत्यन्त तिरस्कार वाटे; आणि आयत्या पिठावर रेघा ओढण्याचा, अथवा बिळावरील नागोबा होऊन बसण्याचाही त्यांजला फारच कंटाळा येई.

स्वकष्टार्जिताची हौस, व परावलंबनाचा कंटाळा.

**परऋणा सावीरध मत्कृतानि माहं राजन्नन्यकृतेन भोजम् ॥ ९ ॥**

( ऋ. अ२. अ७. व १०. मं. २. अ३. सू २८. )

**भावार्थः**—हे वरुणा, मजला ऋणापासून मुक्त कर; आणि पराजित वस्तूवर किंवा द्रव्यावर मी कधीं देखील अवलंबून राहू नये, असें मला सामर्थ्य दे.

---

( मागील पृष्ठावरून पुढें चालू )

**त्वा तो पाम त्वया सुवीरा द्राघीय आयुः प्रतरं दधानाः ॥ ११ ॥ १६ ॥**

( ऋ. अ १. अ ४. व १६. मं १. अ १. सू. ५३ )

* * **बृहद्वदेम विदथे सुवीराः ॥ १७ ॥ ८ ॥**

( ऋ. अ २. अ ७. व ८. मं २. अ ३ सू. २७–२१८ )

**यथा रयिं सर्ववीरं नशामहा अपत्यसाचं श्रुत्यं दिवे दिवे ॥ ११ ॥ १३ ॥**

( ऋ. अ २. अ ७. व १४. मं २. अ ३. सू. ३१–२२२ )

असो. वेदकालांत वर्णाश्रमधर्माची प्रवृत्ति अगदीं जारीनें अमलांत असल्याचें दिसतें. मात्र, जातीभेदाच्या संबंधानें त्यावेळच्या आणि सांप्रतच्या स्थितींत भेद ह्मणून इतकाच कीं, वेदकालीं, प्रत्येक मनुष्याचें ज्ञान, त्याचें तपोबल, त्याचें शिक्षण, त्याचें आचरण, व त्याचें कर्म, इत्यादि गोष्टींस अनुलक्षून, जो ज्या योग्यतेचा असे, त्यामानानें तो ज्या त्या वर्गांत शिरे. ह्मणजे अर्थात्, कोणी मोठी तपश्चर्या करून ब्रह्मज्ञान संपादन केलें असल्यास, त्याची गणना ब्राह्मणांत होई. कोणी शूर आणि पराक्रमी असल्यास, तो क्षत्रियांत मोडे. व्यापार, धंदा, सावकारी, किंवा वाणिज्य, यांत कोणाची प्रवीणता दिसून आल्यास, त्यांस वैश्य समजत. आणि सेवाधर्मांतच कोणाची कुशलता वाटल्यास, तो शूद्र वर्गांत गणलाजाई. इतकेंच नव्हे तर, ह्या सर्व वर्णांत त्यावेळीं परस्पर रोटी आणि बेटीव्यवहार होत असे. परंतु, हल्लींची वस्तुस्थिति तशी नसून, ज्या कुळांत जो जन्मला, त्या कुळाच्या वर्णांतला अगर जातींतलाच तो समजण्यांत येतो; व त्यांत फेरबदल ह्मणून कोणत्याही कारणानें होतच नाहीं. शिवाय, सांप्रतकाळीं, ह्या वर्णांत परस्पर रोटीव्यवहार अथवा बेटीव्यवहार देखील होत नाहीं. व तो होणेंही शक्य दिसत नाहीं.

वर्णाश्रम धर्माची वेदकालीं प्रवृत्ति, व त्यामुळें झालेला श्रमविभाग.

वेदकालीं चातुर्वर्ण्य असल्याचें खालीं नमूद केलेल्या ऋग्वेदांतील ऋचावरून वाचकाच्या सहजीं लक्षांत येईल.

**ब्राह्मणास्य मुखमासीद् बाहुरा जन्यकृतः ।**

**उरु तदस्य यद्वैश्यः पद्भ्यां शुद्रोऽजायत ॥**

( ऋ. अ. ८. मं. १० अ. ७. )

ह्याखेरीज, **अदिति पंचजनाः ।** ( अदिती हेच पंचजन होत ); **यद् ब्रह्मणि राजनित्रा यजते ।** ( ब्राह्मणाकडे किंवा राजाकडे असला तरी तिकडून येऊन हा सिद्ध झालेला सोमरस प्या ); इत्यादि, वर्णसंस्था व्यक्त करणारीं अनेक प्रमाणें आढळून येतात. तथापि, तद्विषयक तपशीलवार हकीकत यापूर्वींच साद्यन्त देण्यांत आली असल्यामुळें, आतां त्यासंबंधानें ज्यास्त ऊहापोह करण्याचें प्रयोजन दिसत नाहीं.

वेदकाळीं विवाहपद्धति व कन्यादान चांगलें प्रचारांत असून, त्यावेळीं आमच्या भारतीय स्त्रियांकडे प्रपंचाचें धुरीणत्व असल्याचें विशेष रीतीनें व्यक्त होतें.

वेदकाळांत विवाहपद्धतीचा प्रचार, व पत्नीसुख.

---

१ भारतीय साम्राज्य. पूर्वार्ध. पु. ३ रें. पान ३९ ते ४३ पहा.

२ भारतीय साम्राज्य. उत्तरार्ध. पु. ७वें. पान ५७ ते ६५ पहा.

३ भारतीय साम्राज्य. उत्तरार्ध. पु. ८ वें. पान २५० ते २५९ पहा.

४ **शासद्वन्हिर्दु हितुर्नप्त्यंगाद्विद्वाँ ऋतस्य दीधितिं सपर्यन् । पितायत्र दुहितुः सेकमृंजन्त्सं शग्म्येन मनसा दधन्वे ॥ १ ॥**

( ऋ अ ३. अ २. व ५ मं ३ अ ३. सू. ३१ )

**भावार्थः**—ज्या पित्याला कन्या असून पुत्र नाहीं, तो आपल्या कन्येचें कन्यादान करून, आपल्या ज्यामाताकडून तिच्या ठिकाणीं पुत्रसंतान झाल्यावर, आपल्या नातवाकडन आपल्याला पिंडदान

कारण, आमचे पूर्वज तिला ऐहिक व पारमार्थिक सुखाचें केवळ निवासस्थानच समजत; आणि ती मंगलकारिणी, घराचा खांब, संसाराचें चक्र, व आनंदाचें केवळ माहेरघरच आहे, असे ते तिला मानीत.

ह्यावरून, स्त्रीजनांविषयींचें आमचें अपूर्व वात्सल्य ध्यानांत येतें. संतानशिक्षणसंबंधीं आपापल्या इतिकर्तव्यतेळा

---

१ जाये दस्तं मघवन्त्सेदु योनिस्तादित्वा युक्ता हरयो वहन्तु ॥ ४ ॥

( ऋ. अ ३. अ ३. व १९. मं ३. अ ४. सू. ५३ ).

**भावार्थ** :—हे मघवान्, जाया हेंच घर होय, व ती पतीचें केवळ निवासस्थानच आहे. यासाठीं, तुझ्या रथास जोडलेले पिवळे घोडे तुला तेथें नेओत. आणि आह्मी जेव्हां जेव्हां सोमरस काढूं, तेव्हां तेव्हां, अमी हा तुजकडे धांवत येवो.

कल्याणीजायासुरणंगृहेते ॥ ६ ॥

( ऋ. अ.३ अ. ३. व २० मं. ३. अ. ४ सू. ५३ )

**भावार्थ** :—हे इन्द्रा, तुझ्या घरीं मंगलकारिणी स्त्री असल्यामुळें आनंद आहे

२ ही गोष्ट पाश्चात्यांस सुद्धां कबूल करावी लागते. मॉक्डोनल्ड् म्हणतो, " She ( the wife ) occupied a position of greater honour in the age of Rig-Veda. "

( Sanskrit Literature. 1899. P. 162 ).

३ कारण, ऋक्कालीन आमचीं आर्य मातापितरें स्वतःच विशेष व्यासंगी असल्यामुळें, तीं आपल्या संततीस देखील त्याच प्रकारचें उत्तम शिक्षण लावीत; व ही गोष्ट वेबरसारख्या अति तीक्ष्ण गुणदोष विवेचकास सुद्धां कबूल करणें भाग पडतें. तो असें लिहितो कीं,

( पुढें चालू )

त्यामुळें उद्भवलेलें स्त्रीवात्सल्य, संतानशिक्षणाची इतिकर्तव्यता, व नीतीचें उच्च प्रमाण.

देखील त्या जागरूक असल्याचें भासतें आणि आमच्या नीतीचें प्रमाण. अगदीं उच्च कोटींतलें असल्याचें व्यक्त होतें.[1]

तत्कालीन समाजस्थिति.

तत्कालीन समाजांत पिता हा मुख्य असून, त्यालाच गृहपति समजतात. तथापि, पत्नीचा त्याच्याही पेक्षां मोठा मान आणि विशेष आदर असे; व तिला त्याचकारणानें गृहपत्नी ह्मणत. अर्थात् त्यायोगानें, तिचें तेज सर्वांवर पडे; तिची सर्वांवर नजर राही; आणि तिच्याच आज्ञेंत सर्वजण वागत.

तत्कालीन परिधान

त्यावेळचा पोषाक हल्लीं प्रमाणेंच असे; व सांप्रत काळीं ज्याप्रमाणें आम्ही धोतरें नेसतो, आणि पांघरतो; आणि

---

( मागील पृष्ठावरून पुढें चालू )

"We must, at any rate, assume among the Brahmans of this period, a very stirring intellectual life, in which even the women took an active part, and which accounts still further for the superiority maintained and exercised by the Brahmans over the rest of the people. Nor did the military caste (क्षत्रियवर्ग) hold aloof from these inquiries, especially after they had succeeded in securing a time of repose from external warfare." ( Weber's History of Sanskrit Literature. 1882. P. P. 21-22 ).

[1] ह्यासंबंधानें पाश्चात्यांसही मान डोलवावी लागते. मॅकडोनल्ड् म्हणतो, "The standard of morality was comparatively high." ( Sanskrit Literature, P. 163 ).

आमच्या बायका लुगडीं नेसतात, व चोळया घालतात; त्याचप्रमाणें वेदकाळांत देखील स्थिति होती. लोंकरीचे कपडे वापरण्याचाही प्रचार असे. जरीचे कपडे, आणि सोनेरी कलाबतुचीं उंचीं वस्त्रें, यांचा उपयोग करण्यांत येई. *केशकलाप तेल लाऊन विंचरण्याचा प्रघात असे. पुरुष वर्ग क्वचित् मस्तकावरील व दाढीचे केंस राखीत; आणि क्वचित् कोणी काढीत. हार, तुरे, गजरे, व सुगंधी पुष्पें, यांचा उपभोग घेण्याची चाल असे.

खानपान.

आमचे खाण्याचे पदार्थ म्हटले म्हणजे, दूध, तूप, दहीं, तांदूळ, गहूं, जव, कणीक, लाह्या, भाजीपाला, फळफळावळ, आणि कारणपरत्वें, अथवा सणावारीं, पै पाहुणा आल्यावेळीं, व हवनांत मात्र, मांस इत्यादि असे. सोमरसाचा विशेष उपयोग करण्यांत येई. परंतु, सुरा अगदीं निषिद्धच मानली जात असे.

वेदकालीन व्यवसाय.

वेदकाळीं, आमचे आर्यपूर्वज हरएक प्रकारचा धंदा करीत. सबब, त्यापैकीं मुख्य मुख्य व्यवसायांचा तपशील येथें देतों.

**१ विद्यार्जन. २ शास्त्राध्ययन. ३ विज्ञानान्वेषण. ४ कलापरिशीलन. ५ व्यावहारिक शिक्षण. आणि ६ आत्मनिरूपण.**

विद्यार्जन, शास्त्राध्ययन, व सूक्ष्मान्वेषण.

आमच्या आर्यपूर्वजांत विद्यार्जनाची स्वभावतःच विलक्षण अभिरुचि असे. त्यामुळें, विद्यासंपादन करण्याकडे ते आपला बहुतेक काळ घालवीत. ज्यांना

ज्यास्त सवड मिळे, ते शास्त्राध्ययन करीत. जे ह्यांत देखील पारंगत होत, ते महत्वाचे शोध लावण्याकडे आपलें लक्ष्य पुरवीत. कोणी नक्षत्रांचें अवलोकन करून, ज्योतिःशास्त्रांचा[1] पाया घालण्याचें साहस करी; आणि कोणी औषधींचे शोध लावून वैद्यक[2] रची. शिवाय, आमच्या यज्ञयागांत पशूंचें हवन होई; व त्यांच्या शरीरांतला निरनिराळा भाग पृथक् पृथक् देवतांस अर्पण करण्याचा असे. त्यायोगानें, विच्छेदविद्येचें ज्ञान[3] आम्हांला सहजीं प्राप्त झालें. त्याचप्रमाणें, सोमलता उपलब्ध होण्यासाठीं, आम्ही हिमालयासारख्या अत्युच्च पर्वतावर चढत असूं, आणि नानाविध वनौषधी आमच्या पाहण्यांत येत. त्याकारणानें, आम्हांला अमूल्य औषधी माहित झाल्या; व आम्ही वैद्यशास्त्र[4] तयार केलें. कोणी आपला वेळ भाषेचें अध्य-

१ आम्हांला प्रथमपासूनच ज्योतिषाची गोडी होती, ही गोष्ट पाश्चात्यास सुद्धां कबूल आहे: वेबर म्हणतो,
" I have lastly to call attention to two other branches of Science which * * * must yet have enjoyed considerable cultivation—I mean Astronomy and Medicine. ( Weber's H. S. L. P. 29 ).

२ वैद्यक आणि विच्छेदविद्या, हीं देखील ऋग्वेदकालीनचीं आमचीं बाल्यावस्थेंतील शास्त्रें होत.

३ ही गोष्ट वेबरसारखे पाश्चात्य सुद्धां कबूल करतात तो म्हणतो,
" Animal Anatomy was evidently thoroughly uuderstood as each separate part had it own distinctive name " ( Weber. H. S, L. P. 30 )

४ आमच्या वैद्यकाविषयीं ग्रीक लोकांस देखील परम आश्चर्य वाटे.

( पुढें चालू )

यन आणि परिशीलन करण्यांत घालवी. म्हणजे ऋग्वेद मंत्राचें पाठान्तर कोठें आढळून आल्यास, त्याजवर लक्ष्य पुरवी; आणि मूळसंहिता बरोबर आहे कीं नाहीं, याविषयीं खबरदारी ठेवी. कोणी छन्दांचेंच अध्ययन करी, व त्यांचें नियमन होण्याची काळजी घेई. त्यायोगानें, आर्य ( संस्कृत ) भाषेचें पाऊल पुढें पडून, तद्विषयक सखोलान्वेषण होण्यास महत्वाचें साहाय्य झालें.

कलापरिशीलन.

असो. कोणी गायनपद्धतीनें वेदमंत्र म्हणून गायनकलेचें बीजांकुर रोंवण्याचा प्रयत्न करी. गानासमवेतच तालसुर धर

( मागील पृष्ठावरून पुढें चालू. )

"Alexander's Companians too, extol the Indian physicians, especially for their Snakebites."

( H. S. L. P. 30 ).

१ ही गोष्ट पाश्चात्यास देखील कबूल करावी लागते वेबर म्हणतो,

"The advance made by linguistic rssearch, during this epoch, was very considerable," "For the knowledge of metre also rich materials have been handed down to us in the Sutras,

( H. S. L. P.P. 22-23 )

२ गायनकला व ततवाद्य, हीं सर्व वेदकालीन असल्यामुळें, अगदीं प्राचीन होत; आणि ही गोष्ट पाश्चात्यासही कबूल आहे. वेबरनें एके ठिकाणीं असें लिहिलें आहे कीं,

"Music was from the very earliest times, a favourite pursuit of the Hindus, as we may gather from the numerous allusions to musical instruments in the Vedic literature. ( H. S. L. P. 271 ).

ण्याच्या हेतूनें, कोणी वीणा, टाळ, मृदंग, वगैरे वाद्यें बनवी. कोणी लेखनकलेंत अभिनिवेश करी. आणि कोणी युद्ध प्रसंगाचेंच योग्य परिशिलन चालवी.

दिनचर्येचे धंदे व आत्मनिरूपण

कोणी आपल्या दिनचर्येच्या व्यवहारास अनुसरून, नागरकी करी. कोणी तांब्याचीं भांडीं घडवी. कोणी चिमार्डी होई. कोणी सुतारकाम करी. कोणी सोनारकाम, कोणी कोष्टी काम, आणि कोणी शिवण काम, इत्यादिकरून आपलें संसारचक्र चालवी. आणि कोणी आत्मज्ञाननिरूपणांतच आपली कालक्रमणा करी.

१ आमच्या वेदरत्नोदधींतील अक्षर, ग्रंथ, सूत्र; इत्यादि शब्द लेखनकलेचेच द्योतक होत. आमची लेखनकला प्राचीनतम असून, त्यासंबंधानें आम्ही कोणाचेच ऋणी नसल्याबद्दल, आम्ही पूर्वीच सांगितलें आहे. (भा सा. पु. ४ भा. ३१. भाषाशास्त्र भा ७ वा.)

२ ह्यांत राजा व प्रजा, पुरुष आणि स्त्रिया, अशीं सर्व आपापल्या योग्यतेनुरूप मन घालीत. सबब, त्याविषयीं वेबर सारख्यालाही मोठें कौतुक वाटतें. तो म्हणतो,

" We have here a faithful copy of the Scholastic period of the Middle Ages; Sovereigns whose courts form the centres of intellectual life: Brahmans who with lively emulation carry on their enquiries into the highest questions, the human mind can propound; women who with enthusiastic ardour plunge into the mysteries of speculation impressing and astonishing men by the depth and loftiness of their opinions, and who—* * solve the questions proposed to them on sacred subjects."

( H. S. L. P. 22 )

अन्य मनोरंजन.

तथापि, कित्येक आपला वेळ अश्वरथादि शर्यतींत, किंवा द्यूतक्रियेंत, अगर नृत्य करण्यांत, अथवा मृगयेंत, तिरदाजींत, व होडींत बसून जलमार्गानें सहल करण्यांत घालवीत.

त्या वेळच्या प्रजेची सदृढता व दीर्घायुषत्व.

तत्कालीन प्रजा फार सदृढ व निरोगी असल्याचें देखील अन्तःप्रमाणांवरून दिसतें. ती विशेष मेहेनती होती, व आळशीपणाचें तर तिच्यांत वारें देखील नसे. त्यामुळें, ती कंटक, साहसी, व बुद्धिमान असे. तसेंच, ती योग्य परिश्रम करून व्यवस्थितपणें वागे, आणि नियमित रीतीनें वर्ते; म्हणून ती दीर्घायुषीही होती. कारण, त्या वेळची आयुर्मर्यादा शंभर वर्षांची असावी, असें ऋग्वेदांतील ऋचांवरून चांगलें व्यक्त होतें.

**शतमिन्नुशरदो अन्तिदेवा यत्रानश्चक्रा जरसं तनूनाम् । पुत्रासो यत्र पितरो भवन्ति मानो मध्या रीरिषतायुर्गन्तोः ॥ ९ ॥**

(ऋ. अ. १. अ. ६. व १६. मं. १. अ. १४ सू. ८९).

**भावार्थः**—अहो देवहो, आमच्या आयुष्याची मर्यादा तुम्ही शंभर वर्षेंच केली असून, तिच्या शेवटीं आम्हाला वार्धक्य येतें, व आमच्या पुत्रांस पितृपद प्राप्त होतें ( म्हणजे आमचे मुलगे बाप होतात ). यासाठीं, हा आमचा आयुष्यक्रम तुम्ही मध्येंच खुंटवूं नका.

ह्याशिवाय, शतंहिमा, शतंशरदः, असेही पाठ ऋग्वेदांत ठिकठिकाणीं दृष्टीस पडतात.

असो. इतकें दीर्घ आयुष्य मागून, आमच्या आर्यपूर्वजांनीं त्याचा सुविनियोग केला; आणि परोपकाराय सतांविभूतय: या साधूक्तीची जणूकाय सार्थकताच करून दाखविली; ही एक निःसंशय मोठ्या आनंदाची गोष्ट होय. कारण, योग्य त्यावेळीं होमहवन करण्यासाठीं, त्यांनीं काळजीपूर्वक नक्षत्रावलोकन केलें, व ज्योतिःशास्त्राचा प्रथम पाया रचला. विद्याभिवृद्धीनें ज्ञानाचा संचय करून त्यांनीं ऋग्वेद ऋचा गाइल्या, आणि अखिल भूतलावरील आदिकवी[१] बनले. श्रमविभागासाठीं चातुर्वर्ण्याची योजना करून, वर्णसंस्था अमलांत आणिली. आश्चर्य करण्यासारखें सूक्ष्मान्वेषण करून, त्यांनीं भाषाशास्त्राचे[२] बीजारोपण केलें. ह्या व दुसऱ्या शास्त्रांसमवेत,

त्याचा परोपकारार्थ उपयोग.

१ ह्या कविगणांत कित्येक राजे व राण्याही असत. ऋग्वेद १. १८. ६. यांतील सहाव्या ऋचेचा कर्ता भावयव्य नामक राजा असून, सातवीची कर्त्री रोमशा नांवाची त्याची ब्रह्मवादिनी राणी होती. ह्यावरून तत्कालीन विद्याभिरुचि, ज्ञानाची चळवळ, आणि शिक्षणाची आतंता, हीं चांगलीं व्यक्त होतात.

२ **चत्वारिवाक् परिमिता पदानि तानि विदुर्ब्राह्मणाये मनीषिणः। गुहात्रीणि निहिता नेंगयन्ति तुरीयं वाचो मनुष्या वदन्ति ॥ ०५॥**

(अ. २. अ. ३. व २२ मं. १. अ. २२. सू. १६४.)

ह्या ऋचेंत भाषेचे चार प्रकार सांगितले असून, ते वैयाकरणी, याज्ञिक, नैरुक्त, ऐतिहासिक, आत्मवादी, व योगी, यांनीं आपापल्या

( पुढें चालू )

त्यांनीं ललितकलांतही प्रवेश केला; वेदी आणि स्थंडिलें रचतां रचतां त्यांनीं भूमितिशास्त्र उदयास आणिलें; व औषधिविद्या, गायनशास्त्र, आणि सप्तस्वरही शोधून काढिले. कर्म, उपासना, व ज्ञान, इत्यादि साधनांनीं मानसिक उन्नति मिळवून, त्यांनीं आपलें श्रेष्ठत्व स्थापित केलें. सोलीव ज्ञानाच्या अत्युच्च शिखरास पोहोंचून, त्यांनीं उपनिषदें रचलीं, व आपल्या शिर:कमलांतील दिव्य आणि अपूर्व भांडार जगाच्या कल्याणार्थ खुलें केलें.

उपनिषदें व त्यांचें महत्व.

हीं आमचीं अपूर्व उपनिषदें मिष्टामृतानें इतकीं कांहीं थबथबलेलीं आहेत कीं, त्यांच्याविषयीं जितकें लिहावें तितकें थोडेंच. फार तर काय मागावें,

( मागील पृष्ठावरून पुढें चालू. )
मताप्रमाणें भिन्नभिन्न रीतीनें सांगितले आहेत. ओम्, भूः, भुवः स्वः, अशीं वाचेचीं चार रूपें वेदवादी मानतात. नाम, क्रिया, उपसर्ग, व निपात, अशीं वैयाकरणी समजतात. मंत्र, कल्प, ब्राह्मण, व लौकिकी, अशीं नैरुक्त कल्पितात. सर्प, पक्षी, सरीसृप, व मनुष्य, यांच्या चार भिन्न भाषा आहेत, असें ऐतिहासिक मानतात. पशु, तृणव, मृग, व मनुष्य, यांच्या चार भाषा असल्याचें आत्मवादी समजतात. आणि परा, पश्यन्ती, मध्यमा, व वैखरी, अशीं भाषेचीं चार रूपें योगी मानतात.

ह्याखेरीज, प्रातिशाख्य म्हणजे वेदाचें व्याकरण तर सुप्रसिद्धच असून, त्यांत भाषाशास्त्राचें अनेक प्रकार येतात.

१ भा. सा. पू. पु ४ पान १०३ ते १३६.

२ सप्तस्वसारो अभिसंनवन्ते यत्रगवां निहिता सप्तनाम ॥ ३ ॥

( ऋ अ २ अ ३ व १४ मं १ अ २२ म १६४ )

पण, तत्संबंधानें पाश्चात्य[1] पंडित व तत्ववेत्ते देखील सकौतुकाश्चर्य माना डोलवितात; आणि तद्रसास्वादानें त्यांजला फार गुदगुल्या झाल्यामुळें, त्यांच्या पोटात प्रेमाच्या मोठ्या उकळ्या फुटून, आनंदभरांत ते केवळ टाळ्यांचा गजरच करितात.

आमच्या आर्यधर्माचें मूळबीज म्हटलें ह्मणजे यज्ञक्रि-

---

१ ह्या उपनिषदांसंबंधानें शोपेनहायरचा अभिप्राय देऊन, मोक्षमूलर असें लिहितो कीं,

"If you think *that* I exaggerate, let me read you in conclusion what one of the greatest philosophical critics—and certainly not a man given to admiring the thoughts of others—says of the Vedanta and more particularly of the Upanishads. Schopenhauer writes:—

'*In the whole world there is no study so beneficial and so elevating as that of the Upanishads.*‡ *It has been the solace of my life—it will be the solace of my death.*'"

( What can India teach us? P. P. 253-54
Sacred Books of the East. vol. I. The
Upanishads, translated by Max
Muller. Introduction. P. LXI. )

सदर्हू अवतरणांतील इतालिक वर्ण आमचे आहेत. ( ग्रंथकर्ता. )

‡ उपनिषदें, वेदान्त, अथवा हिंदूधर्माचें रहस्य, यांविषयीं आम्ही भारतीय साम्राज्याच्या पूर्वार्धांतल्या ४ थ्या पुस्तकांत ( पान ८० ते ६८ वर ), आणि उत्तरार्धांतल्या ७ व्या पुस्तकांत ( पान १ ते १०३ वर ), साधन्त विवेचन केलें आहे.

यज्ञक्रिया.

याच असून, ती गोष्ट अन्तःप्रमाणावरून देखील सिद्ध होतें. कारण, कर्म केल्याशिवाय फलप्राप्ति नाहीं, व ज्ञानही उपलब्ध होत नाहीं, असा सिद्धान्त असल्यामुळें, कर्म करण्याकडे आमची विशेष प्रवृत्ति होती, व ती अजूनसुद्धां आहे, हें विशेष रीतीनें सांगावयास नलगे.

**विनाज्ञानेनाधिकारः कर्मण्येव प्रयुज्यते ।**
**तस्मात्कर्माणि कुर्वीत बुद्धियुक्त नराधिप ॥**

आमच्या पुराण पूर्वजांनीं प्रथमतः यज्ञच केले, आणि ह्या **यज्ञासच** ते **धर्म** समजत. इतकेंच नव्हे तर, त्या अति प्राचीन काळीं, **यज्ञा**शिवाय अन्य धर्म आमच्या पूजनीय **आर्यांनीं** मानला असल्याचें दिसत नाहीं.

तीच आर्यधर्माचें मूलबीज

आम्हां **आर्यांच्या** धर्माचें **मूळ** कोणतें, अथवा **आर्य**धर्माचा बीजांकुर कोठें दृग्गोचर होतो, याविषयीं **ऋग्वेदांत** तर प्रत्यक्षच उल्लेख केलेला असल्याचें आढळतें. कारण, एका ऋचेंत त्यांनीं असें म्हटलें आहे कीं,

**यज्ञेन यज्ञमयजन्त देवास्तानि धर्माणि प्रथमान्यासन् ॥ ५० ॥**

( अ २. अ ३. व २३. मं १. अ २२. सू १६४ ).

व त्यामुळें कर्म, उपासना, व ज्ञान यांची प्राप्ति.

याप्रमाणें, यज्ञाच्यायोगानेंच देवांनीं यज्ञ केला, व **यज्ञ** हाच **पहिला धर्म** होऊन राहिला. फार तर काय सांगावें पण, ह्या **यज्ञविधीनेंच** त्यांच्या मनावर **अनेक**

संस्कार होऊन, त्यांची दिवसानुदिवस उन्नतीच होत गेली. ह्यामुळेंच त्यांची श्रद्धा वाढली, व तेणेंकरूनच त्यांजला ज्ञानमार्गाची प्राप्तीही झाली. कारण, प्रथमतः, ह्या यज्ञ-विधीनेंच कर्ममार्ग साफ केला जाऊन, आर्यांच्या हृदयांत हळू हळू श्रद्धा वाढत चालली; आणि ह्या श्रद्धेच्या योगानेंच शनैः शनैः उपासनेचा अंकुर फुटून, याचाच काल-वशात् प्रचंड ज्ञानवृक्ष बनला.

पंचमहाभूतें, व त्यांचा आर्य हृत्पटिकेवर झालेला परिणाम.

पण, ह्या समवेतच, आमच्या आर्यपूर्वजांवर ह्या प्रचंड पंचमहाभूतांचाही विलक्षण संस्कार झाला असावा, असें वाटतें. कारण, ही विशाल सिंधु नदी व अत्युच्च हिमनग, हा दिव्य तेजोराशी व विस्तीर्ण नभोमंडल, तो पवनसंचार व विश्वस्वरूपाचें तें अपूर्व ऐश्वर्य-इत्यादि पाहून, त्यांजला ईशप्रभावचमत्कृति सहजीं भासमान होऊं लागली; आणि त्यामुळेंच, भूदेवता, आकाश, देवता, व स्वर्देवता, या सर्वांची ते पूजा करूं लागले. इतकेंच नव्हे तर, कोणाची पूजा करावी आणि कोणाची करूं नये, यांविषयीं देखील त्यांस कालान्तरानें शंका येऊन,

कस्मै देवाय हविषा विधेम ॥

( ऋ. अ७. व१. मं१०. अ१०. सू १२१ ).

या विचारांत ते आपोआपच गुंग झाले.

तथापि, ह्या सर्व वस्तूंचें व अखिल विराट स्वरूपाचें

अनेक देवांपासून झालेलें एकेश्वरत्व.

कांहीं तरी अदृश्य व अतर्क्य असें एकच आदिकारण असून, तेंच सर्व विश्वाचें चालक व नियामक असल्याविषयीं, आमच्या आर्य पूर्वजांची बालंबाल खात्री झाली होती, यांत तिळमात्र देखील शंका नाहीं.

इनो विश्वस्य भुवनस्य गोपा समा धीरः पाकमत्राविवेश ॥ २१ ॥

( ऋ. अ. २ अ. ३. व १८. मं. १. अ२२. सू.१६४ ).

**भावार्थ**—जो ह्या अखिल जगाचा पालक आहे, तोच माझ्यांत वास करून राहिला आहे.

असो. पुनर्जन्माविषयीं[१][२] हल्लीं प्रमाणेंच वेदकालीं देखील

पुनर्जन्माविषयीं आमची तत्कालीन कल्पना.

आमची श्रद्धा असे; आणि म्हणूनच, पापाची भीति बाळगून, पापापासून मुक्त होण्यासाठीं, आमचे पूर्वज देवादिकांची प्रार्थना करीत[३].

---

१ एतद्विषयक तपशीलवार विवेचन भा. सा. पूर्वार्ध, पान २१ ते २८, पु. दुसरें; व भा. सा. उत्तरार्ध, पान १ ते ६, ४८ ते ५५, ६४ ते १०१, पु. ७ वें; यांत केलेलें असल्याकारणानें, येथें पुनरुक्ति करण्याचें प्रयोजन नाहीं.

२ **सम्प्रतुर्योना परिवीतो अन्तर्बहु प्रजा निर्ऋतिमा विवेष ॥ ३२ ॥**

( ऋ. अ. २. अ. ३. व २०- मं. १. अ. २२. सू. १६४ ).

३ भा. सा. पू. पु. २ रें. पान ३३।३४ पहा.

आतां, फक्त और्ध्वदैहिक क्रियेच्या संबंधानेंच दोन शब्द सांगून, हा भाग पुरा करितो.

और्ध्वदैहिक क्रिया, व तिचा त्या वेळचा प्रकार.

वैदिककालांत, देहावसान झाल्यावर त्याची शेवटली व्यवस्था निरयन क्रियेनें किंवा दहनक्रियेनें[१] होत असे. म्हणजे, ही देहाची मृत्तिका पुरून टाकीत, किंवा ती जाळून भस्मसात् करीत. मात्र, आमची जी पारसीक शाखा इराणांत होती, तींत अग्नि हा फारच पवित्र मानला असल्याकारणानें, गतजीवित देहाचा विटाळ त्याला होऊं नये एतदर्थ, ते नियमित अशा उघड्या प्रदेशावर प्रेतें ठेवीत. सांप्रतकाळीं देखील तोच क्रम सुरू असून, ह्या तमाम मृत्तिकेची व्यवस्था गृध्रादि पक्षी लावितात, हें विशेष रीतीनें सांगावयास नको.

---

१ आमच्या लोकांत प्रेतें दहन करण्याची जी चाल आहे, ती किती सयुक्तिक आहे, व तिचा प्रचार पाश्चात्य देशांत किती झपाट्यानें होत आहे, याबद्दलचें दिग्दर्शन भारतीय साम्राज्याच्या दुसऱ्या पुस्तकांत, पान ३६ ते ६८ वर केलें आहे.

# भाग ६५ वा.

## लौकिकग्रंथसंपत्ति.

## काव्यें, नाटकें, कल्पितकथा, व कादंबरी.

काव्यें, नाटकें, व शास्त्र आणि कलाविषयक ग्रंथ.

वेद आणि वेदांगांनन्तर, संस्कृत वाङ्मयाचा महत्वाचा भाग म्हटला ह्मणजे लौकिकग्रंथसंपत्ति असून, त्यांत काव्यें, नाटकें, कल्पितकथा, अनेक शास्त्रें, व नानाविध कला, इत्यादि विषयक ग्रंथाचा समावेश होतो. सबब, त्याचें आतां क्रमशः विवेचन करूं.

## रामायण.

रामायण.

काव्यांत, रामायण आणि महाभारत ह्यांची गणना हिंदुराष्ट्राच्या, किंबहुना ह्या भूतलावरील सर्व राष्ट्रांच्या महाकाव्यांत अग्रभागीं असून, तीं निःसंशय सर्वमान्य आहेत.

त्याचें पौराणत्व,

ह्या दोहोंत रामायण हें जास्त पुरातन आहे; कारण, महाभारतांत रामाच्या अद्भूत पराक्रमाचा आणि त्याच्या विलक्षण शौर्याचा उल्लेख केला असल्याचें दिसून येतें. परंतु, पांडवादि सुप्रसिद्ध व शूर पुरुषांचा नामनिर्देश रामायणांत कोठेंही आढळून येत नाहीं.

व लोकप्रियता.

आतां, रामायण हें महाकाव्य जितकें पुरातन आहे, तितकेंच तें लोकप्रियही आहे. त्याचें संविधानक बहुतेक सर्व हिंदूस आणि त्यांच्या लहान मुलांबाळास देखील माहीत आहे. इतकेंच नाहीं तर, तें हिंदुराष्ट्राच्या हृत्पटिकेवर जणूकाय आजन्मतःच खिळल्या सारखें झालें आहे. हिमालयापासून तों तहत कन्याकुमारिकेपर्यंत, व पश्चिमेकडील सिंधुनदीपासून तों थेट पूर्वेकडील ब्रह्मपुत्रानदीपर्यंत, रामचन्द्राचा पराक्रम आणि त्याचें एकपत्नीव्रत, सीतेचे पातिव्रत्य व अनुपम पतिप्रेम, लक्ष्मणाची एकनिष्ठा आणि बंधुप्रीति, व रावणाचे प्राबल्य आणि दुष्टबुद्धि, हीं आबालवृद्धांस माहीत आहेत. आणि म्हणूनच, ते रामायणाचें मोठ्या आदरानें व प्रेमपूर्वक अहोरात्र पारायण करितात.

तद्विषयक पाश्चात्य पवित्र ग्रंथाशीं तुलना.

फार तर काय सांगावें, पण, आमच्या भरतखंडांतील केवळ सामान्य जनांचें व अगदीं नीच प्रतीच्या भारतीयांचें देखील रामायण आणि महाभारतावर इतकें कांहीं निःसीम प्रेम आहे कीं, ख्रिस्ती धर्माची बढाई व फुशारकी मारणारांचें, अथवा खुद्द उच्च वर्गांतल्या ख्रिस्ती लोकांचें सुद्धां, त्याच्या शतांशानेंही बायबलावर (म्हणजे स्वतःच्या ख्रिस्ती धर्मपुस्तकावर) नाहीं. मग, उच्च

---

१ या संबंधानें, एक विद्वान शोधक, आणि युरपस्थ पंडित असें म्हणतो कीं, ( पुढें चालू )

वर्गांतल्या सर्व भारतीयांचें त्या काव्यद्वयाविषयीं खरोखर अपूर्व प्रेम असावें, यात नवल तें कोणतें?

रामायणसंबंधीं लोकांच्या पूज्य बुद्धीचें सातत्य.

रामायणाची पवित्रता व तद्विषयक पूज्यबुद्धि, जी आमच्यांत आजमित्तीस सुद्धां इतक्या विलक्षण रीतीनें वास करीत आहे, तीच दोन हजार वर्षांपूर्वींही जागृत होती, असें चांगल्या आधारावरून दिसून येतें. कारण, ह्या संबंधानें कल्हणकृत राजतरंगिणींत एक अशी गोष्ट सांगितली आहे कीं, कांहीं ऋषींनीं राजा दामोदराजवळ अन्नदान मागितलें असतां, तें देण्याचें त्यानें नाकारल्यावरून, त्यांनीं त्यास शाप दिला. परंतु राजानें त्यांस लागलीच संतुष्ट करून, त्यापाशीं उश्शाप मागितला. तेव्हां, ते ऋषिवर्य सुप्रसन्न होऊन बोलले कीं, "हे राजा, रामायणाचें समग्र पारायण तूं एक दिवसांत श्रवण कर, म्हणजे तुझ्या शापाची शान्ति होईल"

**अशेषमर्केनैवान्ह श्रुत्वा रामायणं नव ।**
**शापस्य शान्तिर्भवतीत्यूचिरे ते प्रसादिताः ॥**

ह्यावरून दामोदर राजाच्या कारकीर्दींत, म्हणजे इ. स. पूर्वीं १७९ वर्षें, या महाकाव्याची मान्यता, त्याचा

---

( मागील पृष्ठावरून पुढें चालू. )

" The Râmâyan of Tulsidas is *more popular* and *more honoured* by the people of the North-Western Provinces *than* the Bible by the Corresponding classes in England."

( Griffth. )

सर्वत्र महत्वी, त्याची पवित्रता, आणि त्याचें प्राचीनत्व, इत्यादि संबंधानें तत्कालीन लोकांची देखील किती पूज्य-बुद्धि होती, हें चांगल्या प्रकारें व्यक्त होतें.

रामायणाचा काल.

असो. अशा प्रकारें, हें जें काव्य अखिल राष्ट्राच्या इतक्या आदरास आणि प्रीतीस पात्र झालें आहे, त्याचा काल तरी कोणता असावा, याविषयींचें कुतूहल जागृत होणें अगदीं साहजिक असल्यामुळें, त्या बाबतींत कांहीं आधार मिळाला तर पाहूं.

महाभारतापेक्षां तें पुराणतर असल्याविषयींचें पहिलें कारण.

प्रथमदर्शनीं. एक मुद्द्याची गोष्ट साधारणतः आपल्या लक्षांत येते. ती ही कीं, रामायण महाकाव्य महाभारतापेक्षां पुष्कळच पुराणतर आहे. कारण, एकतर रामायणकाळीं, दक्षिण हिंदुस्थानांतील प्रदेशांशीं बहुतकरून अगदींच कमी दळणवळण असल्यानें, किंबहुना तें मुळींच नसल्यानें, तिकडील भूगोलविषयक माहिती आमच्या ह्या कविज्येष्ठास फारशी असल्याचें दिसत नाहीं.

दुसरें कारण.

दुसरें असें कीं, त्या प्रदेशांतील तत्कालीन लोकस्थिति, विशेष मागासलेली, आणि अगदीं रानटी अवस्थेंतील असल्याचें रामायणावरून भासमान होतें. परंतु, महाभारतकाळीं तसें नसून, ह्या स्थितींत महदन्तर झालेलें दिसतें. कारण, ह्या वेळीं, परस्पर व्यवहार पुष्कळच चालला असल्यामुळें, सामान्य दळणवळण सुद्धां वाढत्या प्रमाणावरच होतें. आणि

त्यायोगानें, ज्ञानाचा विशेष फैलाव होऊन, एकंदर जनसमूह देखील विचारशील व आचारसंपन्न झाल्याचें नजरेस येतें.

ह्यावरून, रामायण हें महाकाव्य महाभारताच्या अगोदरचें आहे, असें मानण्यास बलवत्तर कारण मिळतें.

निर्मे कारण.

शिवाय, कविवर्य कालिदास हा आपल्या रघुवंश नांवाच्या सुप्रसिद्ध महाकाव्यांत, वाल्मीकि हा आदिकवि असल्याचें लिहितो[1]. तेव्हां, ज्या व्युत्पन्न, विचक्षण, आणि मर्मज्ञ कवीस, रामायण व महाभारत अवगत असून, वाल्मीकि आणि व्यासही माहीत होते, त्यानेंच रामायणास आदिकाव्य[2] व वाल्मीकीस आदिकवि[3] म्हणून जी पदवी दिली, ती केवळ निरर्थक किंवा निराधार दिली, असें मानण्यास यत्किंचित देखील कारण नाहीं.

महाभारताचा काल.

आतां, महाभारत युद्धाला चार हजार वर्षांवर होऊन गेलीं असल्याविषयीं, भारतीय-साम्राज्याच्या दुसऱ्या पुस्तकांत

१ रघुवंश. सर्ग १५ वा. श्लोक ३३ व ४१ पहा.

२ सांगंचवेदमध्याप्य किंचिदुत्क्रान्तशैशवौ ।
स्वकृतिं गापयामास कविप्रथमपद्धतिम् ॥ ३३ ॥
(र. वं. सर्ग १५ वा ).

सपृष्टः सर्वतो वार्त्तमाख्यद्राज्ञे न संततिम् ।
प्रत्यर्पयिष्यतः काले कवेराद्यस्यशासनात् ॥ ४१ ॥
(र. वं. सर्ग १५ वा.)

( पान १७१ ते १७३ वर ) दिग्दर्शन केलें असून, सदरहू युद्धाच्या वेळीं किंवा तदनंतर अल्पकालानेंच महाभारत ग्रंथ तयार झाला असावा, असें अनेक कारणांवरून अनुमान होतें. ( मागील पान ६८ पहा ).

रा० रा० शंकर बाळकृष्ण दीक्षित यांनीं आपल्या भारतीय ज्योतिःशास्त्रांत याबद्दलचा पुष्कळच शोध करून, सर्व बाजूंनीं विचार केला आहे. त्यांत ते असें म्हणतात कीं, "पांडवांचा काल शकापूर्वी १५०० पासून ३००० पर्यंत कोणता तरी आहे." आणि ह्यावरून देखील, महाभारताचा वर निर्दिष्ट केलेला काळ बरोबर असल्याचें व्यक्त होतें.

महाभारतांत जो रामायणाचा उल्लेख केला आहे, त्यावरून, हें काव्य त्यावेळीं ही बरेंच प्राचीन झाल्याचें दिसतें. इतकेंच नव्हे तर, हें काव्य लोकमान्य होऊन, त्याची सर्वत्र प्रसिद्धि झाल्याला बरींच शतकें लोटल्यावर, त्यांतील कथाभाग प्रसंगानुसार महाभारतांत आला, यातकांहीं मात्र दखील शंका नाहीं.

तेव्हां, अशा प्रकारची वस्तुस्थिति असल्यामुळें, रामायण आणि महाभारतांतील अन्तर सुमारें एकहजार वर्षांचें तरी असावें असें वाटतें.[१] आणि

सदरहू महाकाव्य द्वयांतील काळाचें अंतर.

तें तसें घतलें ह्मणजे, आज मितीस सुमारें पाचहजार वर्षां-

१ पान १०७ ते १२५ पहा.

वर, अथवा शकापूर्वी अजमासें चारहजार वर्षांवर रामायण रचलें असावें, असें उघड होतें.

अशा प्रकारें हें काव्य इतकें प्राचीन असूनही प्रत्येक पाश्चात्य त्याला अर्वाचीनत्व आणू पाहतात; व त्यांतील संविधानक होमर नामक ग्रीक कवाच्या इ^ .

तद्विषयक कित्येक पाश्चात्यांची क्लिष्ट कल्पना व तिचें खंडण.

---

१ रामायण काव्य महाभारतापेक्षां पुराणतर आहे, ही गोष्ट पुष्कळ पाश्चात्यांसही कबूल आहे इतकेंच नव्हे तर, इलियडांतील संविधानकाशीं रामायणाचा कांहींएक संबंध नसून, त्याचें उच्छिष्ट घेतल्याची कल्पनाही त्यांस मान्य नाहीं. ह्या संबंधानें मॉनियर विल्यम्स म्हणतो.

"The *posteriority* of the Brahmanized Mahabharata may be supported by the more frequent allusions it contains to the progress of Buddhistic opinions, and to intercourse with the Ya..nas or Greeks." * * *

"But I cannot agree (with Pro. Weber) in thinking that the work of Wālmiki is to be referred to as late a date as the beginning of the Christian Era. Nor can I concur in the opinion that the Ramayan is later than, and to a certain extent a copy of the Buddist story of Rama, called Dasaratha Játaka. * * * Still less can I give in my adhesion to the theory that the Hindu Epics (Ramayan and Maha Bharata) took ideas from the Homeric poems or to the suggestion of Talboys Wheeler that the story of Ramayana was

( पुढें चालू. )

यद काव्यांतूनच आमच्या आदिकर्त्रीनें घेतलें असल्याविषयींचा आक्षेप आणितात. परंतु, ते केवळ शुष्क, निर्जीव, आणि निष्कारण असल्याविषयीं, आम्ही मागेंच यथावकाश विवेचन केलें आहे; सबब, तत्संबंधीं आतां पुनश्च चर्वितचर्वण करण्याचें येथें प्रयोजन नाहीं.

रामायणांतील भाषापद्धति, व त्यांतील मुख्य पात्रांचें उदात्त वर्तन.

आतां, रामायणांतील भाषापद्धति, विचारसरणी, पदलालित्य, आणि वर्णनशैली, यांबद्दलचें थोडेसें दिग्दर्शन करूं. ह्यांतील भाषापद्धति सरळ व सुबोध असून, ती प्रसंगानुसार प्रौढ, उदात्त, व ओजस्वी देखील आहे. आणि ह्यांतील पदलालित्य जरी विशेष रमणीय नाहीं, तरी ह्या आदिकवीची कल्पनाशक्ति व विचारगौरव, प्रसाद व गांभीर्य, नैसर्गिक प्रौढी व वर्णनशैली, इत्यादि गुणांनीं तें सर्वांच्या उचित आदरास पात्र झालें आहे.

ह्या महाकाव्यासंबंधीं पाश्चात्य पंडितांचें देखील फारच

---

( मागील पृष्ठावरून पुढें चालू. )

invented to give expression to the hostile feeling and contention between the Brahmans and the Buddhists of Ceylon,—alleged to be represented by the Rakshasas."

( Indian Wisdom. P. 319. 1875. )

भा. सा. पू. पु. २ रें पान १६२–१६६.

१ भा. सा. पूर्वार्ध पु. २ पु. भाग १४ वा. पान १५७ ते १६७ पहा.

अनुकूल मत असून, ते त्याविषयीं मोठ्या गौरवानें वाखाणणी करितात. फार तर काय सांगावें, पण सुविख्यात आणि मर्मज्ञ मिल्मन्, श्लेजेल, विल्सन्, आणि जोन्स्, हे एकापेक्षां एक वरचढपणें ह्या ( रामायण आणि महाभारत ) काव्यद्वयाची मोठी तारीफ करून, त्यांबद्दल पुष्कळच गौरवानें लिहितात. इतकेंच नव्हें तर, ह्या महाकाव्यांतील सरलता व कल्पकता सहजीं व्यक्त होते; त्यांतील प्रौढी, प्रमाद, व करुणारस, हीं पदोपदीं दृष्टीस पडतात; भिन्न भिन्न पात्रांचें औदार्य, चांग्ल रीतभात, आणि पवित्र वर्तन, हीं तेव्हांच नजरेस येतात; व त्यांच्या अक्षय्य कल्पकतेचें भांडार स्वयमेव खुलें झाल्यासारखेंच वाटतें; असें ते म्हणतात.

त्यासंबंधानें पाश्चात्यांचें मत.

ह्यासंबंधानें मॉनियर विल्यम्स् देखील मोठ्या गौरवानें लिहितो. इतकेंच नव्हे तर, रामचन्द्राचें शौर्य, औदार्य, सहनशीलता, व सौजन्य, आणि सीतेची स्वामिभक्ति, पतिप्रेम, पवित्रता, सौकुमार्य, इत्यादि विषयीं, तो आपलें अपूर्व प्रेम, आणि निःसीम आदर व्यक्त करतो.

---

१ " Notwithstanding the wilderness of exaggeration and hyperbole through which the reader of the Indian Epics ( the Ramayana and the Mahabharata ) has occasionally to wander, there are *in the whole range of the world's literature few more charming poems than the* Ramayana. The *classical purity, clearness,* and *simplicity of its style,* the *exquisite touches of true poetic feeling, with which*

शिवाय, फक्त इतिहास दृष्टीनेंच जरी आपण रामायणाचें अवलोकन करूं लागलों, तरी देखील त्यावरून, तत्कालीन सामाजिक स्थितींत, निर्मल आचार व पवित्र विचार ठायीं ठायीं

इतिहास दृष्ट्या रामायणाचें अवलोकन व त्यावरून तत्कालीन नैतिक उन्नति.

---

( मागील पृष्ठावरून पुढें चालू. )

*it abounds, its graphic descriptions* of *heroic* incidents and *nature's grandest scenes,* the *deep acquaintance* it displays with the conflicting workings and *most refined emotions* of the *human heart,* all entitle it to rank among the *most beautiful Compositions* that have appeared *at any period* or *in any country.* It is like specious and delightful garden; here and there allowed to run wild, but *teeming with fruits and flowers, watered by perennial streams,* and even its most tangled thickets *intersected with delightful pathways.* The character of Rama is *nobly* portrayed. It is only too consistently unselfish to be human. * * * *heroic, nobleminded, pious,* and *virtuous man,—a model son, husband, brother,—whose bravery, unselfish generosity, filial obedience, tender attachment to his wife, fraternal affection,* and *freedom from all resentful feelings, we cannot help admiring.* When he falls a victim to the spite of his father's second wife, *he cherishes no sense of wrong.* When the sentence of banishment is pronounced, *not a murmur escapes his lips.* * * * *

As to Sita, she is a *paragon of wife-like virtues,*"

( Indian wisdom. P. P. 365-366 ).

सदरह अवतरणांतील इतालिक वर्ण आमचे आहेत. (ग्रंथकर्ता).

भासमान होतात. सत्यतेची नितान्त लालसा दृष्टीस पडते. सोज्ज्वल नीति व प्रकृतिसौजन्य ह्यांची केवळ मूसच ओतली असल्याचें भासतें. कुटुंबप्रेम व आदरातिथ्य यांचें जणूकाय सर्वांस बाळकडूच पाजल्यासारखें दिसतें. मातृप्रेम व पितृप्रेम हीं जणूकाय प्रत्येक व्यक्तीच्या पिंडांतच खिळल्याप्रमाणें वाटतें. बंधुप्रीति व स्वार्थत्याग ह्यांचे निव्वळ आनुवंशिक संस्कारच झाल्यासारखे सहजीं लक्षांत येतें. पतिपरायणता व एकपत्नीव्रत हीं निःसंशय मूर्तिमंतच आपल्या डोळ्यांसमोर उभीं राहतात. आणि राजनिष्ठा व प्रजावात्सल्य हीं इतस्ततः सर्वत्र दृग्गोचर होतात.

ह्या सर्व गोष्टी वाचकांच्या दृष्टीसमोर साहजिक रीतीनें याव्या, म्हणून सदर्हू महाकाव्यांतील कित्येक मनोवेधक वेचे मी येथें सादर करितों.

पितृभक्ति.

वनवासास जाण्याविषयीं दशरथाची रामास आज्ञा झाल्यावर, राम हा, त्याबद्दलचा यत्किंचित दखील खेद न मानतां, कौसल्येकडे तिचा निरोप घ्यावयास गेला. त्यावेळीं, तिनें त्यास सांगितलें कीं, "हे रामा, तुझ्याखेरीज माझे प्राण राहणार नाहींत. यासाठीं, मीही तुझ्याबरोबर वनांत येते." तेव्हां, तें सर्व शान्तपणें ऐकून घेऊन, राम तिला म्हणाला, "मातुःश्री, येथें वडील ( राजा दशरथ ) हे मद्वियोगानें शोकाकुल होतील; व आणखी तूंहि माझ्याबरोबर आलीस तर, ते देहच सोडतील. सबब, तूं त्यांच्या संन्निध राहून, त्यांचें सान्त्वन कर, आणि त्यांच्या सदैव

शुश्रूषेंत रहा. कारण, पतिसेवा हीच कायती बायकांची इतिकर्तव्यता, व तोच त्यांचा वेदविहित सनातन धर्म होय.

**कथं हि धेनुः स्वं वत्सं गच्छन्त मनु गच्छति।**
**अहं त्वामनुगमिष्यामि यत्र वत्स गमिष्यसि ॥ ९ ॥**
**कैकेय्या वंचितो राजा मयि चारण्यमाश्रिते ।**
**भवत्या च परित्यक्तो न नूनं वर्तयिष्यति ॥ ११ ॥**
**भर्तुः पुनः परित्यागो नृशंसः केवलं स्त्रियाम् ।**
**स भवत्या नकर्तव्यो मनसापि विगर्हितः ॥ १२ ॥**
**यावज्जीवति काकुत्स्थः पिता मे जगतीपतिः ।**
**शुश्रूषा क्रियतां तावत्स हि धर्मः सनातनः ॥ १३ ॥**

( रामायण. अयोध्याकांड. सर्ग २४ वा.)

ह्यावरून, **रामाचें** मोठें मन, त्याचे उदात्त विचार, त्याची शांत प्रकृति, आणि त्याचें पितृवात्सल्य, हीं उत्तम प्रकारें व्यक्त होतात.

पतिप्रेम.

याप्रमाणें, **कौसल्येस** दोन गोष्टी सांगून, **राम** हा **सीते**कडे तिचें अनुमोदन घ्यावयास गेला. त्यावेळीं ती त्याला म्हणाली, "हे प्रियपति रामचन्द्रा, मला तूंच एक दैवत असून, मी सर्वस्वी केवळ तुझ्याच सुखदुःखाची वांटेकरीण आहें. कारण, आम्हा स्त्रीजनांस पतीवांचून गत्यन्तरच नाहीं. यासाठीं, मी तुझ्याबरोबर येऊन तुझी शुश्रूषा करीन; आणि अरण्यांत कंदमूलफलादि जें कांहीं मिळेल तें भक्षण करून, तुझ्याजवळ आनंदानें हजारों वर्षें राहीन. इतकेंच नव्हे तर, मी तुला कोणत्याही प्रकारें कष्टी करणार नाहीं;

व खरोखर, तुझ्यापुढें, मी प्रत्यक्ष स्वर्गसुखाला देखील कःपदार्थच समजतें.

भर्तुर्भाग्यं तु नार्येका प्राप्नोति पुरुषर्षभ ।
अतश्चैवाहमादिष्टा वने वस्तव्यमित्यपि ॥ ५ ॥
न पिता नात्मजो वात्मा न माता न सखीजनः ।
इह प्रेत्य च नारीणां पतिरेको गतिः सदा ॥ ६ ॥
फलमूलाशना नित्यं भविष्यामि न संशयः ।
न ते दुःखं करिष्यामि निवसंती त्वया सदा ॥१६॥
सह त्वया विशालाक्ष रंस्ये परमनन्दिनी ।
एवं वर्षसहस्राणी शतं वापि त्वयासह ॥ २० ॥
व्यतिक्रमं नवेत्स्यामि स्वर्गोऽपि हि न मे मतः ।
स्वर्गेऽपि च विना वासो भविता यदि राघव ॥
त्वया विना नरव्याघ्र नाहं तदपि रोचये ॥ २१ ॥

( अयोध्याकांड. सर्ग २७वा. )

ह्यावरून, सीतेचें रामावरील प्रेम किती निर्मल, पवित्र, व निःसीम होतें, हें कोणाच्याही लक्षांत सहजीं येण्यासारिखें आहे.

याप्रमाणें, सीतेचें आपणावरील खरें प्रेम व निष्कपटभाव पाहून, रामानें तिला आपल्या बरोबर येण्याविषयींची परवानगी दिली; आणि नंतर तो लक्ष्मणाकडे गेला, व तेथें त्याला झालेला वृत्तांत त्यानें कळविला. त्यावेळीं, त्यानें रामास सांगितलें कीं, मजला तुझ्याशिवाय कांहीं देखील प्रिय नस-

भ्रातृवात्सल्य.

त्यामुळें, मी तुझ्याबरोबरच वनांत येईन, व अग्रभागीं राहून तुझें आणि सीतावहिनीचें संरक्षण करीन.

यदि गन्तुं कृताबुद्धिर्वनं मृगगजायुतम् ।
अहं त्वामनुगच्छामि वनमग्रे धनुर्धरः ॥ ३ ॥
न देवलोकाक्रमणं नागरत्वमहं वृणे ।
ऐश्वर्यं चापि लोकानां कामये न त्वया विना ॥ ५ ॥
कुरुष्व मामनुचरं वैधर्म्यं नेह विद्यते ।
कृतार्थोऽहं भविष्यामि तव चार्थप्रकल्प्यते ॥ २५ ॥
भवान्स्तु सहवैदेह्या गिरिसानुषु रंस्यसे ।
अहं सर्वं करिष्यामि जाग्रतः स्वपतश्च ते ॥ २७ ॥

(अयोध्याकांड सर्ग ३१ वा.)

भ्रातृवात्सल्याचा हा खरोखरच अपूर्व मासला असून, तो ह्या भूतलावर निःसंशय विरळाच पहावयास मिळेल !

प्रकृतिसौजन्य, व कुटुंबांतील ऐक्य.

आपल्या मातुःश्रीची आज्ञा घ्यावयास लक्ष्मण हा सुमित्रेकडे गेल्यावर, तिनें त्यास उपदेश केला कीं, " लक्ष्मणा, रामचन्द्राची सर्व प्रकारें काळजी घे, आणि त्याच्याशीं तूं कोणत्याही तऱ्हेनें प्रमाद करूं नकोस. त्याला तूं आपल्या पित्यासमान समज, आणि माझ्या ठिकाणींच सीतेला कल्पून, तिला त्याप्रमाणें मान दे. "

सृष्टस्त्वं वनवासाय स्वनुरक्तः सुहृज्जने ।
रामे प्रमादं मा कार्षीः पुत्र भ्रातरि गच्छति ॥ ५ ॥
व्यसनी वा समृद्धो वा गतिरेष तवानघ ।
एष लोके सतां धर्मो यज्ज्येष्ठवशगो भवेत् ॥ ६ ॥

**इदं हि वृत्तमुचितं कुलस्यास्य सनातनम् ।**
**दानं दीक्षा च यज्ञेषु तनुत्यागो मृधेषु हि ॥ ७ ॥**

( अयोध्याकांड. सर्ग ४० वा. )

ह्यावरून, तत्कालीन प्रकृतिसौजन्य उत्तम प्रकारें दिसून येतें. इतकेंच नव्हे तर, सुमित्रा ही रामाची सापत्न मातुःश्री असतांही, तिनें रामाच्या ठिकाणीं जें प्रेम व्यक्त केलें, त्यावरून त्यावेळची कुटुंबप्रीति, निर्मात्सिर्य, व मनाची सरलता, हीं केवळ मूर्तिमंतच भासमान होतात.

प्रजानिष्ठा.

अशा प्रकारें, रामचन्द्रासारख्या अद्वितीय महात्म्यावर कुटुंबांतील प्रत्येक माणसाचें विलक्षण प्रेम होतें, यांत तर कांहींच नवल नाहीं. पण, तो वनवासार्थ निघाला असतां, त्याच्या भिन्न भिन्न प्रजावर्गांनीं देखील जो आक्रोश केला, व त्याजविषयीं जी सहानुभूति दाखविली, ती गोष्ट मात्र महदाश्चर्य वाटण्यासारखी आहे.

**अकस्मान्नागरः सर्वो जनो दैन्यमुपागतम् ।**
**आहारे वा विहारे वा न कश्चिदकरोन्मनः ॥ १४ ॥**
**शोकपर्यायसंतप्तः सततं दीर्घमुच्छ्वसन् ।**
**अयोध्यायां जनः सर्वश्चुक्रोश जगतीपतिम् ॥ १५ ॥**
**अनर्थिनः सुताः स्त्रीणां भर्तारो भ्रातरस्तथा ।**
**सर्वे सर्वं परित्यज्य राममेवान्वचिन्तयन् ॥ १८ ॥**

( अयोध्याकांड. सर्ग ४१ वा. )

प्रतिज्ञापालन.

कैकयीला दिलेलें वचन पाळण्याबद्दल दशरथानें केलेली प्रतिज्ञा इतकी कठोर व सर्वतऱ्हेनें दुःखदायक असतांही, ती शान्ततेनें ऐकून, पूर्णपणें शेवटास नेण्याविषयीं रामानें व्यक्त केलेला दृढनिश्चय; तसेंच, आपल्या पित्याची वनवासास जाण्याविषयीं झालेली आज्ञा अमलांत आणण्याबद्दल त्याचा कृतसंकल्प; आणि सत्याविषयीं त्यानें अलौकिक प्रेम; हीं पाहून, रामाच्या अपूर्व गुणांचें अवर्णनीय कौतुक वाटून, तत्कालीन नीतिमत्तेचें देखील गौरव केल्यावांचून राहवत नाहीं.

**सोऽहं पितुर्निदेशंतु किमर्थंनानु पालये।**
**सत्यप्रतिश्रवः सत्यं सत्येन समयीकृतम्॥ १६॥**
**नैवलोभान्नमोहाद्वा न चाज्ञानात्तमोन्वितः।**
**सेतुं सत्यस्य भेत्स्यामि गुरोःसत्यप्रतिश्रवः॥ १७॥**

( अयोध्याकांड. सर्ग १०९ ).

वेदकालीन स्थितीशीं रामायणकालीन स्थितीची तुलना.

आतां, रामायणकालीन स्थितीशीं वेदकालीन स्थितीची जर आपण तुलना केली, तर आपणांस असें दिसून येईल कीं, केवळ सामाजिक सुधारणेंतच त्या वेळचें पाऊल पुढें होतें, असें नाहीं. तर विद्याभिनिवेश, शास्त्र व कलाभिवृद्धि, आणि नैतिक उन्नति, यांतसुद्धां त्यावेळीं निःसंशय चांगली प्रगति झाली असल्याचें उघड होतें. लोकांचे आचार व विचार, राज्यपद्धति

आणि समाजरचना, यांत महदन्तर दिसतें. नीतीचें शिक्षण अगदीं उच्च प्रतीचें असल्याचें भासतें. शिल्पकलेचें पाऊल बरेंच पुढें पडलेलें असून, बहुतेक सर्व प्रकारचे धंदे विशेष भरभराटींत होतेसें वाटतें. कारण, जवाहीर, सोनार, सुतार, कासार, तांबट, लोहार, कोष्टी, विणकरी, शस्त्रास्त्र बनविणारे, पुतळे घडविणारे, स्फटिकाचें काम करणारे, कांच बनविणारे, वाद्यें करणारे, हस्तिदंती काम करणारे, चितारी, रंगारी, गंधी, आचारी, इत्यादि नानाविध गुणिजनांचें प्रसंगानुसार वर्णन ह्या महाकाव्यांत आढळून येतें. तसेंच, एकंदर राज्य, त्यांत सामील केलेले अनेक प्रांत, आणि काबीज झालेले मुलुख, यांचेंही योग्य संरक्षण होण्यासाठीं, चांगला बंदोबस्त व उत्तम फौज ठेविली असल्याचें दिसतें. इतकेंच नव्हे तर, तत्कालीन अखिल हिंदू साम्राज्यांत संपूर्ण शान्तता आणि सुरक्षितपणा होता, असें सहजींच अनुमान होतें.

## महाभारत.

महाभारत व त्यांतील कथानक.

रामायणानंतर दुसरें सुप्रसिद्ध महाकाव्य म्हटलें ह्मणजे महाभारत होय. कौरवपांडवांत राज्यविभागासाठीं बेहद्द वैमनस्य माजलें जाऊन, जो रक्तपात झाला, त्याचीच इत्थंभूत हकीकत या सुरस काव्यांत दिली आहे.

त्याचा काल.

ह्या महाभारत युद्धाला सुमारें चारहजार वर्षांवर होऊन गेलीं असल्याचें, एका शिलालेखावरून दिसून येतें. हा लेख

१ वाल्मीकि रामायण. अयोध्याकांड. सर्ग ३६ व ८० पहा.

म्हैसूर परगण्यात इवल्ली येथील देवालयांत सांपडला असून, त्याचा काल शके ५०६ किंवा इ. स. ५८४ आहे; व त्यावरून, शककालाच्या सहाव्या शतकाच्या प्रारंभीं, महाभारत युद्धाला ४२२६ वर्षे, किंवा स्थूल मानानें चार हजार वर्षांवर होऊन गेलीं होतीं; आणि कदाचित् ह्या युद्धाच्या समयीं, अथवा त्या सुमारास, किंवा तदनंतर कांहीं कालानें, महाभारत ग्रंथ तयार झाला असावा, असे अनुमान होतें.

त्याचें प्रमाण.

शिवाय, आश्वलायन गृह्यसूत्रांत महाभारताचा उल्लेख असून, ऐतरेय ब्राह्मणांत देखील त्यांतील कांहीं कथाभागाचा व मुख्य मुख्य पात्रांचा नामनिर्देश केला असल्याचें दिसतें. आतां, सदरहू सूत्रांचा काळ इ. स. पूर्वी १००० वर्षे होय. आणि त्यावरूनही, महाभारताला सुमारें तीन हजार वर्षांवर झालीं असावीत, असें मानण्याला बलवत्तर कारण मिळतें.

ह्याखेरीज, महाभारताविषयीं आम्हा भारतीयांचें अनुपम प्रेम, आमच्या लोकांची तद्विषयक पूज्यबुद्धि, तत्संबंधानें त्यां-

---

१ ह्या संबंधानें डा. भांडारकर ह्मणतात:—

"It thus appears that in the latter part of the sixth Century, the war which forms the theme of the Mahâ Bharata was Considered to have taken place about four thousand years before.

(Aniiquity of Mahabharata. Journal Bombay Branch. R. A. Society).

च्या हृदयांत बिंबलेली दृढतर श्रद्धा, इत्यादि प्रमाणांवरून सुद्धां, त्याचें सदरीं निर्दिष्ट केलेलें पौराणत्व सिद्ध होतें.

त्याच्या कालाविषयीं पाश्चात्यांचें मत.

पाणिनीनें महाभारताचा उल्लेख केला असून, त्यांत युधिष्ठिर, हास्तिनापुर, वासुदेव, अर्जुन, अंधक वृष्णय, द्रोण, इत्यादि नांवें आढळतात. आणि त्यावरून, हें महाकाव्य व त्याचें कथानक, पाणिनीच्या वेळीं तरी खचितच अस्तित्वांत असावें, असें वेबरचें मत आहे.[1]

आतां, वाचकास इतकें खचितच चांगलें स्मरत असेल[2]

१ ह्यासंबंधानें वेबर असें म्हणतो कीं,

" So that the legend must in any case have been current in his ( Panini's ) day, possibly in the poetical style. " ( H. I. L. P. 185 ).

पाणिनीचा काल डा. भांडारकर यांच्या मतें इ. स. पूर्वी ७०० वर्षें असून, वेबर प्रभृतींच्या मतें तो. इ. स. पू. ३५० वर्षें आहे. परंतु, पंडित सत्यव्रतसामाश्रमींच्या अभिप्रायाप्रमाणें तो इ. स. पू. २४०० वर्षें असल्याचें होतें. ( त्यांची निरुक्तावरील टीका पहा. )

२ भारतीय साम्राज्य. पूर्वार्ध पु. २ रें भाग १३।१४ पान ८६ ते २०४ पहा.

पाश्चात्यांच्या ह्या विपक्षवृत्तीचें अवलंबन इतकें वाजवीपेक्षां फाजील झालें आहे. व तें इतक्या शोचनीय स्थितीप्रत येऊन पोहोंचलें आहे कीं, त्याबद्दल सदसद्विचार करणाऱ्या प्रत्येक सुशिक्षिताला खेद होऊन, वाईट वाटल्यावांचून राहवत नाहीं.

ह्यासंबंधानें कै. वा. नामदार तेलंग म्हणतातः—

( पुढें चालू )

कीं, भारतीयांच्या यच्चावत् प्राचीनत्वाला अर्वाचीनत्व

---

( मागील पृष्ठावरून पुढें चालू. )

" It appears to me that in these days, there has set in a powerful tendency in Europe to *set down* individual works and classes of works of our ancient Sanskrit Literature *to as late a date as possible.* "

( भगवद्गीतेचें इंग्रजींत पद्यात्मक भाषान्तर ).

**डा० भांडारकरांनीं** देखील मोठ्या खेदानें अशाच मासल्याचे **उद्गार** काढिले आहेत. ते लिहितात कीं,

" But Col Ellis does not seem to consider them ( the arguments ) to be weighty, and in the view he has put forth, *he but represents,* in a somewhat exaggerated form, *the tendency of most European Scholars, and Antiquarians to modernize every thing Hindu.* "

( **म**हाभारताच्या कालाविषयीं दोन शब्द. )

ह्या दोषार्ह, अन्यायमूलक, व विघातक वृत्तींचें केवळ आम्हां **पौ**रस्त्यांसच आश्चर्य वाटतें असें नाहीं. तर, त्याबद्दल कित्येक **पा**श्चात्यांस, आणि त्यांतही विशेषेंकरून सरळ स्वभावाच्या गृहस्थांस सुद्धां फार खेद उत्पन्न होतो; व त्यामुळें, **हिंदूंचें** पौराणत्व किंवा त्यांची कल्पकता, त्यांची बुद्धिविशालता अगर त्यांचें नीतिसौजन्य, इत्यादींवर त्यांच्याच देशबांधवांनीं निष्कारण आक्षेप आणिल्याबद्दल ते मनःपूर्वक दुःखही प्रदर्शित करितात.

ह्यासंबंधानें सुप्रसिद्ध इतिहासकार **टॉड** म्हणतोः—

" *A contempt for all that is Asiatic too often marks our Countrymen in the East.* "

( पुढें चालू )

आणण्याचा कित्येक पाश्चात्यांचा नेहमींचा आणि स्वयमेव कल असून, त्यापैकींच वेबरप्रभृति होत. तेव्हां, त्यांच्या अभिप्रायाप्रमाणें देखील महाभारताचें हें पद्यात्मक कथानक तयार झाल्याला दोन हजारावर वर्षें होऊन गेलीं असल्याचें होतें; आणि वस्तुस्थितीवर नजर देतां, त्याचा काल, सदरीं नमुद केलेल्या कारणास्तव, याहीपेक्षां प्राचीनतर असावा, असें वाटतें.

असो. रामायणकालापेक्षां महाभारतकालीं, सुधारणेचें

महाभारतकालांतील सुधारणा.

पाऊल प्रत्येक शाखेंत खचितच पुढें सरसावलेलें होतें, असें अनेक प्रमाणांवरून दिसून येतें.

---

( मागील पृष्टावरून पुढें चालू. )

( टॉड्कृत राजस्थानचा इतिहास. पान ११७–११८ ).

सर मॉ. विल्यम्स देखील असें लिहितो कीं:–

" There *seems too great a disposition among* European *scholars to regard the Hindoos as destitute of all originality.* "

( भारतीय विदग्धता. पा. ३१६. )
Indian wisdom.

एम्. लुई. जेकलियट् नांवाचा एक फ्रेंच शोधक देखील मोठ्या दुःखानें आश्रु ढाळून असें म्हणतो कीं:—

" *Very few* travellers have *sought to understand* India, *very few* have *submitted to the labour* necessary to a *knowledge* of her *past splendours, looking only at the surface they have even denied them,* and with an *unreasoning confidence of criticism, that made them the easy victims of ignorance.* "
(La Bible Dans L' Inde, or the Bible in India. p.15)

सदरहू अवतरणांतील इतालिक वर्ण आमचे आहेत. ( ग्रंथकर्ता.)

शास्त्र किंवा ललितकला, शिल्पकला अथवा युद्धकला, व्यूहरचना अगर शस्त्रास्त्रविद्या, इत्यादींत आमच्या पूर्वजांनीं महाभारतकालीं विशेष नैपुण्य दाखविलें होतें, यांत काडीमात्र देखील शंका नाहीं.

शिवाय, एकंदर लोकांस, निदान बहुजनसमूहास तरी, त्यावेळीं विद्येची विलक्षण अभिरुचि लागली असल्यामुळें, नानाविध शास्त्रांत अनेक तऱ्हेचे शोध झाल्याचें दिसतें. शिल्पकलेंत आमच्या तत्कालीन पूर्वजांनीं आपलें अपूर्व चातुर्य[१] दाखवून, सर्वांस सकौतुकाश्चर्य तोंडांत बोटें घालावयास लावल्याचें भासतें. शस्त्रास्त्रविद्येंत अदृष्टपूर्व चमत्कार दाखवून, व्यूहरचनेंत तर त्यांनीं खरोखर निःसीम नैपुण्य दृग्विषयीभूत केलें होतें, असें कबूल करावें लागतें. आणि तत्वान्वेषणांत, म्हणजे वेदान्तासारख्या अतिगहन विषयांत तर, त्यांनीं अगदीं कमाल करून सोडिली होती, असें म्हणणें खचित भाग पडतें.

वाङ्मयाच्या व अन्य दृष्टीनें त्याचें मत.

ह्याखेरीज, वाङ्मयाच्या दृष्टीनें, अथवा अन्य कोणत्याही बाजूनें पाहिलें, आणि ह्या भूतलावरील अलौकिक ग्रंथसंपत्ति कोणती, या विषयींचा सारासार

---

१ आमच्या तत्कालीन शिल्पकलेचें पाश्चात्यांससुद्धां मोठें आश्चर्य वाटतें. कारण, तिच्यासंबंधानें ते असें म्हणतात कीं,

" That marvellous construction of Indraprastha, *brought into being* by Hindu Engineers. "

( The Times of India. 11th July 1896 ),

विचार केला, तर महाभारत हें एक प्रचंड महाकाव्य असून, तें खचितच अपूर्व आहे, असें कोणालाही कबूल करावें लागेल. इतकेंच नव्हे तर, त्याला इतिहासाची जन्मभूमि, सुखाचें आदिस्थान, शांतीचें माहेरघर, सकल विद्यांचें मूलपीठ, अखिल धर्मांचें बीज, ज्ञानाची खाण, तत्वविचारांचें भांडार, नवरसांचा सागर, शृंगारांचें भूषण, व शारदेचें शिरःकमल, इत्यादि उपपदें लाविल्यानें देखील, काडी मात्रही अतिशयोक्ति होणार नाहीं. फारतर काय सांगावें, पण, आम्हा भारतीयांची बुद्धिमत्ता, आमचें अपूर्व नीतितत्व, आमचें प्रकृति सौजन्य, आमचा स्वार्थत्याग, आमचें शांतिसुख, आणि आमचें सोज्ज्वल ज्ञान, इत्यादींचा हें महाकाव्य एक मूर्तिमंत विजयध्वजच आहे, असें निखालस कबूलच करावें लागतें.

एकंदरींत, महाभारत हा एक अद्वितीय रत्नसागर असून, असा अष्टपैलू व सर्वांगींविशोभित ग्रंथ या पृथ्वीच्या पाठीवर कोठेंही नाहीं, हें विशेष रीतीनें सांगावयास नलगे. म्हणूनच, महाभारतांत नाहीं तें अन्यत्र कोठें देखील नाहीं, व जें कांहीं आहे तें सर्व व्यासोच्छिष्टच आहे, असें म्हणण्याचा पडलेला परिपाठ केवळ यथार्थच होय.

तद्विषयक ज्ञानेश्वर कवीचें मत.

ह्या सर्व गोष्टींचा प्रत्यंतराचा दाखला पाहणें असल्यास, तो महाभारतांत खचितच ठायीं ठायीं आपल्या अनुभवास येतो. इतकेंच नव्हे तर, त्यांत तो अगदीं मूर्तिमंतच आपल्या दृष्टीस पडतो. आणि म्हणूनच, ह्या

अप्रतीम ग्रंथाचें अपूर्व वर्णन, आमचा महाराष्ट्र कवि जो ज्ञानेश्वर, त्यानें आपल्या ज्ञानेश्वरी नामक प्रसादी ग्रंथांत, मोठ्या मार्मिकपणानें केलें आहे. हें इतकें सुरस व यथार्थ आहे कीं, तें दिल्यावांचून माझ्यानें राहवत नसल्यामुळें, तें मी थोडक्यांत येथें देतों.

ज्ञानेश्वर महाराज म्हणतात :—

**आतां अवधारा कथा गहन। जे सकळ कथां जन्मस्थान।**
**कीं अभिनव उद्यान। विवेक तरूचें ॥ २८॥**
**नातरी सर्व सुखाची आदी। जे प्रमेय महानिधि।**
**नाना नवरस सुधाब्धि। परिपूर्ण हे ॥ २९॥**
**कीं परम धाम प्रगट। सर्व विद्यांचें मूळ पीठ।**
**शास्त्र जातां वसौट। अशेषांचें ॥ ३०॥**
**नातरी सकळ धर्मांचें माहेर। सज्जनांचें जिव्हार।**
**लावण्य रत्न भांडार। शारदेचें ॥ ३१॥**
**नाना कथा रूपें भारती। प्रगटली असे त्रिजगती।**
**आविष्करोनि महामती। व्यासाचिये ॥ ३२॥**
**म्हणोनि हा काव्याचा रावो। ग्रंथ गुरुवतीचा ठावो।**
**एथुनी रसा झाला आवो। रसाळपणाचा ॥ ३३॥**
**तेवींचि आइका आणिक एक। एथूनि शब्दश्री सच्छास्त्रिक।**
**आणि महाबोधीं कोवळीक। दुणावली ॥ ३४॥**
**येथ चातुर्य शाहणें झालें। प्रमेयरुचीस आलें।**
**आणि सौभाग्य पोखलें। सुखाचें एथ ॥ ३५॥**
**माधुर्यीं मधुरता। शृंगारीं सुरेखता।**
**रूढपण उचितां। दिसलें भलें ॥ ३६॥**

एथ कळाविद्पण कळा । पुण्यासि प्रताप आगळा ।
म्हणउनी जन्मेजयाचे अवलीळा । दोषहरले ॥ ३७ ॥
आणि पाहतां नावेक । रंगीं सुरंगतेची आगळिक ।
गुणा सुगुणपणाचें बिक । बहुवस एथ ॥ ३८ ॥
भानु तेजें धवळलें । जैसें त्रैलोक्य दिसे उजळिलें ।
तैसें व्यास मती कवळिलें । मिरवे विश्व ॥ ३९ ॥
कां सुक्षेत्रीं बीज घातलें । तें आपुलिया परी विस्तारिलें ।
तैसें भारतीं सुरवाडलें । अर्थ जात ॥ ४० ॥
नातरी नगरांतरीं वसिजे । तरी नागरची होइजे ।
तैसें व्यासोक्ति तेजें । धवळत सकळ ॥ ४१ ॥
कीं प्रथम वयसाकाळीं । लावण्याची नव्हाळी ।
प्रगटे जैसी आगळी । अंगना आंगीं ॥ ४२ ॥
नातरी उद्यानीं माधवी घडे । तेथ वनशोभेची खाणी उघडे ।
आदिला पासोनी अपाडें । जियापरी ॥ ४३ ॥
नानाघनीभूत सुवर्ण । जैसें न्याहाळितां साधारण ।
मग अळंकारीं बरवेंपण । निवाड दावी ॥ ४४ ॥
तैसें व्यासोक्ति अलंकारिलें । आवडे तें बरवेपण पातलें ।
तें जाणोनि आश्रयिलें । इतिहासीं ॥ ४५ ॥
नाना पुरतीये प्रतिष्ठेलागीं । सानीव धरूनी आंगीं ।
पुराणें आख्यानरूपें जगीं । भारता आलीं ॥ ४६ ॥
ह्मणऊनी महाभारतीं नाहीं । तें नोहे लोकीं तिहीं ।
येणें कारणें ह्मणिपे पाहीं । व्यासोच्छिष्ट जगत्त्रय ॥४७॥
ऐसी जगीं सुरस कथा । ते जन्मभूमि परमार्था ।
मुनि सांगे नृपनाथा । जन्मेजया ॥ ४८ ॥

जें अद्वितीय उत्तम । पवित्रैक निरुपम ।
परम मंगळधाम । अवधारिजो ॥ ४९ ॥
( ज्ञानेश्वरी. अध्याय १ ला. )

## अन्य सुप्रसिद्ध काव्यमकरंद.

अन्य काव्यें व कविरत्नें.

रामायण व महाभारतानंतर, आमच्या सर्वमान्य गीर्वाण भाषेस हरतऱ्हेनें सजविणारीं, आणि ती नांवारूपास येऊन अखिल जगत्तलावर अत्युच्च स्थानापन्न व्हावी, एतदर्थ मनोभावानें परिश्रम करणारीं, अशीं आमचीं अन्य कविरत्नें देखील बरींच आहेत. ह्यांनीं संस्कृत भाषा इतक्या उच्च पदवीस चढविली आहे कीं, त्याबद्दलचें जेवढें म्हणून वर्णन करावें तेवढें थोडेंच. कारण, हिचा भाग्योदय सुरू होऊन आज भित्तीस कमींत कमी दोन-तीनशें वर्षें झालीं असतांही, तिच्या सौन्दर्याविषयीं बुध-जनाचें कुतूहल सतत जागृतच राहतें. तिच्या माधुर्यासंबंधीं पंडितभ्रमरांची लालसा एकसारखी वाढतच जाते. तिच्या ऐश्वर्याबद्दल विद्वज्जनांचें वात्सल्य केवळ द्विगुणितच होतें. आणि तिच्या परिपक्वतेविषयीं गुणग्राहकांची जिज्ञासा बिलकुल कमी न होतां, ती निःसंशय चढत्या प्रमाणावरच आहे, असें खास म्हणावें लागतें.

व्याकरणशास्त्र व काव्यविचार.

असो. रामयण व महाभारत ह्या महाकाव्यद्वयानंतर, भाषेच्या संबंधानें व्याकरण विषयक ग्रंथच विशेष महत्वाचे, आणि कालानुक्रमानें प्रथमतः

विवेचन करण्यायोग्य आहेत. तथापि, व्याकरण मीमांसा हा केवळ शास्त्रीय विषयच असल्यामुळें, एकंदर शास्त्रांचें विवेचन करिते वेळींच, त्याबद्दलचा विचार करण्याचें योजिलें आहे. सबब, प्रथमतः लौकिकग्रंथसंपत्तीचेंच विवेचन करूं.

मृच्छकटिक नाटक.

लौकिकग्रंथसंपत्तींत, विशेष प्राचीनतर कृति म्हटली म्हणजे मृच्छकटिक होय. ह्याचा कर्ता शूद्रक राजा असून, तो इ. स. पूर्वी सुमारें शंभर वर्षें उदयास आला असावा, असें शोधक[१] विद्वानांचें म्हणणें आहे. अर्थात्, सार्वभौम विक्रमादित्यापूर्वी, तो अदमासें पन्नास वर्षेंच झाला असल्याचें दिसतें.

भारत हे आदिकवि, व आदि नाटककार.

मृच्छकटिक हें काव्य असून, नाटक आहे. आणि ज्याप्रमाणें आम्ही भारतीय हे आदिकवी[२] आहोंत, त्याचप्रमाणें आम्ही आदिनाटककार असल्याविषयींही आमची ख्याति आहे. नाटक शब्द नट शब्दापासून झाला असून, त्याचा अर्थ नाचणारा असा होतो. अर्थात्, जो आपल्या मनांतला हेतु आविर्भावानें व अंगविक्षेप करून दाखवितो, तोच नट होय, असें धात्वर्थावरून चांगलें व्यक्त होतें.

---

१ Wilson's Hindu Theatre.

२ " *Older ancestors and benefactors,* * * * *the ancestors of the whole Aryan race,* * * * the *first poets of our thoughts,* * * * ( Max Muller. What can India teach us ? P. 117. )

ह्यांतील इतालिक वर्ण आमचे आहेत. ( ग्रंथकर्ता, )

नाट्यकलेचा प्रादुर्भाव आपल्याला प्रथमतः ऋग्वेदांतच[1] दृष्टीस पडतो. कारण, नृत्याचा उल्लेख ह्या आदिकाव्यांत वारंवार येतो. त्याचप्रमाणें, यजुर्वेदांत आणि अथर्ववेदांतही तत्संबंधाचें दिग्दर्शन झाल्याचें दिसतें. वाजसनेयि संहितेंत तर कित्येक नट व गायक, यांजविषयींचा त्रोटक विचार केलेला दिसत असून, शैलूष नांवाची तर स्पष्टोक्तीच[2] झाली आहे. त्याचप्रमाणें, शतपथ ब्राह्मणांत देखील नाट्य आणि नर्तन यांचा उल्लेख केल्याचें नजरेस येतें. कारण, " नटांच्या नृत्यानें व गानानें युवतिजनास आल्हाद होतो, " असें तेथें एके ठिकाणीं लिहिलें आहे. (३;२.४.६).

तत्संबंधीं ऋग्वेद, यजुर्वेद, व पाणिनीतील प्रमाण.

शिवाय, कात्यायनसूत्रांत[3] आणि पाणिनींतही[4] नटांचा उल्लेख असून, नटसूत्रें[5] असल्याविषयींचें देखील त्यांतच दिग्दर्शन आहे; व त्यावरून, नाट्यकलेसंबंधीं ग्रंथ फार प्राचीन काळींच आमच्या भरतखंडांत झाले असल्याचें व्यक्त होतें. ह्या नट सूत्रांचे प्रवर्तक शिलाली आणि कृशाश्व होत; आणि ह्यांच्या नांवावरूनच, त्यांच्या अनुयायांस शैलाली व कृशाश्वी म्हणण्याचा परिपाठ आहे.

तात्पर्य इतकेंच कीं, भारतीय नाट्य व नृत्यकला

---

१ ऋ. वे. १. ११. १, ९२. ४. २ वा. सं. ३०. ३ ( २२. ४. ३ ). ४ ( ४. ३ ). ५ पाराशर्य शिलालिभ्यां भिक्षुनटसूत्रयोः, (११० अ० ४. पा० ३.) असें पाणिनीचें सूत्र आहे.

भारतांची स्वभूम्युद्भूत नाट्यकला.

फारच प्राचीन असून, ती आपल्या स्वजन्मभूमींत म्हणजे आर्यावर्तांतच उदय पावली; आणि येथूनच चीन वगैरे पौरस्त्य देशांत, व ग्रीस वगैरे पाश्चात्य देशांत, तिचा प्रसार झाला, असें मानण्यास बळकत्तर कारण मिळतें. कारण, यूरोपखंडांत नाटयकलेचा प्रसार इ० स० १४ व्या किंवा १५ व्या शतकापूर्वी बिलकुल झाला नव्हता, असें विल्सनचें म्हणणें. तेव्हां पाश्चात्यांचे आह्मी कोणत्याही संबंधानें ऋणी असणें संभवतच नाहीं.

---

१ ह्यासंबंधानें, "हिंदुनाट्यकला" नांवाच्या पुस्तकांत, विल्सननें असें लिहिलें आहे कीं,

"Whatever may be the merits or defects of the Hindu drama, it may be safely asserted that they do not spring from the *same parent*, but *are unmixedly its own.*"

( Wilson's Hindu Theatre. Preface.
Vol. I. P. XI. )

२ "But *it is impossible that they* ( Hindus ) should have *borrowed* their *dramatic* compositions from the *people either of ancient or modern times.* The nations of Europe possessed *no dromatic literature* before the 14th or 15th century, at which period the Hindu drama had passed into decline. * * * *They ( Hindus ) present characteristic varieties of conduct and construction, which strongly evidence both original design and national development.*"

( Wilson's Hindu Theatre. vol. I. P. XII. )

( पुढें चालू )

आतां, नटसूत्रांवरून पाणिनीच्या पूर्वींच त्यांचे प्रवर्तक होऊन गेल्याचें चांगलें व्यक्त होतें. आणि ज्यापेक्षां पाणिनीचा काळ इ० स० पूर्वी ७०० वर्षें असल्याचें भट्ट भांडारकरकृत दक्षिणच्या इतिहासावरून दिसतें, त्यापेक्षां, इ० स० पूर्वी ७०० किंबहुना ८०० वर्षांच्याही पलीकडील काळांत, भारतीय नाट्यकला उदयास आली असल्याचें निर्विवाद ठरतें. शिवाय, सत्यव्रतसामाश्रमीच्या मतें तर, पाणिनीचा काळ इ० स० पूर्वी २४०० वर्षें असल्याचें होतें; आणि त्यावरून, ह्या काळापूर्वींही नाट्यकलेचा उदय भरतखंडांत झाला होता, असें ह्मणावें लागतें.

तद्विषयक पाश्चात्य मत, व काल.

अशा प्रकारें, आमची नाट्यकला फार प्राचीन असून, ती भरतभूमींतच उदयाप्रत पावल्याचें उघड होतें. इतकेंच नव्हे तर, तिची भरभराट सुद्धां पुराणकाळांतच होऊन, ती इसवी शकाच्यापूर्वी, त्याच्या आरंभीं, आणि तदनंतरही, सुमारें अकरा बारा शतकेंपर्यंत, पूर्णतेच्या अगदीं उच्च कोटीप्रत पोहोंचली असल्याचें दिसतें.

भारतीय नाट्यकलेचें पौराणत्व व पूर्णता.

कालिदास, भवभूति, इत्यादि नाटककार जगत्प्रसिद्धच आहेत; व त्यांतही कालिदास तर ह्या सर्वांचा केवळ शि-

---

( मागील पृष्ठावरून पुढें चालू. )

ग्रीसदेशांतील इ० स० पूर्वी तिसऱ्या व चवथ्या शतकांतील नाटक, नाट्यकलेच्या पदवीस पोहोंचल्याचें दिसत नाहीं; आणि म्हणूनच त्याचें वर्णन विल्सनूनें केलें नाहीं.

ह्या गोष्टीचें अंतः-प्रमाण.

रोमणीच असल्याविषयीं, कोणास देखील नाकबूल नाहीं. तेव्हां ह्या कविद्वयांच्या कृतीवरूनच, भारतीय नाटयकलेचें खरें रहस्य कोणाही रसिक मनुष्याच्या लक्षांत सहजीं येण्यासारखें आहे. मग, नावाजलेले विद्वज्जन, व पौरस्त्य आणि पाश्चात्य गुणदोषविवेचक, आमच्या पुरातन नाटयकलेच्या पूर्णत्वाच्या संबंधानें सकौतुकाश्चर्य माना डोलवितील, यांत तर कांहींच नवल नाहीं.

व प्रत्यक्ष प्रमाण.

सुप्रसिद्ध महाभाष्यकार पतंजलि हा इ. स. पूर्वी १४३ वर्षांच्या सुमारास होऊन गेला असून, त्याच्या भाष्यावरून देखील, भारतीय नाट्यकला फार पुरातन असल्याचें उघड होतें; व ही गोष्ट पाश्चात्य विद्वानांस देखील कबूल करावी लागते.

तत्संबंधीं पाश्चात्यांचे उद्गार.

ह्या सर्व गोष्टींवरून, फार पुरातन काळीं सुद्धां, आम्हा भारतीयांचें नाटयनैपुण्य पुष्कळच सुधारलेल्या स्थितींत असे; आणि आमच्या नाटयकलेचें पाऊल फारच पुढें पडलेलें होतें, यांत तिळमात्र देखील शंका नाहीं. कारण, ह्यासंबंधानें वेबरसारखे अतितीक्ष्ण

---

१ वेबर म्हणतो,

"Unexpected light (has been) shed by the Mahabhashya of Patanjali on the then flourshing condition of theatrical representation."

(Weber's History of Sanskrit Literature.)

२ एतद्विषयक लिहितांना वेबर म्हणतो,

"The (Indian) drama, gradually rose to the

(पुढें चालू)

गुणदोषविवेचक सुद्धां, मोठ्या गौरवानें लिहून, आमच्या उज्ज्वल नाट्यकलेच्या पूर्णत्वाचें प्रेमपूर्वक वर्णन करितात.

संस्कृत नाटकें व त्यांचा संहार.

असो. संस्कृत भाषेंत अनेक कवींचीं पुष्कळ नाटकें आहेत, व तीं तशीं असल्याविषयीं केवळ आम्हीच म्हणतों, असें नाहीं; तर कित्येक पाश्चात्य पंडितांचा देखील त्याचप्रमाणें अभिप्राय आहे. परंतु आमच्या दुर्दैवानें, ही अमूल्य गीर्वाण ग्रंथसंपत्ति कित्येक परकीयांनीं[१] भस्मसात् करून, आपल्या नेत्रकमळांचें पारणें फेडलें. त्यामुळें, नानाविध विषयांवरील असंख्य ग्रंथसमूहाची अर्थात्च राखरांगोळी झाली. शिवाय, ह्या तडाक्यांतून जे थोडेबहुत वांचले, त्यापैकीं कांहीं सर्वभक्षी काळाच्या दंष्ट्रेंत गडप्प झाले; कांहीं कसरींनीं खाल्ले; कांहीं पुड्या बांधण्याच्या कामीं वाण्याच्या दुकानीं गेले; आणि राहिले साहिले मात्र आमच्या हातीं लागले. तथापि, तेही थोडेथोडके नाहींत. तेव्हां, अशा स्थितींत, सर. विल्यम्

---

( मागील पृष्ठावरून पुढें चालू. )

degree of *perfection*, exhibited in these extant pieces."

"The Indian *drama* * * * *acquitted itself brilliantly in the most varied fields*—notably too as a drama of civil life." * * *

( Weber's History of I. L. P. 198. )

सदरहू अवतरणांतील इतालिक वर्ण आमचे आहेत. (ग्रंथकर्ता.)

१ भारतीय साम्राज्य. पूर्वार्ध. पुस्तक ३ रें. प्रस्तावना पहा.

ज्योन्सची उक्ति कोण खोटी मानील, किंवा निराधार समजेल ? उघडच, कोणीही नाहीं. ह्या विद्वानें[1] व रसिक पंडितानें एके ठिकाणीं असें म्हटलें आहे कीं, यूरोपखंडांत, अगर कोणत्याही राष्ट्रांत, प्राचीन किंवा अर्वाचीन काळीं, नाटकग्रंथसमूह जितका मोठा असण्याचा संभव आहे, तितकाच हिंदूंचा देखील आहे. शिवाय, वेबरचें[2] देखील त्याच प्रकारचें मत असल्याचें, त्यानें लिहिलेल्या संस्कृत भाषेच्या इतिहासावरून व्यक्त होतें.

भारतीय नाट्यकलेचें बीजारोपण.

आमच्या नाट्यकलेचे प्रथमांकुर व तिचें बीजारोपण सामान्यजनसमूहाचें मनोरंजन करण्यांतच व्यक्त होत असल्याचें दिसतें. आणि म्हणूनच, आमच्या नाटकांचा प्रयोग कांहीं तरी उत्साहनिमित्त, अथवा धर्मसंबंधीं ललित म्हणून, किंवा एखाद्या मंगलकार्याच्या शेवटीं आनन्द प्रदर्शनार्थच करण्यांत येत असे, हें उघड आहे. शिवाय, ह्या गोष्टीला नाटकांतल्या प्रमाणांनींच विशेष

---

१ Sir Willam Jones' works. ज्योन्सच्या मतासंबंधानें विल्सन म्हणतो,

" He ( Sir W. Jones ) was led to suppose that the Indian Theatre would fill as many volumes as that of any nation in ancient or modern Europe."

( Wilson's Hindu Theatre. P XIV. )

२ वेबर लिहितो, " The number of (Sanskrit) dramas that have been published in India is already very considerable, and is constantly being increased. "
( Weber's History of Sanskrit Literature. P. 207. )

पुष्टीकरणही मिळतें. कारण, वसंतोत्सवानिमित्त नाटकाचा प्रयोग करावा, म्हणून मालविकाग्निमित्रांतच वर्णन आहे.

**विद्वत्परिषदा कालिदासग्रथितवस्तु मालविकाग्निमित्रं नामनाटकमस्मिन्वसन्तोत्सवे प्रयोक्तव्यमिति ।**

मृच्छकटिकांतील संविधानक.

अस्तु. मृच्छकटिकाचें संविधानक नेहमींच्या, म्हणजे सामान्य आयुष्यक्रमांतीलच आहे. तथापि, तें चटकदार असून, कित्येक ठिकाणीं श्रृंगार, हास्य, आणि करुणारस फारच चांगलें साधलें असल्याचें दिसतें; व त्यांतही विशेषतः शकाराच्या भूमिकेंत तर हास्यरसाची अगदीं कमाल करून सोडली आहे, असें भासतें. ह्या व्यक्तीचा अत्यन्त नीच स्वभाव, त्याचा तो निरर्थक डामडौल, त्याचें निःसीम भेकड आचरण, त्याची अजागलवृत्ति, त्याची ज्ञानशून्यता, त्याची विशोभित गर्वोक्ति, आणि कोणाच्याही आदरास तिलमात्रही पात्र न होणारें त्याचें वर्तन, इत्यादि अन्यत्र क्वचितच आढळून येतें.

## कालिदास.

कालिदास, व त्याची रसज्ञता.

शूद्रकानन्तर, नामांकित नाटककार व अद्वितीय कवि म्हटला ह्मणजे कालिदासच होय. आणि शूद्रक जरी विशेष प्राचीन आहे, तरी एकंदर कविमालिकेंत सर्व गुणांनीं श्रेष्ठ, व कालक्रमानें पुराणतर, असा कालिदासच आहे यांत शंका नाहीं. ह्याचें मानवी स्वभावाचें मर्मभेदक

ज्ञान, त्याचा तद्विषयक पूर्णपरिचय, सृष्टिवैभवाचें वर्णन करण्यांत दृग्गोचर होत असलेलें त्याचें अद्भूत सामर्थ्य, त्याच्या अचाट कल्पनेची विलक्षण सौन्दर्यश्री, त्याचें अप्रतीम बुद्धिवैभव, त्याची अपूर्व रसज्ञता, त्याचें अप्रतीम व हृदयद्रावक उपमाचातुर्य, त्याची उदात्तविचारसरणी, स्वादुरसानें पूर्ण भरल्यामुळें थबथबत असलेली त्याची सुमनोहर काव्यरचना, त्याची अलोट कविताशक्ती, इत्यादि गुणांनीं त्याचें श्रेष्ठत्व ह्या भूतलावरील सर्व राष्ट्रांस मान्य होऊन, तें आपोआपच स्थापित झालें आहे.

याची कवीन्द्रांतगणना.

ह्या कविकुलावतंसाच्या कवित्वाविषयीं आणि काव्यश्री संबंधीं लिहित असतांना, एका कवीनें असें म्हटलें आहे कीं, कालिदास हा सर्व गुणांनीं श्रेष्ठ असल्यामुळें, त्याची गणना कवीन्द्रांतच झाली पाहिजे. कारण, एकंदर कविसमूहाच्या परिगणनेंत प्रथमतः जी करांगुलि मोडावयाची, ती ह्या कविश्रेष्ठाच्या नांवानें व तत्सन्मानार्थच मोडणें अत्यवश्य आहे.

पुराकवीनां गणनाप्रसंगे
कनिष्ठिकाऽधिष्ठितकालिदासः
अद्यापितत्तुल्यकवेरभावा
दनामिकासार्थवतीबभूव ॥

नाटककारांत त्याचें अग्रणीत्व.

कालिदास हा जसा उत्तम कवि असे, त्याचप्रमाणें तो उत्कृष्ट नाटककार असल्याविषयीं देखील त्याची मोठी ख्याति आहे. शाकुंतल नांवाचें त्याचें नाटक

फारच मनोहर असल्यामुळें, सर्वांस महशूर आहे. ह्या नाटकाचा केवळ भाषान्तररूपानेंच रसास्वाद घेऊन देखील, जर्मनींतील सुप्रसिद्ध गेटी नामक कवि, हंबोल्ट नांवाचा सुविख्यात तत्ववेत्ता, मर्मज्ञ आणि रसिक गोएथ, व सुविख्यात पंडित श्लेजेल, या सर्वांनीं आनन्दाच्या पूर्णभरांत मोठ्यानें टाळया पिटून, केवळ सकौतुकाश्चर्य मानाच डोलाविल्या. मग, ह्या रसिकजनांनीं त्या कविपुंगवाची प्रत्यक्ष कृति जर पाहिली असती, तर त्यांच्या हृदयकमळांत किती आनन्दाच्या उकळया फुटल्या असत्या, याची कल्पना करण्याचें काम मी वाचकाकडेसच सोंपतों.

कालिदासाविषयीं पाश्चात्य मत.

कालिदासाविषयीं आमचे पौरस्त्य पंडित ज्याप्रमाणें गौरवानें लिहितात, त्याचप्रमाणें पाश्चात्य विद्वान सुद्धां त्याच्या कवित्वाचें मोठ्या प्रेमानें वर्णन करितात.

---

१ काव्येषु नाटकं रम्यं तत्ररम्यं शाकुंतला ।
तत्रापिच चतुर्थोऽकस्तत्र श्लोक चतुष्टयम् ॥
उपमा कालिदासस्य भारवेरर्थगौरवं ।
दंडिनः पदलालित्यं माघे संतत्रयोगुणाः ॥

२ अॅलेक्झॉण्डर व्हॉन हम्बोल्ट असें म्हणतो कीं,

" Kalidas the celebrated author of the Sakuntal is a masterly describer of the influence which Nature exercises upon the minds of lovers. Tenderness in the expression of feeling and richness of creative fancy have assigned to him his lofty place among the poets of all nations.

( Alexander Von Humboldt ).

( पुढें चालू )

कालिदासाचे मुख्य व नामांकित ग्रंथ सुमारें आठच आहेत. ह्यापैकीं, १ रघुवंश[1], २ कुमारसंभव, ३ ऋतुसंहार, ४ मेघदूत[2], ५ नलोदय, आणि ६ सेतुकाव्य, हीं काव्यें असून, १ शाकुन्तल, २ विक्रमोर्वशी, व ३ मालविकाग्निमित्र, हीं नाटकें होत. ह्या शिवाय, १ शृंगाराष्टक, शृंगारतिलक, ३ श्रुतबोध, ४ पुष्पबाणविलास, ५ राक्षसकाव्य, ६ गंगाष्टक, ७ महापद्माष्टक, ८रामायणचंपु, ९ भोजचंपु, १० श्यामलादंडक. ११ कर्पूरमंजरी, १२ हास्यार्णवनाटक, १३ असज्जनवर्णन, आणि १४ प्रश्नोत्तरमाला, ह्या कृती देखिल त्याच्याच असल्याविषयीं आख्यायिका आहे. यांपैकीं पहिल्या तीन उपलब्ध असून बाकीच्या मिळत नाहींत, व कांहीं कांहीं तर त्याच्या नांवावर मात्र विकल्या जातात. मालविकाग्नि मित्र नाटक ह्या कवीचें नसल्याविषयीं कित्येक

कालिदासाचे ग्रंथ.

---

( मागील पृष्ठावरून पुढें चालू. )

" No Composition of Kalidas displays more richness of his poetical genius, the exhuberance of his imagination, the warmth and play of his fancy, his profound knowledge of the human heart, his delicate appreciation of its most refined and tender emotions his familiarity with the workings and Counter workings of its Conflicing feelings in short more entitles him to rank as as the Shakspeare of India. "

( Monier Willims ).

१ रघुवंशावर ३३ टीका असल्याचें समजतें. २ मेघदूतावर ३० टीकाकार आहेत.

विल्सन् प्रभृति पाश्चात्यांचें मत आहे. परंतु तें केवळ निराधार आहे, असें अन्तर्गत प्रमाणावरूनच सिद्ध होतें. ( रा. ब. पंडित संशोधित मालविकाग्निमित्र पहा. )

रघुवंश महाकाव्य.

काव्यांत, रघुवंश हें कालिदासाचें अत्युत्कृष्ट काव्य होय. यांत दिसून येत असलेली उत्तम भाषाप्रौढी, चटकदार वर्णनशैली, उदात्त रचना, मनोवेधक पदलालित्य, आणि भिन्न भिन्न रसांचें समयोचित आविष्करण, वगैरे अनेक गुणांनीं हें मंडित असल्यामुळें, त्याचा परिमळ आपोआप सर्वत्र सुटून, त्याची कीर्ति व श्रेष्ठत्व स्वयमेवच प्रतिष्ठापित झालें, यांत काडिमात्रही शंका नाहीं.

मेघदूत, व कवीची कल्पकता.

काल्पनिक काव्यरचनेंत, मेघदूतानें तर अगदीं कमालच करून सोडली आहे. कारण, ह्यांत म्हणण्यासारखें संविधानक यत्किंचित् सुद्धां नसतांही, तें कालिदासानें विलक्षण रीतीनें मनोवेधक केलें आहे. इतकेंच नव्हे तर, अप्रतीम कल्पनाचातुर्य, अपूर्व बुद्धिवैभव, आणि अतितीव्र कवित्वशक्ति, यांची केवळ मूसच त्यानें त्यांत ओतली आहे, असें म्हटलें असतांही चालेल. वर्षाकालीं मेघाचें दर्शन, तदवलोकनानें चित्ताची विव्हलवृत्ति, तत्समयानुरूप नानाप्रकारचे देखावे, ठिकठिकाणीं दृग्गोचर होत असलेलें पक्षांचें पर्यटन, सृष्टिचमत्कृतीचे मनावर झालेले संस्कार, मेघमार्गनिदर्शनें, त्या त्या प्रसंगानुसार अनेक स्थलप्रकाशन, व त्या सर्वांचें सुरेख वर्णन, हीं इतक्या

मार्मिकपणानें केलीं आहेत कीं, त्यांतला प्रत्येक देखावा आपल्या डोळ्यापुढें केवळ मूर्तिमंतच उभा राहतो. फार तर काय सांगावें पण, त्यांतील प्रत्येक गोष्टीचें चित्र अगदीं हुबेहुब रेखलेलें असल्यामुळें, तें जणूकाय त्या त्या गोष्टीशीं आपला प्रत्यक्ष परिचयच करून देत असल्याचें निःसंशय भासतें.

कालिदासाचा कीर्तिपरिमल.

आतां, कवि म्हणून जरी कालिदासाची श्रेष्ठता सर्वमान्य आहे, तरी तो सर्वोत्कृष्ट नाटककार या नात्यानें, त्याचा कीर्तिपरिमल ह्या भूतलावर याहीपेक्षां विशेषेंकरून पसरला असल्याचें उघड दिसतें. ह्याचें जगद्विख्यात नाटक म्हटलें म्हणजे शाकुंतल असून, ह्या नाटकाच्या योगानेंच त्याचे अलौकिक गुण यूरोपखंडांत, व इतर पाश्चात्य राष्ट्रांत, तत्काळ पसरले. इतकेंच नव्हे तर, त्यामुळें त्याची कीर्ति अमर होऊन, त्याविषयीं सर्वांचें कुतूहल एकसारखें जागरूकच राहिलें.

ह्याची भाषा मधुर असून सर्वोत्कृष्ट आहे, सरळ असून हृदयद्रावक आहे, आणि साधी असून मनोहर आहे.

पाश्चात्यांस संस्कृत ग्रंथोदधीची माहिती.

आमच्या संस्कृत-शास्त्र-भांडाराची व अपूर्व काव्योदधीची खरी माहिती, पाश्चात्यांस फक्त गेल्याशंभर वर्षांतच झाली. किंबहुना, संस्कृत भाषेची विशेष अभिरुचि त्या लोकांना लागण्याला, जर विल्यम् जोन्स हाच कारणीभूत झाला, असें म्हणण्यासही हरकत नाहीं

हा बंगाल्यांत न्यायाधीश असतांना, त्यास आमच्या एका पंडिताकडून असें समजलें कीं, संस्कृत भाषेंत पुष्कळ सुरस काव्यें, अपूर्व नाटकें, अनेक शास्त्रें, आणि नानाप्रकारचे कलाविषयक ग्रंथ आहेत. हें कळतांच, त्यानें त्या भाषेचा दीर्घपरिश्रमानें अभ्यास केला, व त्यांत प्रावीण्य संपादिलें.

शाकुन्तलचें भाषान्तर.

पुढें, इ. स. १७८९ सालीं, त्यानें शाकुंतलाचें भाषान्तर इंग्रजींत करून, तें यूरोपांत छापिलें; व त्यानंतर त्याची प्रसिद्धि होऊन, ह्या कविवराच्या कीर्तीचा परिमळ सर्वभूमंडलावर हं हं म्हणतां पसरला. एवढेंच नव्हे तर, संस्कृत ग्रंथोदधींत अशा प्रकारचीं असंख्य उज्ज्वल रत्नें आहेत, असें ह्याच प्रयत्नानें पाश्चात्य पंडितांस कळून आल्यावरून, ते ह्या अपूर्व खाणीच्या शोधास मनःपूर्वक लागले.

कालिदासाच्या इतिवृत्ताचा अभाव.

अस्तु. आतां, ह्या कविशार्दूलाच्या इतिवृत्ताकडे क्षणभर वळूं, आणि त्याबद्दलचा अवश्य तो विचार करूं. हा गुणनिधि ह्मणजे केवळ सरस्वतीचाच कंठमणि, राष्ट्राचें भूषण, देशाचे आभरण, व अखिल जगाचें एक अत्युज्ज्वल रत्न असतां, तो कोठें आणि केव्हां जन्मला, कोणत्या काळीं उदयास आला, त्याच्या मातापितरांचें नामधेय काय, तीं कोठें राहत असत, त्याची जन्मभूमी कोणती, त्याचा परिवार कसा होता, आणि त्याचा आचारविचार व राहण्याची पद्धति कोणत्या प्रकारची असे, इत्यादि संबंधीं कोणतीही माहिती अजून पर्यंत

देखील मुळींच उपलब्ध होऊं नये, ही महद्दुःखाची गोष्ट होय. अर्थात्, ह्याच्या कालनिर्णयाला अन्तःप्रमाणाशिवाय विश्वसनीय असें अन्य कोणतेंही साधन नसल्यामुळें त्याची इतस्ततः ओढाताणच होत आहे, हें सांगावयास नको.

त्याचा काल.

कित्येक पंडितांच्या मतें, तो इ० स० च्या सहाव्या शतकांत उदयास आल्याचें होतें. कारण, सिंहलद्वीपाचा राजा जो कुमारदास त्याचा तो परममित्र असे. हा राजा इ० स० ५१५ मध्यें गादीवर बसला असून, त्याबद्दलची एक चमत्कारिक आख्यायिका सुप्रसिद्ध आहे. हा स्वतः फारच गुणी, गुणग्राहक, व चतुरस्र होता. तथापि, ह्याचें एक अंगवस्त्र व प्रियपात्र असल्यामुळें, तो तिच्या घरीं नेहमीं जात येत असे. एके दिवशीं, त्यानें विनोदानें तिच्या भिंतीवर खालीं लिहिलेला श्लोकार्ध लिहिला, आणि त्याचें जो पादपूरण करील, त्याला बक्षीस देण्याचें अभिवचन दिलें.

**कमले कमलोत्पत्तिः श्रूयतेनतु दृश्यते ।**

पुढें, कालान्तरानें, कालिदास हा सहजगत्या त्याजकडे गेला असतां, त्याच्या दृष्टीस तो श्लोकार्ध पडल्यामुळें, त्यानें त्याच्याच खालीं श्लोकपूरणार्थ उत्तरार्ध लिहून, तो चालता झाला.

**बाले तव मुखांभोजात् कथमिन्दीवर द्वयम् ॥**

तदनन्तर, त्या प्रियपात्राच्या अवलोकनांत हा श्लोकार्ध आल्यावर, तिला मत्सर होऊन, तिनें कालिदासास ठार मारिलें, व ती आपलीच कृति म्हणून राजाला दाखवून,

त्याजपाशीं इनाम मागितलें. परंतु, राजास तें बिलकुल खरें वाटेना. इतकेंच नव्हे तर, ज्या कोणी रसिकानें तो श्लोकार्ध रचला, त्याची त्याला विलक्षण धन्यता वाटून, त्यानें तीस खरा वृत्तान्त विवेदन करण्यास सांगितलें, आणि कारणपरत्वें धमकीही दिली. तेव्हां, तिनें आपला गुन्हा तत्क्षणींच कबूल केला, व कालिदास कवीचें प्रेतही काढून दाखविलें. पुढें, त्याची ती अवस्था पाहून, राजा अति विव्हळ झाला, आणि आपलें शरीर दहन करून पंचत्वाप्रत गेला.

तथापि, कांहींचें असें मत आहे कीं, कालिदास हा भवभूतीचा समकालीन होता, व त्यामुळें, तो इ. स. च्या आठव्या शतकांत उदयास आला असावा. आणि कांहीं-च्या अभिप्रायाप्रमाणें, तो भोज राजाच्या वेळीं, इ. स. च्या अकराव्या शतकांत झाला असावा.

असो. तें कसेंही असलें तरी, कालिदास हा विक्रमादित्याचा समकालीन होता, आणि म्हणूनच तो इ. स. पूर्वी ५६ वर्षांच्या सुमारास, अथवा त्याच्या आंत बाहेर उदयास आला असावा, असें मानण्यास बाह्य व अन्तःप्रमाणांवरून विशेष बलवत्तर प्रमाण मिळतें. अर्थात्, कालिदास नांवा-

इ. स. पूर्वी ५६ वर्षे.

१ (अ) रा. ब. शंकर पांडुरंग पंडित यांचा असाच अभिप्राय आहे.

(आ) डा. पीटरसन् म्हणतो,

( पुढें चालू )

च्या अन्य व्यक्ती भिन्न भिन्न काळीं होऊन, त्यांचीं कवनें सुध्दां कविकुलगुरूंच्या नांवावरच विकलीं जात असावीं, असें वाटतें.

नवरत्नें.

शिवाय, विक्रमादित्याच्या राजसभेंत जीं नऊ कविरत्नें चमकत असत, त्यापैकींच कालिदास, वररुचि, वराहमिहिर, इत्यादि होते, व त्याविषयींचा खालीं लिहिलेला श्लोक सुप्रसिद्ध आहे.

धन्वंतरिः क्षपणकोऽमर सिंहशंकु-
वेताल भट्ट घटकर्पर कालिदासाः ।
ख्यातो वराह मिहिरो नृपतेः सभायाम्
रत्नानिवै वररुचिर्नव विक्रमस्य ॥

वररुचीचा काल इ० स० पूर्वी ५६ वर्षं असल्याविषयीं, पाश्चात्य पंडित कॉवेलचें मत आहे. ( तत्संशोधित

---

( मागील पृष्ठावरून पुढें चालू. )

" Kalidas stands near the beginning of the Christian Era, if indeed he does not overtop it. "

( इ ) कालिदास हा अश्वघोषाच्या वेळचा असून, अश्वघोषानें कालिदासाची काव्यपद्धति उचलली होती; आणि अश्वघोषाचा काल इ. स. पूर्वीचा होय.

( ई ) अन्तर्गतप्रमाणांत, कालिदासाच्या काव्याची नैसर्गिक, साधी, स्वयमलंकृत रचना, ही मुख्य होय.

( उ ) दायभाग विवेचनावरून देखील कालिदासाचा काल इ. स. पूर्वीचाच दिसतो. (शाकुन्तल. अं० ६ वा.)

( ऊ ) राजतरंगिणींत कालिदासाचा उल्लेख नाहीं.

२ सर्वमान्य व जगत्प्रसिद्ध कालिदास.

प्राकृत प्रकाश पहा ). तेव्हां, ह्यासमवेतच दुसरीं प्रमाणें पाहिलीं म्हणजे, कालिदासाचाही तोच काल असल्याचें दिसतें.

आतां, ह्या कविरत्नाच्या मालिकेंतच अमरसिंह आणि वराहमिहिर यांजलाही ओंविलेलें असून, ह्या नांवाचा कोषकार व ज्योतिषी म्हणून जे प्रसिद्ध आहेत, त्यांचा काल इ. स. चें सहावें शतक असल्याचें होतें; व म्हणूनच कालिदासाच्या कालासंबंधानें विपर्यास वाटण्याचा संभव आहे. परंतु, कदाचित् ह्या व्यक्ति भिन्न असतील; आणि तसें मानल्याशिवाय गत्यन्तरच नाहीं. शिवाय, एकाच नांवाच्या अनेक व्यक्ती असूं शकतील व असतात, ही गोष्ट मुद्दां कबूल केली पाहिजे.

कालविपर्यासाचें निरसन.

कालिदासानंतर सुमारें सात शतकेंपर्यंत, गद्यपद्यात्मक कवीखेरीज करून, त्याच्या तोडीचा कोणीही नाटककार उत्पन्न झाला नाहीं. परंतु, पुढें आठव्या शतकांत मात्र भवभूति उदयास आला, व त्याच्या सुकीर्तीचा चारुपरिमल सर्वत्र सुटला. आतां, कालिदासाचे सर्व गुण जरी ह्या कवींत नाहींत, तरी तो त्याच्या खालोखाल आणि दुसऱ्या शेजेचा खचित आहे, ही गोष्ट कोणालाही कबूल केली पाहिजे.

कालिदासानंतर त्याच्या तोडीचा कवि भवभूति.

ह्याच्या बापाचें नांव नीलकंठ असे, व तो दक्षिणदेशांत पद्मपुर नामकनगरीं, उंबर नांवाच्या तपोनिष्ठ ब्राह्मण कुलांत जन्मला होता. ह्याच्या मातुःश्रीचें

त्याचें कुल, व जन्मस्थान.

नांव जातुकर्णी असून, खुद्द कविमजकुरास भट्टश्रीकंठ म्हणत; आणि इ० स० ७२० सालीं, यशोवर्मानामक जो कनोजचा राजा होता, त्याचा ह्याला आश्रय असल्याचें कळतें.

ह्या कवीच्या एकंदर तीनच कृती सर्वांस महशूर आहेत.

ह्याच्या कृती.

१ मालतीमाधव. २ महावीरचरित. आणि ३ उत्तररामचरित. ह्यापैकीं, पहिली काल्पनिक असून, दुसऱ्या दोन ऐतिहासिक व रामचरितवर्णनात्मक आहेत. सदहू तिन्हीं कृती नाटकेंच होत; सबब, या कविवराचें नैपुण्य आणि वैदग्ध्य, यासंबंधानें थोडेसें दिग्दर्शन करतों.

त्याची विद्वत्ता.

मालतीमाधवांत श्रृंगाररसच प्रधान आहे. तथापि, प्रसंगानुरूप, करुणारस, वीररस, अद्भुतरस, भयानकरस, व भीभत्सरस, यांची देखील झांक दृष्टीस पडते. मात्र, कांहीं कांहीं ठिकाणीं हा कवि आपली विद्वत्ता निष्कारण दाखवीत असल्याचें चांगलें व्यक्त होतें. त्यामुळें, संविधानकांतील रसाचा भंग होऊन, कांहीं तरी लांबच्या लांब आणि अप्रयोजक चऱ्हाट वळल्याचेंच क्वचित् भासतें.

ह्याचा दर्प.

आतां, भवभूति हा नामांकित विद्वान होता, याविषयीं बिलकुल शंका नसून, मतभेदही नाहीं. परंतु, त्याजवर अहंभावाच्या उर्मीनें आपला पगडा बराच बसविला होता, असें त्याच्याच दर्पोक्तीवरून तेव्हांच लक्षांत येतें. कारण, मालतीमाधवांत

प्रथमांकाच्या आरंभींच, त्यानें असें म्हटलें आहे कीं, " आमच्या ह्या कृतीचा जे कोणी आव्हेर करतील, त्यांना कांहींच समजत नसून, त्यांच्यासाठीं हें नाटकच रचलेलें नाहीं."

**ये नाम केचि दिह नः प्रथयन्त्यवज्ञाम् ॥**
**जानन्तिते किमपितान् प्रतिनैषयत्नः ॥**

कविकुलगुरु कालिदास हा देखील भवभूतीसारखाच विद्वान होता. तथापि, त्याचें सौजन्य आणि त्याचा विनय, हीं अपल्याला अपूर्व वाटून, त्यामुळेंच त्याच्या नैसर्गिक गुणांचेंहीं विशेष कौतुक दिसून येतें. मालविकाग्निमित्रांत कविकृतीची हकीकत श्रोतृजनांस निवेदन करतांना, त्यानें मोठ्या लीनतेनें असें म्हटलें आहे कीं, भास, सौमिल्ल, इत्यादि सुप्रसिद्ध प्राचीन कवींचीं नाटकें टाकून, सांप्रतच्या कालिदास कवीच्या कृतीकडे कोण लक्ष देतो ?

" भाव तावत् प्रथितयशसां भास सौमिल्ल कविपुत्रादीनां प्रबन्धानतिक्रम्य वर्तमानकवेः कालिदासस्य क्रियायां कथं परिषदो बहुमानः " ।

हें सौजन्य, अशा प्रकारची नम्रता, आणि असाच विनय, रघुवंशासारख्या महाकाव्यांत सुद्धां चांगल्या प्रकारें व्यक्त होतो. कालिदास म्हणतो,

**क्वसूर्य प्रभवोवंशो क्वचाल्पविषया मतिः ।**
**तितीर्षुर्दुस्तरं मोहादुडुपेनास्मि सागरम् ॥ २ ॥**
**मन्दः कवियशः प्रार्थी गमिष्याम्युपहास्यताम् ।**
**प्रांशुलभ्ये फले लोभादुद्बाहु रिव वामनः ३ ॥**

( रघुवंश. स. १ ला. ).

असो. भवभूतीच्या गर्वोक्तीमुळें, जरी त्याचा किंचित् उद्दामपणा भासमान होतो, आणि स्वतःची विद्वत्ता प्रदर्शित करण्यांत कित्येक ठिकाणचें त्याचें वर्णन जरी अप्रासंगिक दिसतें, तरी हा कवि खचितच गुणी होता, व त्याबद्दल तिळमात्रही शंका येण्याला कोठेंच जागा नाहीं. इतकेंच नव्हे तर, ह्याची कल्पकता अपूर्व असून, तींत सौंदर्यश्री प्राधान्येंकरून आहे; आणि त्या समवेतच विलासरमणीयताही मोठ्या थाटानें वास करीत असल्याचें व्यक्त होतें. त्याचप्रमाणें, ह्याची भाषा देखील मधुर असून रसाळ आहे, व प्रौढ असून जोरदार आहे. त्यामुळें, पाश्चात्य[1] विद्वान देखील तत्संबंधानें मोठ्या गौरवानें आणि आदरपूर्वक लिहितात.

त्याच्यांतील कवित्व-शक्ति.

मालतीमाधव नाटकावर दोन सुप्रसिद्ध टीका असल्याचें कळतें. ह्यापैकीं, एक **जगद्धराची** असून, दुसरी **राजाधिराज मलंकाची** आहे. **जगद्धराच्या** बापाचें नांव **रत्नधर** होय; व हा मैथिली ब्राह्मण, मोठा कवि, पंडित शिरोमणि, आणि नामांकित शास्ता असे.

मालतीमाधवावरील टीकाकार.

मालतीमाधवाप्रमाणेंच उत्तररामचरित देखील फारच

---

[1] विल्सन् म्हणतो, "At the same time, the beauties predominate over the defects, and the language of the drama is in general of extraordinary beauty and power" ( Wilson's Hindu Theatre. II. 5 )

उत्तररामचरित व त्याची पाश्चात्य कृतीशीं तुलना.

सुरेख नाटक आहे. पहिल्यासारखीच ह्याची भाषा मधुर व मनोहर असून प्रौढ आहे, आणि करुणारसाची तर, ह्यांत केवळ मूसच ओतली आहे, असें म्हणण्यास हरकत नाहीं. कारण, ह्या नाटकावरूनच "**कारुण्यं भवभूतिरेव तनुते**"। अशी म्हण पडली आहे. ह्यांतील विचार व आचार अगदीं पवित्र असून, रामचन्द्राचें वर्तन तर इतकें शुद्ध आहे कीं, तें कोणत्याही महात्म्याला शोभण्यासारखें आहे. एवढेंच नव्हे तर, यूरोप, आफ्रिका, आणि अमेरिकाखंडांत नांवाजलेला, व कित्येक पाश्चात्यांनीं देव्हारा माजवलेला जो ग्रीसदेश[1], त्याजवरही भरतखंडाची विशेष कडी व खरोखर तान आहे, असें तद्देशीय मर्मज्ञ पंडितास देखील निमूटपणें कबूल करावें लागतें. फार तर काय सांगावें पण, ह्यांतील उदात्त विचार, उज्वलित कल्पना, विशुद्ध मनस्तरंग, रमणीयता, सौन्दर्यविलास, आणि प्रसाद, इत्यादि अन्यत्र कोठेंही दृग्गोचर होत नाहींत, असें ते ह्मणतात.

---

१ विल्सन् म्हणतो, "In all his ( Rama's ) conduct, indeed, he is *vastly superior* to Admetus (*of Euripides*); and in the delineation of a situation, in some respects similar, the Hindu *poet is equally superior to the* Grecian." ( Wilson's Hindu Theatre P. 337 ).

२ "*Some brilliant thoughts occur*, the *justice and beauty of which are not surpassed in any literature.*" ( Wilson's Hindu Theatre. P. 334. )

सदरहू अवतरणांतील इतालिक वर्ण आमचे आहेत. (ग्रंथकर्ता).

महावीरचरित हें ह्या कवीचें तिसरें नाटक होय. ह्यांत

महावीरचरित.

सुद्धां, प्रौढरस, वनश्रीवर्णन, व भाषागांभीर्य, हे गुण प्रमुखत्वानें आहेत.

वेणीसंहार नाटकाचा प्रवर्तक भट्ट नारायण असून,

वेणीसंहार.

ह्याचा काल इ. स. च्या सहाव्या शतकांत असल्याविषयीं कांहींचें मत[1] आहे. कित्येकांच्या अभिप्रायांप्रमाणें[2], तो इ. स. च्या आठव्या किंवा नवव्या शतकांत झाला असावा. आणि इ. स. च्या नवव्या शतकाच्या पलीकडील कालांत तो झालाच नसावा, असें वेबर[3] म्हणतो.

ह्यांतील भाषा सुरम्य नसून, पदलालित्य तर कोठेंच दिसून येत नाहीं. आणि जरी कित्येक स्थलविशेषांत अवश्य त्या ठिकाणची भाषापद्धति जोरदार आहे, तरी एकंदरीनें विचार करतां, तींत मार्दव नाहीं; व म्हणूनच ती रुक्ष, कठोर, व कर्कशशी भासते.

रत्नावलिनाटक श्रीहर्षदेवानें केलें असल्याविषयीं आ-

रत्नावलि.

ख्यायिका आहे; व हा इ. स. च्या बाराव्या शतकांत काश्मीर येथें राजा होता, असें कित्येक पंडित मानतात. कांहीं असें समजतात कीं, ही कृति ह्याच राजाच्या पदरीं जो

---

१ Venisamhara edited by Grill. 1871,

२ Wilson's Hindu Theatre·

३ Weber's History of Sanskrit Literature,

४ विल्सनूकृत हिंदूनाट्यशाला.

धावक नांवाचा कवि होता, त्याची असून, त्यानें ती आपल्या पुरस्कर्त्याच्या नांवानें प्रसिद्ध केली. तथापि, हॉल्[1] वगैरे पाश्चात्य विद्वानांचें याहून अगदीं भिन्न मत आहे; आणि ते असें म्हणतात कीं, हें नाटक सातव्या शतकाच्या प्रारंभीं बाणानेंच केलेलें होय.

तिचा प्रवर्तक.

परंतु, बाणाची कृति पाहिली; त्याच्या कादंबरीचें अवलोकन केलें; आणि तिच्यांतील अपूर्व संविधानकचातुर्य मनांत आणिलें; म्हणजे आपणांस असें सहजीं वाटूं लागतें कीं, रत्नावलीचा प्रवर्तक खचितच बाण नसावा. कारण, कादंबरीची कल्पकता हींत नाहीं. इतकेंच नव्हे तर, रत्नावलीच्या संविधानकांत म्हणण्यासारखें कविकौशल्यही नाहीं; व त्याच्या वस्तुग्रथनांत नैसर्गिक कवित्वाचें स्फुरण सुद्धां कोठेंही दृग्गोचर होत नाहीं. तथापि, त्यांत भाषासौन्दर्य पुष्कळ असून, त्यांतील माधुर्य ओढून ताणून आणलेलें नाहीं; आणि म्हणूनच तें लोकांच्या आदरास पात्र झाल्याचें दिसतें.

नागानन्द.

धावकाची दुसरी कृति नागानन्दनाटक होय. तथापि, रत्नावलीप्रमाणें हें देखील श्रीहर्षदेवानेंच केलें असल्याविषयीं आख्यायिका आहे.

विद्धशालभंजिका.

विद्धशालभंजिका नांवाचें नाटक राजशेखर कवीचें आहे. हा इ. स. च्या दहाव्या शतकापूर्वीं होऊन गेला असावा, असें

[1] Hall's Introduction to the Vâsavadattâ.

कांहीं म्हणतात.[1] तथापि, तो अकराव्या किंवा बाराव्या शतकांतला असल्याचें ही कित्येक समजतात.[2] हें नाटक बरेंच चटकदार आहे.

प्रचंडपांडव नांवाची कृति देखील याच कवीची होय. ह्याच्या पत्नीचें नामधेय कर्पूरमंजरी असून, तिच्या प्रीत्यर्थ त्यानें जें एक युग्मक घातलें आहे, किंबहुना जें अन्य ठिकाणाहूनच त्यानें घेतलें आहे, त्यावरून चोहण ( चव्हाण ) रजपूत राजांच्या पदरीं तो कोणी तरी दिवाण (मंत्री) असावा, असें अनुमान होतें. ह्या नाटकाची भाषा साधीच परंतु जोरदार आहे.

कर्पूरमंजरी, व बालरामायण.

सदरहू नाटकांखेरीज, कर्पूरमंजरी व बालरामायण, यांचाही प्रवर्तक राजशेखरच असल्याचें कळतें. ह्यापैकीं, कर्पूमंजरी ही प्राकृतभाषेंत लिहिली आहे.

हनुमान नाटक.

हनुमान नाटक किंवा ज्याला महानाटक अशी ही संज्ञा आहे, त्यासंबंधानें एक चमत्कारिक कथानक आहेसें दिसतें. हें नाटक शिळेवर लिहिलेलें असून, तें वाल्मिकीच्या पाहाण्यांत सहजगत्या आलें. त्यावेळीं, त्यांतील माधुर्य व रस हीं मनांत येऊन, त्यामुळें आपल्या रामायणास ग्रहण लागेल कीं काय, अशी त्याला शंका वाटली. पुढें हीच गोष्ट त्यानें मारुतीस कळविली, आणि त्याचें सर्व

1 Weber ( H. I. Sanskrit Literature. P. 207 )
2 Wilson ( Hindu Theatre. vol II. P. 360. )

भाषण शान्तपणें ऐकून घेतल्यावर, रामायण प्रीत्यर्थ, व त्या पूजनीय ऋषिवर्याच्या सन्मानार्थ, त्यानें ही शिलार्पित कृति समुद्रांत फेंकून दिली. अशा प्रकारें, पुष्कळ काळ-पर्यंत ह्या नाटकानें जलसमाधि घेतल्यावर, भोजराजाच्या कारकीर्दीत त्याला उर्जितदशा प्राप्त होऊन, त्याचे कित्येक भाग उपलब्ध झाले असल्याचें त्याच्या कानीं आले; आणि त्यानें ते सर्व एकत्र करून यथास्थित लावण्याविषयीं, आपल्या पदरच्या दामोदरमिश्र नामक कवीस आज्ञा केली.

दामोदर मिश्रानें केलेली त्याची सांधासांध.

दामोदर मिश्रानें तें काम तडीस नेलें. परंतु, त्यानें बसविलेला सांधा अगदींच अवड-धोबड व सामान्य असल्यामुळें, त्याच्यांत कविनैपुण्य दिसून येत नाहीं, आणि हा नवीन जोड बेमालूम झाला आहे, असें ही वाटत नाहीं.

असो. तें कसेंही असलें तरी, ह्या नाटकांत बरीच कल्पकता असून, त्याची भाषा देखील जोरदार व स्थल-विशेषीं मधुर आहे. ह्याचा काल इ. स. च्या दहाव्या किंवा अकराव्या शतकांतला असावा, असें कित्येक विद्वान समजतात. ह्याजवर मोहनदास नामक कोणी एका राम-भक्ताची टीका आहे.

मुद्राराक्षस.

दुसऱ्या प्रतीच्या कविगणांत, नांवाजण्यासारखा नाटककार म्हटला म्हणजे 'विशाखदत्त होय. ह्याच्या कृतीचें नांव मुद्राराक्षस असून, राजकीय कारस्थान, कपटप्रयोग, कूट-

रचना, आणि हरएक तऱ्हेची दरबारी खटपट, यांसंबंधानें ह्याची बरोबरी करणारा एकही प्रबंध पौरस्त्य किंवा पाश्चात्य देशांत खचितच सांपडावयाचा नाहीं.

त्याची वस्तुरचना.

विश्वास ही एक अमूल्य चीज असून, ती आम्हां हिंदूंच्या पिंडांत जणूकाय खिळल्यासारखीच झाली आहे. त्यामुळें, ज्या ज्या मनुष्याकडे जें जें काम सोंपलेलें असतें, तें तें काम हरएक प्रसंगीं नितान्त परिश्रम घेऊन, व आणीबाणीच्या वेळीं अत्यन्त कष्ट सोसून, आणि वेळ पडल्यास जिवावर देखील उदार होऊन, तो तो मनुष्य केवळ मनःपूर्वक करण्यास झटत असतो; व ह्या सर्व गोष्टींचें अगदीं हुबेहुब चित्र मुद्राराक्षसांत तर प्रत्यक्षच दृग्गोचर होतें. तसेंच, परिश्रम सातत्यानें सर्व कांहीं शक्य असतें, आणि उद्योगयाच्या गळ्यांतच जयश्रीची माळ पडते, हा नीतितत्त्वाचा व सृष्टिनियमाचा धडा, चाणक्यानें आपल्या भगीरथप्रयत्नानें जणूकाय सप्रमाणच सिद्ध करून दाखविला, असें भासतें.

चाणक्य व राक्षसाची तुलना.

चाणक्य आणि राक्षस ह्यांत भिन्न भिन्न गुणांची सांगड दृष्टीस पडते; व ते ते गुण त्या त्या व्यक्तींत अगदीं यथार्थच शृंगारलेले असल्याचें उत्तम रीतीनें नजरेस येतें. चाणक्य हा दुराराध्य व निष्ठुर असे. परंतु, राक्षसाची प्रकृति याहून अगदीं भिन्न असून, तो अल्पसंतुष्ट आणि सौम्य होता, ही गोष्ट अगदीं निर्विवाद आहे. चाणक्य हा उद्दाम असे, व ब्राह्मणाचें श्रेष्ठत्व हीच

ऊर्मी त्याच्या अंगांत पूर्णपणें बाणलेली होती. राक्षस हा शान्त असे, आणि प्रभुकार्य हीच त्याची एकदृष्टि झाली होती. चाणक्यानें हा सर्व विभु आपला अपमान झाल्यामुळें, त्या गोष्टीचा सूड उगविण्यासाठीं रचला. परंतु, राक्षसानें राजकार्यार्थच स्वतःचा देह कष्टविला. चाणक्य हा पहिल्या प्रतीचा मुत्सद्दी व कारस्थानी असे. राक्षसांत हे गुण ह्मणण्यासारखे नसून, हा फक्त शूर व लढवय्या मात्र होता. चाणक्याच्या कारस्थानांत त्याचें पाऊल सदैव पुढेंच असे; आणि त्याची उत्साहशक्ति तर अमर्यादितच होती. राक्षसाला कोठेंही यश नव्हतें; व म्हणूनच तो निरुत्साही आणि अहर्निशीं चिंताग्रस्त असे.

मुद्राराक्षसांत पदलालित्य किंवा माधुर्य म्हणण्यासारखें नाहीं. तथापि, त्याची भाषा फारच जोरदार असून, प्रत्येक पात्र फारच सुरेख साधल्याचें दिसतें.

ह्या नाटकाचा प्रणेता, व त्याचा काल.

विशाखदत्त कवीच्या बापाचें नांव पृथु असून, त्याला महाराज ही पदवी होती. ह्याच्या आजाचें नांव वटेश्वरदत्त असे, आणि तो कोणी तरी मांडलिक राजा असावा, अशी कांहींची समजूत आहे. ह्या कवीचा काल इ. स. चें बारावें शतक असल्याचें दिसतें.

नाटकावरील टीकाकार.

ह्या नाटकावर दोघांची टीका आहे. पहिली गुहसेनाची असून, दुसरी वटेश्वरमिश्राची आहे. वटेश्वर मिश्राच्या बापाचें नांव गौरीपतिमिश्र होतें, व तो मैथिल ब्राह्मण असे.

अन्य नाटककार.

ह्याखेरीज, धनंजय[1], अनर्घराघव[2], शारदातिलक, ययातिचरित्र[3], दूतांगद[4], मृगांकलेखा[5], विदग्धमाधव[6], अभिराममणि[7], मधुरनिरुद्ध[8], कंसवध[9], प्रद्युम्नविजय[10], श्रीदामचरित[11], धूर्तनर्तक[11], कौतुकसर्वस्व[12], चित्रयज्ञ[13], इत्यादि अनेक लहान मोठीं नाटकें आणि भाण आहेत. परंतु, त्यांत कांहीं विशेष नसल्यामुळें, तद्विषयक येथें ज्यास्त चर्चा करण्याचें प्रयोजन दिसत नाहीं.

आतां, नाटकांखेरीज जे अन्य संस्कृत गद्यपद्य ग्रंथ आहेत, त्यांचा यथावकाश विचार करूं.

गद्यग्रंथ.

आमच्या बहुतेक कविजनांचा भर केवळ पद्यरूप काव्याकडेसच असे. किंबहुना, त्यांच्या मनाचा ओघ व कल्पनातरंग हे पद्यरचनेकडे विशेष धांव घेत, यांत शंका नाहीं. त्यामुळें, काव्य किंवा नाटक, इतिहास अथवा चरित्र,

१ कर्ता कांचनाचार्य. २ ह्यालाच मुरारि नाटक अशी देखील संज्ञा आहे; ह्या कवीचें नांव मुरारि असून, ह्याच्या मातापितरांचें नामधेय तंतुमति व श्रीवर्धमानभट होतें. हा १३ व्या किंवा १४ व्या शतकांतला असावा, असें वाटतें. ३ कर्ता रुद्रदेव. ४ कर्ता सुभट. ह्या नाटकाला छाया नाटक असेंही म्हणतात. ५ कर्ता विश्वनाथ. ६ कर्ता रूप; काल इ. स. १५३३. ७ कर्ता सुन्दरमिश्र; इ. स. १५९९. ८ कर्ता चन्द्रशेखर; इ. स. चें ७ वें शतक. ९ कर्ता कृष्णकवि; इ. स. चें १७ वें शतक. १० कर्ता शंकरदीक्षित; १८ वें शतक. ११ कर्ता सोमराजदीक्षित. १२ कर्ता गोपिनाथ पंडित. १३ कर्ता विद्यानाथ वाचस्पति भट्टाचार्य; १९ वें शतक.

शास्त्र अगर कला, कल्पित कथा वा आख्यायिका, इत्यादि विषयांत आमच्या संस्कृत कवींचे ग्रंथ बहुतेक पद्यात्मकच असत; आणि ते तसे असणें देखील अगदीं साहजीक होतें. कारण, आमच्या पूर्वजांचा एकंदर कल्पनाओघच पद्यात्मक असे.

तथापि, अनादि कालापासून चालत आलेली ही पदरचनेची परंपरा, व सर्वांनीं सतत अवलंबन केलेली ही अशा प्रकारची प्रणालिका, यांत एकदम बदल करण्याचें स्तुत्य साहस, आणि अनुकरणीय धैर्य, प्रथमतः विष्णु[1]शर्म्यानेंच केलें; व तदनंतर त्याचाच कित्ता दंण्डी, सुबंधु, आणि बाण, या कवित्रयांनीं गिरविला. अर्थात्, त्यायोगानें, आमच्या संस्कृत वाङ्मयावर सुरम्य व चारुतर परिणाम घडून आला. एवढेंच नव्हे तर, प्राक्कालीन कविपुंगवांच्या साहाय्यानें जी संस्कृत भाषा आधींच श्रृंगारलेली दिसत असे, तिला ह्या नूतन गद्याभरणानें निःसंशय विशेष रमणीयता प्राप्त झाली. फार तर काय सांगावें पण, या सुप्रसिद्ध कवित्रयांनीं नांवाजण्यासारखे गद्य ग्रंथ रचून, त्यांत उत्कृष्ट पदलालित्य, सुन्दर श्लेषरचना, उदात्त प्रागल्भ्य, आणि मनोहर समासप्राचुर्य, यांची जणूकाय मूसच ओतली.

---

१ विष्णुपुराणासारखे ग्रंथ याहींपेक्षां पुराणतर असून, त्यांतले कांहीं भाग गद्य आहेत. तथापि, त्यांजला गद्यग्रंथ म्हणतां येणार नाहीं. त्यांच्या पौराणत्वाच्या संबंधानें इतह्यासाठीं, ग्रंथकर्त्यांचें भाषाशास्त्र, पान १५९. टीप पहा.

पंचतंत्र व त्याचा परिमल.

विष्णुशर्म्याचा काल इ. स. चें पांचवें शतक असून, त्यानें केलेल्या पंचतंत्राचा सुकीर्तिपरिमल ह्या भूतलावर सर्वत्र पसरलेला आहे. ह्या पंचतंत्राचा मूळ इतिहास फारच मनोवेधक आहे. सबब, तो येथें थोडक्यांत देतों. दक्षिण देशांत, महिलारोप्य नांवाच्या नगरांत, इ. स. च्या पांचव्या शतकाच्या सुमारास, अमरशक्ति नांवाचा राजा राज्य करीत होता. ह्याला वसुशक्ति, उग्रशक्ति, आणि अनेकशक्ति, असे तीन पुत्र होते. परंतु, ते तिन्ही अगदीं मतिमंद व केवळ पशुतुल्यच असल्यामुळें, त्याचें मोठें राज्यही त्याला शून्यवत् भासत असे. पुढें, अशा दुःसह स्थितींत त्यानें बरेच दिवस कांठिल्यावर, त्यानें एके दिवशीं आपल्या दरबारांतील अनेक पंडित, नामांकित विद्वान, व सर्व मंत्रिमंडळ, यांस बोलाविलें, आणि आपले पुत्र कोणत्या तरी उपायांनीं शहाणे व्हावे या हेतूनें, त्यांस अनेक उपाय विचारले. त्यावेळीं, ज्याला जें सुचलें त्यानें तें कळविलें; व ज्ञानार्जनासाठीं हाडाचीं काडें करणें अत्यवश्य असून, तसें केल्याशिवाय तें प्राप्त होण्याला अन्य साधनच नाहीं, असें अनेक विद्वानांनीं राजास निक्षून सांगितलें. तेव्हां राजाला फारच खेद झाला, आणि हे तिन्ही पुत्र सुधारण्याच्या संबंधानें तर त्याची केवळ निराशाच होत चालली. तें पाहून, त्या सभेंत एक प्रत्युत्पन्नमति, विवेकी, व चाणाक्ष पंडित होता, त्यानें उत्तर केलें कीं, महाराज,

अनन्तपारं किलशब्दशास्त्रं
स्वल्पं तथायुर्बहवश्चविघ्नाः ॥
सारं ततो ग्राह्यमपास्य फल्गु
हंसैर्यथाक्षीरमित्रांबुमध्यात् ॥

यासाठीं, आपल्या अत्यल्प आयुष्यक्रमांत उद्भवणाऱ्या असंख्य विघ्नराशींचें निवारण करून, ह्या अपार ज्ञानोदधींतील उपलब्ध होणारें अमृतपान, युक्त असलेल्या हरेक उपायांनीं अवश्य साधून घेतलें पाहिजे. आणि ह्या राजपुत्रांच्या उदार शिक्षणार्थ, विष्णुशर्मा नामक विद्वान ब्राह्मणाची योजना झाल्यानेंच, हा इच्छित कार्यभाग घडून येणारा आहे.

त्याची कथा.

हें ऐकून, राजानें विष्णुशर्म्यास बोलावून आणून, आपले तिन्ही पुत्र त्याच्या स्वाधीन केले, व त्यांजला हरेक प्रकारचें व्यावहारिक शिक्षण देण्यास सांगितलें. तदनन्तर, ह्या पंडितानें पंचतंत्र नांवाचा ग्रंथ रचला, आणि त्या राजपुत्रांस सर्व व्यवहारांत चतुर, व नीतिशास्त्रांत निपुण केलें. आणि तेव्हांपासूनच, ह्या पंचतंत्रांची प्रसिद्धि उत्तरोत्तर वाढत जाऊन, हा अप्रतीम ग्रंथ पौरस्त्य व पाश्चात्य देशांतील यच्चावत् राष्ट्रांत सर्वमान्य झाला.

त्याचें पल्हवींत, इराणींत, व आरबींत भाषांतर.

ह्या जगद्विख्यात ग्रंथाचें भाषान्तर प्रथमतः इ. स. च्या सहाव्या शतकांत, बुझरझुमेर नांवाच्या प्रसिद्ध वजीरानें इराणच्या अनुशीर्वाण शहाच्या कारकी-

दींत, पल्हवी भाषेंत केलें. त्यामुळें, त्याची खरी किंमत दरबारच्या सर्व लोकांच्या लक्षांत येऊन, इराणचे लोक त्याचा संग्रह, अगदीं रावापासून तों रंकापर्यंत, एकाद्या अमूल्य रत्नाप्रमाणें करीत. पुढें, कालान्तरानें, कालिफ अबुजाफ़रनिकीनें बहुत परिश्रम करून, त्याची एक प्रत पल्हवी भाषेंतच मिळविली, व तत्कालीन सुप्रसिद्ध विद्वान जो इमान हुसेन अबदुल मोकाफ, याजकडून तिचें आरबी भाषेंत भाषान्तर करविलें. तदनन्तर, हिजरा शकाच्या ३८० सालीं, म्हणजे इ. स. च्या दहाव्या शतकांत, सुलतान महमद गिझनीनें तें पद्यात्मक रचलें; व इ. स. ५१९ मध्यें, बेहरामशहाच्या हुकमानें त्याचेंच आरबींतून इराणींत भाषान्तर झालें. हेंच हल्लीं "कलिलदमन" म्हणजे पंचतंत्रांतील पिंगल नामक सिंहाचे मंत्रिद्वय जे १ करटक आणि २ दमनक, त्यांच्या नांवानें सुप्रसिद्ध आहे.

पुढें, मुलनाअल्ली हुसेननें तेंच सोप्या व सरळ आरबी भाषेंत रचलें, व त्याला अन्वर सोहेली हें नामधेय दिलें. तदनंन्तर, इ. स. १००२ सालीं, जलाल उद्दिन महमद अकबरानें, तें सर्व लोकांस सुगम होऊन चांगलें समजावें या हेतूनें, त्याचें आणखी भाषान्तर करविलें, भाणि अबुल फाजिलनें तें शेवटास नेऊन, त्याला आयरदनीश अथवा ज्ञानोदधि असें नांव दिलें.

इ० स० १७०९ सालीं, सदरीं लिहिलेल्या कलिलदमन नांवाच्या फारशी पाठभेदाचें फ्रेंच भाषेंत भाषान्तर होऊन, त्याला "भारतीय ज्ञाननिष्ठ पि-

त्याचे इराणींतून फ्रेंचमध्यें व इंग्रजींत भाषांतर.

ल्पेकृत नीतिकथामृत सागर" या आशयाचें त्याच भाषेंत नामधेय मिळालें. पुढें, अशाप्रकारच्या किंचित् रसास्वादानें, पाश्चात्यांचें कुतूहल शनैः शनैः जागृत होऊन, तें कालान्तरानें अतिशय तीव्र व प्रखर झालें. त्यामुळें, त्याचें इंग्रजींत भाषान्तर होऊन, त्याचा खप इतका झपाट्यानें झाला कीं, त्याच्या एकामागून एक अशा कमींतकमी पांच आवृत्ति काढाव्या लागल्या.

अन्वर सोहिलीचें तुर्की भाषेंतील भाषान्तर इ. स. १५४० सालीं झालें असून, तें तयार करण्यासाठीं, अलीबेनसालेला वीस वर्षे एकसारखें आणि सतत परिश्रम करावे लागले. तदनन्तर, सुमारें दोनशें वर्षांनीं, कोणी एक एम्, कारडॉन् नांवाच्या फ्रेंच विद्वानानें ह्याचाच तरजुमा फ्रेंच भाषेंत इ. स. १७७८ सालीं केला, व त्याला "बिडपेकृत भारतीय नीतिसार," या अर्थाचें नामधेय दिलें.

अशाप्रकारचा, जगत्प्रसिद्ध भारतीय पंचतंत्रांचा संक्षिप्त इतिहास असून, ह्या पौरस्त्य कथासरित्सागराचा ओघ भरतखंडांतूनच[1] पश्चिमेकडे वळून, त्यानें आशिया,

त्यामुळें त्याची चार्‍ही खंडांत कीर्ति.

१ ही गोष्ट पाश्चात्यांस सुद्धां निमुटपणें कबूल करावी लागते. मॉक्समुलर म्हणतो,

"Even the study of fables owes its new life to India, from whence the various migrations of fables have been traced at various times and through channels from East to West."

(What can India teach us ? P. 9)

वेबरकृत संस्कृत भाषेचा इतिहास. पान २१० ते २१३.

यूरोप, आफ्रिका, आणि अमेरिका, या खंडांत देखील सर्वत्र नीतिसिंचन केलें, व आपल्या सुकीर्तीपरिमलाचा दर्वळ अखिल भूमंडलावर सोडला.

दंडी कवि, त्याची कृति, व त्याचा काल.

पुढें, इ० स० च्या सहाव्या शतकांत दंडी उदयास आला, आणि त्यानें दशकुमारचरित नांवाचा गद्य ग्रंथ रचला. ह्यांत, कादंबरीसारखें संविधानकचातुर्य बिलकुल नाहीं, किंवा म्हणण्यासारखा मनोरंजक व सुरस कथाभागही कोठेंच दृष्टीस पडत नाहीं. कारण, यांत फक्त दहा राजकुमारांचीं चरित्रें असून, त्यांच्या साहसादि गुणांचें आणि तत्कालीन समाजस्थितीचें वर्णन आहे. तथापि, त्याची भाषा फारच मनोहर व विशेष मधुर आहे. फार तर काय सांगावें पण, त्याची सर्वोत्कृष्ट गद्यरचना, आणि त्याचें अपूर्व पदलालित्य, हींच ह्या कवीच्या अजरामर कीर्तीस कारणीभूत झालीं आहेत. इतकेंच नव्हें तर, ह्याच पदलालित्यामुळें, "कविर्दण्डी, कविर्दण्डी, कविर्दण्डी, नसंशयः," हें उपपद त्याला प्राप्त झाल्याचें दिसतें. काव्यादर्श हा त्याचा दुसरा ग्रंथ होय.

सुबंधु.

सुबंधूचा काल इ० स० ६१० पासून तो ६५० पर्यंतचा असून, तो बाणाचा समकालीन असल्याचें दिसतें. ह्याची प्रसिद्ध कृति म्हटली म्हणजे, वासवदत्ता होय. हींत, श्लेषचमत्कृतीशिवाय दुसरें वर्णन करण्यासारखें कांहींएक नाहीं. तथापि, श्लेषरचनेंत त्याची बरोबरी करणारा दुसरा कोणी

नाहीं, असें म्हणावें लागतें. कारण, **बाण** कवीनें देखील तत्संबंधानें मोठ्या गौरवानें लिहिलें आहे. **बाण** म्हणतो,
**क**वीनामगलद्दर्पो नूनं वासवदत्तया । शक्त्येवपांडुपुत्राणां गतयाकर्णगोचरम् ।

बाण.

**बाण कवि** देखील **सुबंधु**प्रमाणेंच इ० स० च्या सातव्या शतकांतील होय. ह्याचें निवासस्थान **शोण** नदीच्या पश्चिमेस प्रीतिकूट नांवाच्या नगरांत असून, त्याच्या बापाचें नांव **चि**त्रभानु व आईचें नांव राज्यदेवी होतें. ह्याच्या मुख्य **कृ**ति म्हटल्या म्हणजे, १ **का**दंबरी, २ हर्षचरित, ३ **चं**डिकाशतक, आणि ४ **पा**र्वती **प**रिणय, अशा चारच असल्याचें कळून येतें. ह्या सर्वांत, **का**दंबरी ही सर्वमान्य व नामांकित होय. हिच्यांतील संविधानकचातुर्य इतकें विलक्षण, सुरम्य, आणि मनोहर आहे कीं, एकंदर गोष्टीचें बहुतेक पर्यवसान होईपर्यंत, पुढें कोणता व कशा प्रकारचा कथाभाग आहे, हें वाचकांस बिलकुल कळून येत नाहीं. त्यामुळें, तत्पारायणतृष्णा एकसारखी वाढत जाते, आणि तद्विषयक कुतूहल सतत जागृतच राहते.

कादंबरी.

**का**दंबरीची भाषा प्रौढ असून चटकदार आहे; उदात्त असून रमणीय आहे; व सरळ असून मधुर आहे. त्यांतील श्लेष सुरेख असून अर्थव्यंजक आहेत, आणि सुबोध असून मनोहर आहेत. तिच्यांतील ठिकठिकाणचे हुबेहुब देखावे, विचित्र स्थळें, व आल्हादजनक शोभा, हीं इतक्या मार्मि-

कपणानें वर्णन केलीं आहेत कीं, त्या योगानें संस्कृत भाषा जणूकाय त्याच्या घरीं पाणीच भरीत असल्याचें भासमान होऊन, त्याच्या अचाट कल्पनेचें आश्चर्य, आणि बुद्धिवैभवाचें कौतुक, वाटतें.

बाणभट्टाचें हें अशा प्रकारचें नैपुण्य, त्याचें प्रागल्भ्य, व त्याची अपूर्व कल्पकता, इत्यादि मनांत येऊन, गोवर्धनाचार्यांनीं एक मोठा खुबीदार श्लेष काढून असें ध्वनित केलें आहे कीं, वाणी सरस्वती ही आपल्या अंगांत पुरुषाचें धैर्य, साहस, आणि प्रौढता येण्यासाठीं, बाण झाली; व ह्या अवस्थान्तरानेंच तिनें आपल्या अंगचें खरें सामर्थ्य अखिल जगास दाखविलें.

**जाता शिखंडिनी प्राक् यथा शिखंडी तथावगच्छामि ।**
**प्रागल्भ्यमधिकमवाप्तुं वाणी बाणो बभूवेति ॥**

(गोवर्धन).

बाणाचा सत्पुत्र व कादंबरीचा उत्तरार्ध.

असो. कादंबरीचा पूर्वार्ध खुद्द बाणाच्याच हातचा असून, तिचा उत्तरार्ध ह्या कविवराच्या हातूनच पुरा होण्याविषयीं ईश्वरी संकल्प नसल्यामुळें, त्याजवर एकाएकी मृत्यूनें आपली झडप घातली. तथापि, दुःखांत सुख एवढेंच मानावयाचें कीं, ही झालेली शोचनीय देशाची हानि भरून काढण्याच्या हेतूनें, त्याच्याच सत्पुत्रानें

---

१ हा कथाभाग भारतांतील उद्योगपर्वाच्या शेवटीं सांगितला आहे.

२ 'ब' 'व' योः सावर्ण्यम् असल्यामुळें, ह्या मार्मिक श्लेषाची विशेष खुबी दिसून येते.

२७

दीर्घोत्साह धरून, तें काम हातीं धरिलें, व आपल्या पित्या-च्या वर्षश्राद्धापूर्वीच तडीस नेलें.

ह्यानन्तर दुसरा नांवाजण्यासारखा गद्यग्रंथकार म्हटला म्हणजे नारायण होय. ह्याचा हितोपदेशग्रंथ सर्वांस महशूर असून, तो पंचतंत्राप्रमाणेंच लहान मुलांस उपदेश व नीतिशिक्षण देण्याच्या कामीं, फारच महत्वाचा आणि उपयोगी आहे. किंबहुना, पंचतंत्राच्या[1] धर्तीवरच हा रचला आहे, असेंही म्हणण्यास हरकत नाहीं. ह्याचा उदयकाल इ. स. चें दहावें शतक असल्याचें म्हणतात. निदान, तो उद्भट कवी नंतरचाच असावा असें वाटतें. कारण, **अयं बंधुः परोवेति गणना लघुचेतसाम् । पुंसामुदारचित्तानां वसुधैव कुटुंबकम् ॥** ह्या त्याच्या वचनोक्तीचा नारायणानें आपल्या हितोपदेशांतील[2] मित्रलाभांत उपयोग केला आहे, असें दिसतें. आणि राजतरंगिणीवरून (कल्हण. ४. ४९४), भट्टोद्भट हा जयापीड राजाच्या पदरीं इ. स. ७७९–८१३ सालीं राजकवि किंवा सभापति म्हणून असे; व त्याला दररोज एक लक्ष दीनार, म्हणजे त्यावेळचें सुवर्णाचें नाणें मिळे; इत्यादि हकीकत कळून येते.

भट्ट नारायण व हितोपदेश.

कल्पित कथानकांत, किंवा ऐतिहासिक कथाभागांत,

---

१ ह्याचे १ मित्रभेद, २ मित्रप्राप्ति, ३ काकोलूकीय, ४ लब्धप्रणाश, व ५ अपरीक्षितकारक, असे पांच भाग आहेत.

२ ह्याचीं १ मित्रलाभ, २ सुहृद्भेद, ३ विग्रह, आणि ४ संधि, अशीं चार प्रकरणें आहेत.

दुसरेही गद्यपद्य ग्रंथ अनेक आहेत. सबब, त्यांबद्दलची देखील थोडीशी हकीकत येथें देतों.

गुणाढ्यकृत बृहत्कथा-

बृहत्कथा नांवाच्या गोष्टी फार प्राचीन आणि नांवाजलेल्या आहेत, व त्यांचा प्रणेता **गुणाढ्य** असल्याविषयीं सर्वांस महशूर आहे. ह्या गोष्टी मूळ **पैशाचींत**, म्हणजे **भूतभाषेंत** लिहिल्या असून, त्यांचें ऐतीह्य विशेष चकटदार व अद्भुत असल्या कारणानें, सुश्राव्य आहे. ह्या कथा सात चक्रवर्ती **विद्याधरांच्या** असलेल्या, प्रथमतः **शिवानें पार्वतीस** सांगितल्या. परंतु, **शिवाच्या पुष्पदंत** नामक सेवकानें त्या चोरून ऐकून, आपल्या **गया** नांवाच्या पत्नीस निवेदन केल्या. त्यामुळें, **पार्वतीस** राग येऊन, " तूं मृत्यु लोकीं मनुष्याच्या जन्मास जाशील, " असा तिनें त्यास शाप दिला. पुढें, **मलयवत्** नांवाच्या त्याच्या भावानें क्षमा होण्याविषयीं मध्यस्थी केली. तेव्हां, त्याला सुद्धां तोच शाप मिळाला. तदनन्तर, ते दोघेही तिला शरण गेल्यावर, तिला दया येऊन, तिनें त्यांस उश्शाप दिला, आणि असें सांगितलें कीं, कोणी एक कणभूति नांवाच्या पिशाचाची भेट होऊन, पुष्पदन्तानें ह्या सर्व गोष्टी त्यास सांगितल्यावर, तो शापविमुक्त होईल. त्याचप्रमाणें, कणभूतीच्या मुखानें मलयवतानें या सर्व बृहत्कथा ऐकून घेऊन, त्यांची कीर्ति अखिल भूतलावर पसरल्यावर, त्याच्याही शापाचें परिमार्जन होण्यास अडचण राहणार नाहीं.

त्याप्रमाणें, पुष्पदन्त हा भूलोकीं अवतरून, नन्दकुळां-

तला शेवटला राजा जो योगानन्द, त्याचा मंत्री झाला; आणि सुप्रसिद्ध वैयाकरण म्हणून, कात्यायन वररुचि नांवानें प्रसिद्धीस आला. पुढें, कणभूति पिशाचास त्यानें पूर्वीच्या सर्व गोष्टी विवेदन केल्या, व पूर्व संकल्पानुरूप मृत्युलोक सोडून, तो आपल्या प्रथमच्या निवासस्थानाप्रत परतला.

कालान्तरानें, मलयवतानें देखील ह्या लोकीं जन्म घेऊन, तो शातवाहन राजाचा गुणाढ्य नांवानें प्रधान झाला. त्यावेळीं, गुणदेव आणि नन्दिदेव नामक आपले दोन शिष्ये बरोबर घेऊन, तो कणभूतीकडे गेला, व पैशाची भाषेंत त्यानें ज्या सात गोष्टी सांगितल्या, त्या त्यानें श्रवण केल्या. पुढें, ह्या सर्व गोष्टी त्यानें पद्यांत रचून, त्या एक लक्ष श्लोकांत आपल्या रक्तानें लिहिल्या आणि शातवाहन राजाकडे पाठविल्या. परंतु, त्यानें त्यांचा अंगिकार केला नाहीं. सबब, गुणाढ्यानें त्यापैकीं सहा कथा भस्मसात् केल्या. मात्र जी एक राहिली, तिचें परिशीलन (गुणदेव आणि नन्दिदेव यांच्या साहाय्यानें) राजानें करून, तिला पैशाची भाषेंतच एक प्रस्तावनाही लिहिली. गुणाढ्याचा काल इ. स. चें सहावें[१] शतक असावें, असें वाटतें.

गुणाढ्यकृत बृहत्कथा पैशाची भाषेंतच असल्या कार-

---

१ मॉक्समुलरकृत "भरतखंडापासून मिळणारें शिक्षण." पान ३५७-८ १८८३. वेबरकृत संस्कृत वाङ्मयाचा इतिहास. पान २१३, १८८२.

क्षेमेन्द्रकृत बृहत्कथा-मंजरी.

णानें, त्या समजण्याची मोठी पंचाईत पडूं लागली. सबब, क्षेमेन्द्रानें त्यांजवर संस्कृत परिधान घालून, त्यांजला बरेंच सजविलें, आणि नांवारूपास आणिलें. ह्यानें आपल्या कृतीचें नामधेय बृहत्कथामंजरी ठेविलें असून, तो म्हणतो कीं, हें कथानक प्रथमतः शर्वानें शंकरानें) पार्वतीस प्रकट केलें. तेंच पुष्पदन्तानें ऐकिलें. त्यानें वररुचि होऊन, ह्या भूतलावर कणभूति पिशाचास सांगितलें. ह्यानें तें गुणाढ्यास विदित केलें, आणि गुणाढ्यानें पुनश्च आपले शिष्यद्वय गुणदेव व नन्दिदेव, आणि राजा शातवाहन, यांस तें लिहून कळाविलें. क्षेमेन्द्राचा[1] काल इ. स. चें अकरावें शतक होय.

सोमदेवकृत कथासरित्सागर.

सोमदेवानें देखील गुणाढ्याच्या पैशाची बृहत्कथांसच संस्कृतांत सजविलें, असें म्हणण्यास हरकत नाहीं. ह्याचा काल इ. स. चें बारावें शतक असल्यामुळें, हा क्षेमेन्द्रानंतरचा होय. आणि म्हणूनच ह्याची " कथासरित्सागर " नांवाची कृति क्षेमेन्द्राच्या बृहत्कथामंजरीवरूनच तयार होण्याचा विशेष संभव दिसतो. तथापि, डाक्तर बुल्हरचें[2] असें मत आहे कीं, सोमदेवानें क्षेमेन्द्राची

---

१ ह्यालाच क्षेमकर व क्षेमेन्द्र व्यासदास, असें ही म्हणतात. (J. R. A. S. By. 1877. P. 46 ). संस्कृत वाङ्मयाचा इतिहास. वेबर. पान २१३.

२ Indian Antiquary. 1872. P. 307

मदत न घेतां, मूळ पैशाची बृहत्कथेवरूनच, त्यानें आपली कृति तयार केली असावी. असो. कथासरित्सागरांतील गोष्टी, काश्मीरचा राजा जो श्रीहर्ष त्याच्या सूर्यवती नामक मातुःश्रीचें सान्त्वन करण्यासाठींच, सोमदेवाकडून तयार करविल्या असल्याचें दिसतें. कारण, तिचा पुत्र इ. स. ११०१ सालीं मारला गेल्यामुळें, तिला निःसीम दुःख झालें होतें; आणि ह्या तिच्या शोकापहरणार्थच हा प्रयत्न होता, यांत संशय नाहीं.

अन्य उपाख्यानें व हिंदूच्या कल्पितकथापासून पाश्चात्यकथानकाची वाढ.

उपाख्यानांपैकीं सिंहासनद्वात्रिंशिका (सिंहासन बत्तिशी),[1] वेतालपंचविंशति ( वेतालपंचविशी ), विक्रमचरित्र, शत्रुंजयमाहात्म्य,[2] वीरचरित्र,[3] विक्रमांकचरित्र,[4] भोजप्रबंध,[5] इत्यादि सर्वश्रुत असे पुष्कळ ग्रंथ असून, ह्या व अन्य कल्पित कथांवरून, आर्यहिंदूंची विशाळ कल्पना, तिची विलक्षण रमणीयता, आणि तिचें चारुसौन्दर्य, इत्यादि चांगल्या रीतीनें व्यक्त होतें. एवढेंच नव्हे

१ कर्ता वररुचि इ. स. पू. ५६.
Journal Asiatic. 1844. P. 356.

२ हें वलभ लिपींत, शिलादित्य राजाच्या कारकीर्दींत, ह्मणजे इ. स. च्या सहाव्या शतकाच्या अखेरीस, धनेश्वरानें रचलें. ह्याचे १४ सर्ग आहेत.

३ अनन्तकृत.

४ बिल्हणकृत. ह्याचे १८ सर्ग असून, तें इ. स. १०८५ सालीं रचलें असावें, असें कित्येक विद्वानांचें ह्मणणें आहे.

५ राजा भोजकृत इ. स. १०४०–१०९०.

तर, पाश्चिमात्य व पौरस्त्य राष्ट्रांत ज्या ज्या कल्पित कथानकांचा, व नामांकित कादंबऱ्यांचा विशेष फैलाव झालेला दृष्टीस पडतो, त्या सर्वांचें मूळ आणि आदिनिर्झर केवळ भरतखंडच असल्याचें दिसतें. फार तर काय सांगावें पण, काल्पनिक सृष्टि व विलासलावण्य, रमणीयता आणि माधुर्य, सौकुमार्य व सौजन्य, इत्यादि मोहक गुणांचे अग्रेसर हिंदूच होत, असें ही पाश्चात्य पंडितांस कबूल करावें लागतें.

आतां, सदरीं निर्दिष्ट केल्या कृतीखेरीज, जीं कित्येक

---

१ ही गोष्ट पाश्चात्य विद्वानांस देखील कबूल करणें भाग पडतें. ह्यासंबंधानें वेबर ह्मणतो,

" Allied to the fables are Fairy Tales and Romances in which the luxuriant fancy of the Hindus, in the most wonderful degree put forth all its peculiar grace and charm......They are sufficiently marked out as the *orginal source* of most of the Arbian. Persian, and Western fairy tales and stories.

( History. Indian Literature. P. P. 212-13 )

त्याच प्रमाणें होरेस विल्सननें सुद्धां एके ठिकाणीं असें ह्मटलें आहे कीं,

'Much of the invention displayed in the revival of letters in Europe was referable to an Indian origin; that enough has been ascertained to determine the actual existence in Sanskrit or in vernacular translation from it of a very extensive literature of fiction in which many of our European acquaintances are at once to be recognised; and that the Hindus occupy an early and prominent place in the history of fiction.'

इतर काव्यें.

सुप्रसिद्ध महाकाव्यें व काव्यें राहिलीं, त्यांची थोडीशी हकीकत देऊन, शास्त्र व कलाविषयक ग्रंथाकडे यथावकाश वळूं.

भट्टिकाव्य.

भट्टिकृत भट्टिकाव्य; इ. स. चें सहावें शतक. हा भट्टि भर्तृहरीचा मुलगा असल्याविषयीं, कित्येकांचें मत आहे. कित्येक हा भट्टिच भर्तृहरि होय, असें मानतात. कांहींचा असा अभिप्राय आहे कीं, इ. स. पूर्वी ५६ सालीं जो नामांकित विक्रमादित्य होऊन गेला, त्याचाच हा बंधु होता. आणि कित्येक असें समजतात कीं, श्रीधरसेन राजाच्या कारकीर्दींत, इ. स. च्या सहाव्या किंवा सातव्या शतकांतच भर्तृहरी झाला. असो; भट्टिकाव्याला रावणवधही म्हणतात. ह्यांत रामचन्द्राचा कथाभाग असून, ह्याच्या बावीस सर्गांत व्याकरणसंबंधीं विवेचन आहे.

माघकाव्य.

माघकृत माघकाव्य; इ. स. चें दहावें शतक. ह्यांत शिशुपालाच्या वधाचें वर्णन असून, ह्याचे एकंदर २२ सर्ग आहेत. या कवीच्या बापाचें नांव दत्तक होतें, व ह्याचा सुप्रभदेव नांवाचा आजा श्रीधर्मनाभ राजाच्या पदरीं प्रधान असे.

माघ कवींत उपमा, अर्थगौरव, आणि पदलालित्य, असे तिन्ही गुण असल्याविषयीं ख्याति आहे.

उपमा कालिदासस्य । भारवेरर्थगौरवम् ।
दंडिनः पदलालित्यम् । माघे सन्ति त्रयो गुणाः ॥

भारविकृत किरातार्जुनीयम्; इ. स. चें दहावें शतक. हा कवि अर्थगौरवांत निष्णात असल्याचें वरील श्लोकावरून व्यक्त होतें.

किरातार्जुनीयम्.

कविराजकृत राघवपांडवीयम्; इ. स. चें अकरावें शतक. हें काव्य सर्वमान्य असून, त्यांतील शब्दयोजना अशी कांहीं चमत्कारिक केली आहे कीं, तेच ते शब्द रामायण व व महाभारतांतील कथानकांकडे एकसारखेच लागू पडतात.

राघव पांडवीयम्.

श्रीहर्षकृत नैषधीय काव्य; इ. स. चें बारावें शतक. ह्याचे एकंदर बावीस सर्ग आहेत.

नैषधीयम्.

संस्कृत वाङ्मयांत, कामुक काव्यें बरींच दृग्गोचर होतात. तथापि, त्यांतही सर्वांस मशहूर आणि नांवाजण्यालायक अशीं थोडींच आहेत. १ भर्तृहरिकृत शृंगारशतक; २ जयदेवकृत गीतगोविन्द; ३ जगन्नाथरायकृत भामिनीविलास; इत्यादि.

कामुक काव्यें.

भर्तृहरीचा काल अजून वादग्रस्तच आहे; व त्यामुळें, तो इ. स. पू. ५६ सालच्या सुमारास, अथवा इ. स. च्या सहाव्या किंवा सातव्या शतकांत उदयास आला असल्याबद्दल कित्येकांची समजूत आहे. नीतिशतक आणि वैराग्यशतक, अशा ह्याच्याच दोन सुप्रसिद्ध कृती होत. जयदेव कवि हा गौड देशाचा राजा जो लक्ष्मणसेन, त्याच्या कारकीर्दींत, इ. स. १११६ मध्यें प्रसिद्धीस आला होता. आणि जगन्नाथराय हा शहाजहान बादशा-

ह्याच्या (इ. स. १६२७-१६९८) वेळचा होय; व कित्येक प्राक्कालीन कथानकांवरून तर, तो अकबराच्यावेळीं देखील असावा, असें वाटतें. हा तैलंगण ब्राह्मण असून, ह्याच्या बापाचें नांव पेरंभट व आईचें नांव लक्ष्मी होतें. भामिनीविलासाशिवाय ह्याचे अन्य ग्रंथ म्हटले म्हणजे १ लक्ष्मीलहरी[1], २ सुधालहरी[2], ३ अमृतलहरी[3], ४ पीयूषलहरी[4], ५ करुणालहरी[5], ६ प्राणाभरण[6], ७ जगदाभरण[7], ८ असफविलास[8], ९ यमुनावर्णन, १० मनोरमाकुचमर्दन[9], ११ रसगंगाधर[10], १२ चित्रमीमांसाखंडन[11], १३ शशिसेन[12], आणि १४ पंडितराजशतक, असे आहेत.

---

१ लक्ष्मीस्तुतिपरकाव्य. २ सूर्य स्तुतिपर काव्य. ३ यमुनानदी स्तुतिविषयक काव्य. ४ गंगालहरी. ५ विष्णुकाव्य. ६ प्राणनारायण नांवाच्या कामरूप येथील राजाचें वर्णनात्मक काव्य. ७ दाराच्या स्तुतिपर काव्य. ८ ही कृति गद्य असून, असफखान वर्णनात्मक आहे. ९ भट्टोजी दीक्षितांची सिद्धांतकौमुदीवर जी मनोरमा नांवाची वृत्ति आहे, तिजवर ही टीका होय. १० हा अलंकारावर ग्रंथ आहे. ११ रसगंगाधरे चित्रमीमांसायामयोदिता । येदोषास्तेऽत्रसंक्षिप्य कथ्यन्ते विदुषांमुदे ॥ १२ हें प्राकृत काव्य आहे.

# भाग ६६ वा.

## शास्त्र-विषयक-ग्रंथभांडार.

## व्याकरणशास्त्र.

काव्यानन्तर भाषेच्या संबंधानें विशेष महत्वाचे ग्रंथ म्हटले म्हणजे १ व्याकरण, २ अलंकार, व ३ कोश, हे होत. सबब, ह्यांचें यथानुक्रम विवेचन करूं.

भाषाविषयक ग्रंथ.

ह्या भूतलावरील अखिल वैयाकरणांत, सर्वांनीं नांवाजलेला आणि निःसंशय श्रेष्ठतम वैयाकरण म्हटला म्हणजे पाणिनीच होय. ह्याच्या अद्वितीय बुध्दिमत्तेची व प्रचंड कल्पकतेची जेवढी म्हणून तारीफ करावी तेवढी थोडीच. कारण, ह्यानें संस्कृत भाषेंतील एकंदर शब्दांचें शास्त्रीय विवेचन, त्यांचें यथोचित नियमन, त्यांचें संक्षिप्त वर्णन, आणि त्यांची मूळ उत्पत्ति, यांविषयींचा तपशिलवार विचार केला आहे.

पाणिनी.

**येनधौतागिरः पुंसां विमलैः शब्दवारिभिः।**
**तमश्चाज्ञानजंभिन्नं तस्मै पाणिनयेनमः॥**

१ येथें फक्त तीनच अंगांचा विचार केला असून, एकंदर भाषाविषयक संक्षिप्त इतिहास आम्ही भाषाशास्त्रांत दिला आहे. ( ग्रंथकर्त्यांचें भाषाशास्त्र पहा. )

त्याचा काल.

पाणिनि हा फारच पुरातन आहे. तथापि, त्याच्या काळाविषयीं पौरस्त्य व पाश्चात्य[1] विद्वानांत बराच मतभेद असल्याचें दिसतें. कारण पाश्चात्याच्या समजुतीप्रमाणें, हा इ. स. पूर्वी ३५० वर्षे उदयास आला असून, डाक्तर रामकृष्ण[2] गोपाळ भांडारकर यांचा अभिप्राय असा आहे कीं, तो इ. स. पूर्वी ७०० वर्षे झाला असावा. पंडित सत्यव्रतसामाश्रमी[3] तर पाणिनीला याहीपेक्षां पुराणतर समजतात, आणि तो इ. स. पूर्वी २४०० वर्षांच्या सुमारास झाला असल्याचें ह्मणतात.

पाणिनीच्या पूर्वीचे वैयाकरण.

परंतु, पाणिनीच्याही पूर्वी शाकल्य, गार्ग्य, काश्यप, गालव, आपिशालि, भारद्वाज, आश्वलायन, स्फोटायन, चक्रवर्मा, शाकटायन, इत्यादि अनेक वैयाकरण होऊन गेले होते, यांत बिलकुल शंका नाहीं. कारण, प्रसंगविशेषीं, व आधारादाखल म्हणून, पाणिनीनें ह्यांच्या नांवाचा उल्लेख वारंवार केला आहे. शिवाय, पाणिनीच्या अष्टाध्यायिवर टीका करतांना, इन्द्र, चन्द्र, काशकृत्स्न, आपिशालि, शाकटायन, अमर, जिनेन्द्र, वगैरे वैयाकरणांचीं वचनें देखील ठिकठिकाणीं नमुद केलेलीं आढळतात. ह्यावरून, सदरहू सर्व ग्रंथकार प्रमाणभूत असल्याचेंच निर्विवाद ठरतें.

---

१ वेबरकृत संस्कृत वाङ्मयाचा इतिहास.

२ डा. भांडारकर कृत दक्षिणचा इतिहास.

३ पंडित सत्यव्रतसामाश्रमिप्रकाशित निरुक्त. ( भाग ६. प्र. ७. पा. जि–शि. )

पाणिनीचा व्याकरणावरील सुप्रसिध्द ग्रंथ म्हटला म्हणजे अष्टाध्यायी होय. अर्थात्, ह्या ग्रंथाचीं आठ प्रकरणें किंवा आठ अध्याय असल्यामुळें, त्याला हें अन्वर्थ नांव पडलें असून, त्यांत सुमारें ३९९६ सूत्रें आहेत. ह्या सूत्रांत, एकंदर विषयांचें विवेचन संक्षेपानेंच केलेलें आहे. त्यायोगानें तीं फार कठिण व समजण्यास दुर्बोध आहेत.

अष्टाध्यायी.

तथापि, हें दुर्बोधत्व मोडण्यासाठीं, अनेक विद्वान वैयाकरणांनीं केवळ परोपकार बुद्धीनें, आणि ह्या ज्ञानोदधीचा सर्वांस सारखाच उपयोग व्हावा एतदर्थ, अनेक प्रकारें बहुत परिश्रम व दीर्घोद्योग केला असल्याचें दिसतें. सबब, तत्संबंधीं अवश्य ती हकीकत येथें थोडक्यांत देतों.

कात्यायन[1] हा एक नांवाजलेला वैयाकरण होऊन गेला. ह्यानें पाणिनीच्या सूत्रांवर अनेक वार्तिकें केलीं असून, यांचा मुख्य हेतु म्हटला म्हणजे, शास्त्रीय शोधास अनुसरून पाणिनीय व्याकरणात अवश्य ती सुधारणा करावी, इतकाच होता. त्यामुळें, कात्यायनास ज्या ज्या ठिकाणीं न्यूनता भासली, त्या त्या ठिकाणीं त्यानें विशेष ऊहापोह करून ती भरून काढिली. जेथें त्याला चूक दिसली, तेथें ती त्यानें दुरुस्त केली. आणि कित्येक ठिकाणीं तर त्यानें विस्तृत टीकाही दिली. तात्पर्य. " उक्ता-

कात्यायन व त्याचीं पाणिनीवरील सूत्रें.

---

१ ह्याचा काल इ. स. पूर्वी २०० वर्षे असावा, असें वाटतें.

२८

नुक्त दुरुक्तार्थव्यक्तिकारि तुवार्त्तिकम्" म्हणून जी वार्तिकाची व्याख्या आहे तीस अनुसरून, कात्यायनानें आपल्या समजुतीप्रमाणें सर्व कांहीं तजवीज केली असल्याचें दिसतें.

जयादित्यानें काशिकावृत्ति नांवाची टीका पाणिनीवर केली आहे; व ह्या जयादित्यालाच वामन जयादित्य असेंही म्हणतात.

जयादित्याची पाणिनीवरील टीका.

हरदत्तमिश्राची काशिकावृत्तीवर टीका आहे, आणि हीच पदमंजरी नांवानें सुप्रसिद्ध आहे.

जिनेन्द्राची सुद्धां काशिकावृत्तीवर टीका आहे, व तिला न्यास किंवा काशिकावृत्तिपंजिका म्हणतात. हिच्यावरच रक्षिताची टीका आहे.

नागोजी भट्ट, पुरुषोत्तम, व भट्टोजी-

नागोजी भट्टाची पाणिनीवर वृत्तिसंग्रह नांवाची टीका आहे.

पुरुषोत्तम देवाची देखील पाणिनीवर भाषावृत्ति नांवाची टीका आहे. मात्र, हींत वेदकालीन भाषेचें नियमन सांगितलेलें नाहीं.

दीक्षित, यांची पाणिनीवरील टीका.

सृष्टिधरानें भाषावृत्यर्थविवृत्ति नांवाचें भाष्य पुरुषोत्तम देवाच्या सदरीं नमुद केलेल्या टीकेवर केलें आहे.

भट्टोजी दीक्षितानें शब्दकौस्तुभ नांवाचें भाष्य पाणिनीवर केलें आहे. परंतु, हें अपुरें असल्याचें कळून येतें.

वैद्यनाथ पायगुंड उर्फ बाळंभट्ट यानें शब्दकौस्तुभावर प्रभा नांवाची टीका केली आहे.

सर्वांत श्रेष्ठ आणि नांवाजलेला भाष्यकार पतंजलिच[1] होय.

पतंजलीचें पाणिनीवरील भाष्य.

ह्याची पाणिनीय व्याकरणावरील टीका महाभाष्य नांवानें सर्वांसच महशूर आहे. व्याकरण ग्रंथावर एवढें मोठें भाष्य अन्य कोणाचेंही नाहीं.

कैय्यटानें[2], महाभाष्य प्रदीप नांवाची व्याख्या, पतंजलीचें महाभाष्य सुगम व्हावें म्हणून केली आहे.

अन्य टीकाकार, व वैयाकरण.

नागोजी भट्टानें भाष्यप्रदीपद्योत नांवाची टीका कैय्यटकृत महाभाष्यप्रदीपावर केली आहे.

ईश्वरानन्दानें देखील अशाच प्रकारची भाष्यप्रदीपविवरण नांवाची टीका कैय्यटाच्या सदरीं नमुद केलेल्या व्याकरण ग्रंथावर केली आहे.

रामचन्द्र आचार्यानें प्रक्रिया कौमुदी नांवाचें व्याकरण

रामचन्द्र आचार्य.

रचलें असून, त्यांत पाणिनींतल्या नियमांचा उपयोग केला आहे. तथापि, ह्या व्याकरणाची रचना आणि त्यांतील विवरणपद्धति हीं पाणिनीहून अगदीं भिन्न आहेत, ही गोष्ट कोणालाही कबूल केली पाहिजे.

विठ्ठलआचार्यांचें प्रक्रिया कौमुदीवर प्रसाद नांवाचें भाष्य आहे.

---

१ काल इ. स. पू. १४३ वर्षें. २ इ. स. चें सातवें शतक.
( वेबरकृत संस्कृत वाङ्मयाचा इतिहास. पान. २२३ )

कृष्ण पंडितांचेंही प्रक्रियाकौमुदीवर भाष्य आहे.

जयन्तानें सुद्धां प्रक्रियाकौमुदीवर टीका केली असून, तिचें नांव तत्त्वचन्द्र आहे. ही कृष्ण पंडिताच्या भाष्याचें केवळ सारच आहे, असेंही म्हटलें असतां चालेल.

भट्टोजी दीक्षित व सिद्धान्तकौमुदी.

भट्टोजीदीक्षितानें प्रक्रियाकौमुदीच्या पद्धतीवर सिद्धान्त कौमुदी नांवाचें व्याकरण केलें आहे. अर्थात्, हें प्रक्रियेपेक्षां जास्त समग्र व निर्दोष आहे, यांत शंका नाहीं.

मनोरमा.

भट्टोजीदीक्षितांची सिद्धांतकौमुदीवर मनोरमा अथवा प्रौढ मनोरमा नांवाची टीका आहे.

ज्ञानेन्द्रसरस्वतीनें देखील तत्वबोधिनी नांवाची टीका सिद्धांतकौमुदीवर केली आहे.

शब्देन्दुशेखर.

नागोजी ऊर्फ नागेशभट्ट यांचेंही सिद्धांतकौमुदीवर शब्देन्दुशेखर नांवाचें भाष्य आहे; व ह्याचाच सारांश लघुशब्देन्दु-शेखर या नांवानें सुप्रसिद्ध आहे.

वैद्यनाथ पायगुंडाचें लघुशब्देन्दुशेखरावर भाष्य असून, तें चिदस्थिमाला या नामधेयानें मशहूर आहे.

हरिदीक्षितानें भट्टोजी दीक्षितांच्या मनोरमा नामक भाष्यावर शब्दरत्न नांवाची टीका केली आहे, आणि हिचेंच सार काढलेला असा लघुशब्दरत्न नांवाचा ग्रंथही सुप्रसिद्ध आहे.

वैद्यनाथपायगुंडानें हरिदीक्षितकृत शब्दरत्नावर देखील एक भाष्य केलें आहे.

परिभाषा.

वरद राजानें मध्यकौमुदी नांवाचा एक व्याकरण ग्रंथ केला असून, त्यांत सिद्धांतकौमुदीचें सार काढलें आहे. ह्या खेरीज मध्यमनोरमा, लघुकौमुदी, परिभाषा, इत्यादि अनेक संक्षिप्त ग्रंथही व्याकरणावर आहेत.

शीरदेवाची परिभाषा ग्रंथावर परिभाषावृत्ति नांवाची टीका आहे.

भास्करभट्टानें लघुपरिभाषावृति नांवाचें भाष्य परिभाषावृत्तीवर केलें आहे. ह्यावरच परिभाषार्थसंग्रह म्हणून दुसरें भाष्य असून, हिच्यावर चन्द्रिका नांवाची स्वयंप्रकाशनन्दानें टीका केली आहे.

परिभाषेन्दुशेखर.

ह्याशिवाय, नागेशभट्टानें सुद्धां परिभाषेन्दुशेखर नांवाची वृत्ति परिभाषेवर केली आहे; व हिच्यावरच परिभाषेन्दुशेखर काशिका नामक टीका वैद्यनाथ पायगुंडाची आहे.

कारिका ग्रंथांत महाभाष्य, काशिकावृत्ति, इत्यादींतील व्याकरणविषयक नियम छन्दोबद्ध लिहिलेले आहेत.

भर्तृहरिकृत वाक्यप्रदीप.

भर्तृहरीचा वाक्यप्रदीप नांवाचा ग्रंथ सुप्रसिद्ध असून, त्यांत कारकप्रक्रियेचें विवेचन यथार्थ केलें आहे. हा देखील छन्दोबद्धच आहे, आणि त्याला हरिकारिका पण म्हणतात.

कोंडभट्टांच्या वैयाकरणभूषणांतही वाक्यरचना व व्या-

करणतत्व यांविषयींची मीमांसा आहे; आणि त्याजवर भूषणसारदर्पण नांवाचें हरिवल्लभाचें भाष्य आहे. वैयाकरणभूषणसार हें याचेंच सार होय; व ह्याजवर लघुभूषणकांति नांवाचें वैद्यनाथ पायगुंडानें केलेलें भाष्य आहे.

नागेशभट्टाच्या वैयाकरणसिद्धान्तमंजूषेंत वाक्यरचना आणि व्याकरणतत्व यांचें विवेचन आहे; व लघुवैयाकरण सिद्धान्तमंजूषा हें तिचें सार आहे. हिच्यावरच वैद्यनाथ पायगुंडानें कळा नांवाची टीका केली आहे.

गणपाठ, धातुपाठ, वृत्ति, व शिक्षा.

गणपाठ, गणरत्नमहोदधि, पाणिनिकृत धातुपाठ, मैत्रेय रक्षितकृत धातुप्रदीप अथवा तंत्रप्रदीप, सायणकृत माधवीयवृत्ति, भट्टिकाव्य, पाणिनिकृत शिक्षा, पाणिनीयमतदर्पण, यनूलुगन्त शिरोमणि, इत्यादि व्याकरणविषयकच ग्रंथ होत.

सरस्वती प्रक्रिया.

अनुभूति स्वरूपाचार्याचें सरस्वती प्रक्रिया नांवाचें व्याकरण सुप्रसिद्ध आहे. हें उत्तर हिंदुस्थानांतच विशेषेंकरून प्रचारांत असल्याचें कळून येतें. ह्यांत सातशें सूत्रें असून, तीं सरस्वतीपासून प्राप्त झालीं असल्याविषयीं आख्यायिका आहे. ह्या व्याकरणावर पुंजराज व महीभट्ट यांचें भाष्य आहे, आणि सिद्धान्तचंद्रिका व पदचन्द्रिका नांवाच्या अन्य टीकाही आहेत.

हैमव्याकरण.

हेमचन्द्र अथवा हेमसूरीचें हैमव्याकरण जैन लोकांत विशेष उपयोगांत आणितात. कदाचित्, शब्दानुशासनावर लघु-

वृत्ति नांवाची जी टीका आहे, तीच हें होय, असें वाटतें. ह्याचे एकंदर आठ भाग असून, शेवटल्यांत प्राकृत भाषेचें विवेचन आहे. ह्यावर एक भाष्यही आहे; परंतु भाष्यकाराचें नांव कळत नाहीं.

शब्दानुशासन.

अभिनव शाकटायनाचा देखील शब्दानुशासन नांवाचा एक ग्रंथ असल्याचें दिसतें. कारण, त्याचा उल्लेख कामधेनूंत केला आहे.

कातंत्र-

कातंत्र व्याकरण बंगाल्यांत प्रचारांत आहे. ह्यालाच कलाप अशी संज्ञा असून, ह्यांतील सूत्रें कुमार देवानें रचलीं असल्याविषयीं आख्यायिका आहे.

दुर्गसिंहानें दौर्गसिंही नांवाची टीका कातंत्रावर केली आहे. तथापि, तिच्यांतील प्रास्ताविक श्लोकावरून, ही कृति सर्ववर्म्याची असल्याचें दिसतें; आणि त्याचा उल्लेख वोपदेवकृत कामधेनूंतही केला आहे. कातंत्रावर वर्धमान मिश्राचा कातंत्र विस्तार नामक आणखी एक ग्रंथ आहे.

कातंत्रावरील भाष्यें, व भाष्यकार.

कातंत्रावर आणखी देखील अनेक भाष्यें खालीं लिहिल्याप्रमाणें आहेत.

१ त्रिलोचनदासकृत कातंत्रपंजिका. २ रघुनंदन आचार्य शिरोमणिकृत कलापतत्वार्णव. ३ कातंत्र चंद्रिका. ४ वररुचिकृत चैत्रकुटी. ५ हरिराम चक्रवर्तीकृत व्याख्यासार. व ६ रामदासकृत व्याख्यासार.

ह्याखेरीज, सुषेण, कविराज, रामनाथ, उमापति, कुलचन्द्र, आणि मुरारि, यांच्याही कातंत्रावर टीका आहेत.

दौर्गसिंहीवर कातंत्रवृत्तिटीका नांवाचें भाष्य आहे, व तें दुर्गसिंहानें केलें आहे. शिवाय, हिच्यावर दुर्गगुप्तकृत दुर्गटीका, म्हणूनही एक ग्रंथ असल्याचें कामधेनूवरून कळून येतें.

कातंत्र परिशिष्ट,

श्रीपतिदत्तानें कातंत्राचें एक परिशिष्ट केलें आहे. ह्याला कातंत्रपरिशिष्ट म्हणतात, व ह्यावरच गोपिनाथाचें परिशिष्टप्रबोध नांवाचें भाष्य आहे, आणि शिवराम चक्रवर्तीची परिशिष्टसिद्धांत रत्नाकर नांवाची टीकाही आहे.

कात्रंगणधातु,

कातंत्रगणधातु या नांवाचाही एक व्याकरणविषयक ग्रंथ आहे. ह्याजवर रमानाथाची टीका असून, तिला मनोरमा म्हणतात.

व अन्य ग्रंथ.

कातंत्रव्याकरणविषयक ग्रंथ आणखी देखील आहेत. सबब, त्यांचा तपशील येथें देतों.

१ रहसनन्दीकृत कातंत्रषट्कारक. २ शिवदासकृत कातंत्रउणादिवृत्ति. ३ कातंत्र चतुष्टयप्रदीप. ४ कातंत्र धातुघोषा. ५ कातंत्र शब्दमाला, इत्यादि.

संक्षिप्तसार, व जौमर.

क्रमदीश्वरानें संक्षिप्तसार नांवाचें एक व्याकरण केलें आहे. परंतु, ह्यांत कित्येक ठिकाणीं दोष असल्यामुळें, जुमरन-

न्दीनें त्यांत दुरुस्ती केल्याचें दिसतें. ह्यालाच **जौमर** असें म्हणतात, व तें **बंगाल्यांत** प्रचारांत आहे. **संक्षिप्तसारावर, दुर्घटवटन** नांवाची टीका आहे.

ह्याच व्याकरणावर **गोपाल चक्रवर्तीची** व **गोयीचन्द्राची** टीका आहे, आणि हिजवर **न्यायपंचाननाचें** व्याकार-**दीपिका** नांवाचें भाष्य आहे. याखेरीज, **वंशीवदनाची** देखील तिजवर टीका आहे.

जुमरनन्दीच्या व्याकरणालाच **गोयीचन्द्रानें** एक परि-शिष्ट जोडलें आहे; व **शब्दघोषा** आणि **धातुघोषा**, हे तद्वि-षयक दुसरे ग्रंथ आहेत.

असो. व्याकरणावरील अन्य ग्रंथांत, वोपदेवाचें व्याक-रण विशेष सुप्रसिद्ध आहे. ह्यालाच **मुग्धबोध** असें ह्मणतात, आणि **बंगाल्यांत** त्याचें अध्ययन फार

वोपदेवकृत मुग्धबोध व त्यावरील भाष्यें.

लोक करितात. ह्याजवर, **रामानन्द, रामतर्कवागीश,** मधुसू-दन, **देवीदास, रामभद्र, रामप्रसादतर्कवागीश, श्रीवल्लभा-चार्य, दयारामवाचस्पति, भोलानाथ, कार्तिक सिद्धान्त रतिकांत, तर्कवागीश, गोविंदराम, खुद्दवोपदेव,** इत्यादींचें निरानिराळें भाष्य आहे. शिवाय, **छाटा** नांवाची कोणी एक **मिश्राची,** व **सुबोधिनी** नामक **दुर्गादासाची,** ह्याजवरच टीका आहे.

**काशीश्वरानें मुग्धबोधावर** एक परिशिष्ट केलें आहे, व त्याला **मुग्धबोध परिशिष्ट** म्हणतात. याखेरीज, **नन्दकिशोराचें** ही त्या-जवर एक **परिशिष्ट** आहे.

मुग्धबोध परिशिष्ट.

बोपदेवानें विल्हेवारीप्रमाणें सर्व धातूंची यादी करून, तीं श्लोकबद्ध रचली आहे, व हिला कविकल्पद्रुम म्हणतात. ह्याजवर, काव्यकामधेनु नांवाचें ह्याचेंच भाष्य आहे; आणि धातुदीपिका म्हणून दुर्गादासाची व कविकल्पद्रुमव्याख्या नांवाची रामन्यायालंकाराची टीका आहे.

कविकल्पद्रुम, व काव्यकामधेनु.

धातुरत्नावली नांवाची, राधाकृष्णानें देखील एकंदर धातूंची एक श्लोकबध्द नामावली रचली आहे.

कविरहस्यांत, हलायुधानें क्रियापदाचीं रूपें दाखविलीं असून, हा ग्रंथ श्लोकबद्ध आहे, व ह्याजवर एक टीका सुद्धां झाली आहे.

कविरहस्य.

पद्मनाभदत्ताचें सुपद्म नांवाचें आणखी एक व्याकरण आहे. ह्याचा उपयोग बंगाल्यांतल्या कांहीं भागांत मात्र करण्यांत येतो. ह्याजवर विष्णुमिश्राचें भाष्य आहे, आणि त्याला मकरन्द अथवा सुपद्ममकरन्द म्हणतात. याखेरीज, कन्दर्पसिद्धान्त, काशीश्वर, श्रीधरचक्रवर्ती, व रामचन्द्र, यांच्या सुद्धां त्याजवर टीका आहेत. ह्याचेंच एक परिशिष्ट आहे, व तें सुपद्मपरिशिष्ट नांवानें महशूर आहे.

सुपद्म, व अन्य ग्रंथ.

ह्याच व्याकरणासंबंधानें जे अन्य ग्रंथ आहेत, ते खालीं लिहिल्याप्रमाणें होत. १ पद्मनाभदत्तकृत सुपद्मधातुपाठ; २ परिभाषा; ३ उणादिवृत्ति; ( हे दोन्ही ग्रंथ पद्मनाभ-

दत्ताचेच आहेत ); ४ काशीश्वरगण; ५ ह्याजवरील रमाकांन्तकृतभाष्य; इत्यादि.

रत्नमाला, वगैरे व्याकरणें.

पुरुषोत्तमाचें रत्नमाला नांवाचें व्याकरण कामरूप प्रांतांत ( बंगालच्या पूर्वेस ) चालतें.

भरतमल्लाचें द्रुतबोध नांवाचेंही एक व्याकरण असून, त्याजवर त्याचीच टीका आहे. परंतु हें फारसें प्रचारांत नाहीं.

रामेश्वराचें शुद्धसुबोध नांवाचें व्याकरण, व त्याजवरील त्याची टीका, हीं देखील विशेष उपयोगांत नाहींत.

जीवगोस्वामीनें हरिनामामृत नांवाचें व्याकरण रचलें आहे. ह्यावर एक भाष्य आहे.

चैतन्यामृत नांवाचेंही आणखी एक व्याकरण टीकेसहित आहे.

रामनारायणाचें कारिकावली नांवाचें व्याकरण असून, तें श्लोकबद्ध आहे. तसेंच, बलराम पंचाननकृत प्रबोधप्रकाश, विमलसरस्वतीकृत रूपमाला, आशुबोध, लघुबोध, शिघ्रबोध, सारामृत, दिव्य, पदावली, उल्का, काशीश्वरकृत ज्ञानामृत, इत्यादि अनेक व्याकरणें आहेत.

प्रमाणभूत मानलेले वैयाकरण आणि ग्रंथ.

माधवीय वृत्तींत खालीं लिहिलेले वैयाकरण प्रमाणभूत म्हणून आढळून येतात. १ चन्द्र, २ आपिशालि, ३ शाकटायन, ४ आत्रेय, ५ धनपाल, ६ कौ-

शिक, ७ पुरुषकार, ८ सुधाकार, ९ मधुसूदन, १० यादव, ११ भागुरि, १२ अभिद्र, १३ शिवदेव, १४ रामदेव-मिश्र, १५ देव, १६ नन्दी, १७ राम, १८ भीम, १९ भोज, २० हेलराज, २१ सुभूतिचंद्र, २२ पूर्णचन्द्र, २३ यज्ञनारायण, २४ कण्व, २५ स्वामी, २६ केशवस्वामी, २७ शिवस्वामी, २८ धुर्तस्वामी, व २९ क्षीरस्वामी. प्रसाद ग्रंथावरून, हा क्षीरस्वामी, क्षीरतरंगिणीचा कर्ता असल्याचें दिसतें. आणि माधवीयवृत्तीवरून, तरंगिणी, आभरण, शाब्दिकाभरण, समन्ता, प्रक्रियारत्न, व प्रदीप, याचाही वारंवार इतल्ला केल्याचें आढळन येतें. त्याचप्रमाणें, धातु-पारायण, व्याघ्रभूति आणि व्याघ्रपाद यांचीं वार्तिकें, कुशलकृत पंजिकाप्रदीप, भोजदेवकृत सरस्वतीकंठाभरण, वोमदेवकृत रामव्याकरण, व दुर्गादासकृत धातुदीपिकेंत आलेले भट्टमल्ल, गोविंदभट, चतुर्भुज, गदिसिंह, गोवर्धन, शरणदेव, इत्यादींचा ठिकठिकाणीं आधार घेतला असल्याचें दृग्गोचर होतें.

तद्विषयक पाश्चात्यमत.

व्याकरणशास्त्रात आमची प्रगति फारच प्राचीन काळापासून असून, त्यासंबंधानें पाश्चात्य विद्वानांस देखील मोठें

१ मॉक्समुलर म्हणतो,

" These Ganas supplied the solid basis, on which successive generations of scholars erected that *astounding structure which reached its perfection*

( पुढें चालू )

आश्चर्य वाटतें. इतकेंच नव्हे तर, पाश्चात्य देशांत विद्या-

(मागील पृष्ठावरून पुढें चालू.)

in the grammar of Panini. *There is no form regular or irregular* in the whole of Sanskrit language, *which is not provided for in the grammar of* Panini and his commentators. It is the perfection of a merely empirical analysis of language, *unsurpassed, nay, even unapproached by anything in the grammatical literature of other nations.*"

( Sc. of L. I. 126-27. )

एलफिस्टन लिहितो,

" Panini the *earlist* extant writer on ( sanskrit ) Grammar ( has ) *established a system of grammar the most Complete* that ever was *employed in arranging the elements of human speech.*"

( H. India P, 282 )

गुणावगुण निरीक्षक जो वेबर, त्यानें देखील आमच्या व्याकरणशास्त्राच्या पूर्णत्वासंबंधानें विशेष गौरवानें लिहिलें आहे. तो असें प्रतिपादन करतो कीं, "And we at once pass into the *magnificent edifice* which bears the name of Panini as its architect, and which *justly commands the wonder and admiration of every one who enters.* * * And which, by the very fact *of its sufficing for all the phenomena which the language presents, bespeaks at once the marvellous ingenuity of its inventor, and his profound penetration of its entire material of its language.*"

( H. I. L. P. 216. )

सुप्रसिद्ध इतिहासकार हंटर म्हणतो, " The *Science* of language, indeed, *had been reduced* in India to funda-

(पुढें चालू)

भिनिवेशांत विशेष नांवाजलेला असा जो ग्रीसदेश, त्याजवर

( मागील पृष्ठावरून पुढें चालु. )

mental *principles*, at a time, when the grammarians of the West still treated it on the basis of accidental resemblances. Panini was the *architect* of Sanskrit grammar. * * The grammar of Panini '*stands supreme among the grammars of the world* alike for its preceision of statement, and for its *thorough analysis* of the roots of the language. and of the formative principles of words......It arranges, in logical harmony, the whole phenomena which the Sanskrit language presents and stands forth as one of the *most splendid achievements* of human invention and industry."

( The Indian Empire P. P. 100-1 )

१ ह्यासंबंधानें मॉक्समुलर म्हणतो.

" There are some discussions in the beginning of the Nirukta, which are of the *highest interest with regard to* etymology. While in Greece,the notions of one of her *greatest thinkers*, as expressed in the Cratylus *represent the very infancy* of Etymological science, the Brahmans of India *had treated some of the vital problems* of Etymology *with the utmost sobriety*."

( Ancient S. Literature ).

निरुक्ताच्या संबधानें लिहितांना, मॉनियर विल्यम्स असें लिहितो कीं. " ( It ) *contains some interesting discussions of philological questions*, and a sort of summary or sketch of grammar. "

( पुढें चालू )

सुद्धां भरतखंडाचें पूर्ण श्रेष्ठत्व असल्याचें, त्यांजला अगदीं कबूलच करावें लागतें.

## अलंकार.

अलंकार किंवा साहित्य-शास्त्र, व त्याचे बीजांकुर.

आतां, अलंकार म्हणून जी भाषाशास्त्राची दुसरी शाखा आहे, तिच्याकडे वळूं. अलंकारशास्त्रालाच साहित्यशास्त्रही म्हणतात. ह्याचे बीजांकुर सूत्रांत उपलब्ध होत असून, तद्विषयक बहुल सामग्री व महामूल्य उपकरणें देखील त्यांतच इतस्ततः पसरलेलीं दृष्टीस पडतात. ऋग्वेदाच्या कित्येक ऋचांत सुद्धां, कांहीं छन्दांचीं पारिभाषिक

---

( मागील पृष्ठावरून पुढें चालू. )

" The value of the work consists in its being the *oldest* extant commentary on the Veda. ... ... And the author often enters into curious etymological investigations which possess great interest from *their universally admitted antiquity.* "

( Indian Wisdom, P. 168. )

रॉथनें एके ठिकाणीं असें प्रतिपादन केलें आहे कीं,

" They ( the Hindus ) have far outstripped the Greeks in the department of grammar."

( Introduction to Nirukta P. III. )

तो आणखी असेंही म्हणतो,

" A science ( viz. of grammar ) which was far more Commonly studied and at an earlier period attained a far higher stage, in India than inGreece."

( Roth's Intr. to Nirukta. )

नांवें आढळून येतात; आणि त्यावरून, तत्कालीन ऋषींस छन्दाचें ज्ञान चांगलें असल्याचें व्यक्त होतें. ब्राह्मणांत, व विशेषतः निदानसूत्रांत, छन्दश्शास्त्राचें योग्य विवेचन आहे; आणि अनुक्रमणींत तर ऋग्वेदांतल्या सूक्तांचे प्रणेते, ऋचांचे छन्द, व त्यांच्या निरनिराळ्या देवता, इत्यादि संबंधाचा तपशील मंडलांच्या अनुक्रमानेंच दिला आहे.

ऋक्संहितेचीं प्रातिशाख्यसूत्रें शौनकानें केलीं असल्याविषयीं आख्यायिका असून, त्यांत छन्दाविषयींचेंच विवेचन आहे. यांत एकंदर तीन कांडें, व प्रत्येक कांडाचीं सहा पटलें आहेत; आणि त्याजवर ऊअटकृत अत्युत्तम वृत्ति आहे. छन्दश्शास्त्राचा साद्यन्त विचार पिंगलानें केला असल्याचें दिसतें, व पिंगल आणि महाभाष्यकार पतंजलि हे एकच असल्याचें सांगतात. ह्यांतील वृत्तें इतकीं पुराण आहेत कीं, तीं हल्लीं प्रचारांत देखील नाहींत.

त्याचा प्रणेता.

छन्दश्शास्त्राचा काल इ. स. पू. दोन हजार वर्षांपेक्षांही पुराणतर असल्याबद्दल अनेक प्रमाणांवरून अनुमान होतें. ह्या शास्त्राचे शास्ते क्रौष्टुकी, तांडी, यास्क, सैतव, रात, मांडव्य, इत्यादि असल्याविषयीं पिंगलानें सांगितलें आहे.

त्याचा काल.

अलंकारात मुख्यत्वेंकरून तीन गोष्टींचा अन्तर्भाव होतो. १ छन्द. २ काव्यरचना. आणि ३ साहित्य. छन्दश्शास्त्राचा प्रणेता पिंगल असून, काव्यरच-

अलंकाराचे पोटभेद, व त्यांजवरील ग्रंथ.

नेचा दण्डी, व साहित्याचा भरत होय. पिंगळ हा इ. स. पू. १४३ वर्षांच्या सुमारास होऊन गेला. दण्डीचें काव्यादर्श इ. स. च्या सहाव्या शतकांत झालें. आणि साहित्यशास्त्रांत भरत हा अग्रणी असल्यामुळें, तोही बराच पुरातन असल्याचें दिसतें; व तो इ. स. च्या सातव्या किंवा आठव्या शतकांत, निदान दहाव्या शतकापूर्वी तरी खचितच उदयास आला असावा, असें कांहींचें मत आहे. ह्याचे छत्तीस अध्याय असल्याचें सांगतात.

असो. ह्याखेरीज अलंकार विषयक दुसरे ग्रंथही आहेत, व ते खालीं लिहिल्याप्रमाणें होत:—भट्ट उद्भटकृत अलंकारशास्त्र; इ. स. ७७९–८१३. धनंजयकृत दशरूप; इ. स. चें दहावें शतक. भोजदेवकृत सरस्वतीकंठाभरण; इ. स. चें अकरावें शतक. मम्मतकृत काव्यप्रकाश; इ. स. बारावें शतक. वामनकृत काव्यालंकारवृत्ति; इ. स. चें बारावें शतक. विश्वनाथकृत साहित्यदर्पण; इ. स. चें पंधरावें शतक. पंडित जगन्नाथकृत रसगंगाधर; इ. स. चें सतरावें शतक. रुद्रभट्टकृत शृंगारतिलक. भानुदत्तकृत रसमंजरी. भामकृत अलंकारसर्वस्व. कवि कर्णपूरककृत अलंकारकौस्तुभ. अप्पयादीक्षितकृत कुवलयानन्द. जयदेवकृत चन्द्रालोक; इत्यादि.

आर्य कल्पकता व विषय परिणति.

ह्यावरून, भाषाशास्त्राच्या या शाखेंत, आमच्या आर्यपूर्वजांचे कशा प्रकारचे दीर्घ परिश्रम होते, हें वाचकाच्या लक्षांत

---

१ ह्याजवरच गोविन्दकृत काव्यप्रदीप नांवाची टीका आहे.

सहजीं येईल. शिवाय, ह्या शास्त्रांत हिन्दूचें श्रेष्ठत्व निर्विवाद होतें, ही गोष्ट पाश्चात्य विद्वानांस देखील कबूल करावी लागते. एवढेंच नव्हे तर, युरोपखंडापेक्षां भरतखंडांत या शास्त्राचें विशेष परिशीलन असून, नाट्यकलेंत तर हिन्दूचें पाऊल ज्यास्त पुढें सरकलेलें होतें, इत्यादि संबंधानें सुध्दां त्यांजला मान डोलवणें भाग[१] पडतें.

## कोष.

असो. अलंकारानन्तर कोषांचा विचार करणें अवश्य

---

१ ह्या बाबतींत मॉनियर विल्यम्स् असें म्हणतो,

" The trouble taken ( by the Hindus ) to invent titles for every variety of Hindu play according to far more subtle shades of distinction than those denoted by our drama, melodrama, comedy, farce, and ballet, proves that dramatic Composition has been more elaborately cultivated in Indian than in European Countries.

( Indian Wisdom .P. 466. )

वेबरचा देखील अशाच मासल्याचा लेख आहे कारण, संस्कृत वाङ्मयाच्या इतिहासांत तो एके ठिकाणीं असें लिहितो कीं,

" For the rest, in the field of rhetoric and poetics, the Hindu mind so fertile in nice distinctions has had free scope and has put forth all its power not seldom in an extremely subtle and ingenious fashion.

( Weber. H. S. L. P. 232 ).

कोष.

आहे. कारण, ती भाषाशास्त्राची तिसरी शाखा होय. सबब, तिजवर क्षणभर लक्ष्य पुरवूं.

त्याचे बीजांकुर.

कोष रचनेचे बीजांकुर प्रथमतः निघंटूंतच दिसून येतात. ह्या निघंटूंचा मुख्य हेतु म्हटला म्हणजे, वेदार्थप्रकाशनच असल्याचें दिसतें. कारण, वेदकालानन्तर वेदांचा अर्थ दिवसानुदिवस सामान्यजनास अगदींच समजेनासा झाला; व त्यामुळें, यज्ञयागादि क्रिया यथासांग करण्याची मोठी अडचण पडूं लागली. तेव्हां, ती दूर करण्यासाठीं, निघंटूंची योजना झाली, आणि त्या योगानें इच्छित कार्यभागही होत गेला.

निघंटूशिवाय इतर कोशांची योजना.

तथापि, हे निघंटू वेदांची परिभाषा कळण्यासाठींच असल्यामुळें, त्यांचा सार्वत्रिक उपयोग होत नसे, हें उघड आहे. आणि म्हणूनच, ही अडचण दूर करण्याच्या हेतूनें, संस्कृत भाषेंतील सर्व शब्दांचा शास्त्रीय कोष तयार करण्याकडे विद्वज्जनांचें लक्ष्य लागलें असावें, असें वाटतें.

आतां, ह्या शास्त्रीय कोषासंबंधानें, आदि प्रयत्न कोणाचे, कोणते, व कशा प्रकारचे होते, हें निश्चित रीतीनें कळण्याला हल्लीं एकही साधन उपलब्ध नाहीं. तथापि, फार प्राचीन काळीं असे कोशकार होऊन गेले होते, याविषयीं

मात्र तिळभर देखील शंका नाहीं. कारण, त्याबद्दलचा स्पष्ट उल्लेख प्रत्यक्ष अमरसिंहानेंच आपल्या कोशांत केला आहे. तो म्हणतो,

समाहृत्यान्य तंत्राणि संक्षिप्तैः प्रतिसंस्कृतैः ।
संपूर्णमुच्यते वर्गैर्नामलिंगानु शासनम् ॥

( अमरकोष. १ कां. )

ह्यावरून, अमरसिंहानें जो कोष तयार केला, तो तत्पूर्वकालीन कोषकारांचें साहाय्य घेऊनच रचला असल्याचें व्यक्त होतें.

एका[1] श्लोकांत, एकंदर सव्वीस कोशकारांचीं नांवें गुंफलेलीं आहेत. त्यावरून, तितक्या पुरातनकाळीं देखील ह्या भरतभूमींत बरेंच कोषकार होऊन गेल्याचें दिसतें.

अतिपुरातन कोशकार व्याडि.

ह्या सर्वांत व्याडि हा फारच पुरातन होय, यांत शंका नाहीं. कारण, त्याच्या "संग्रह" नामक ग्रंथाचा पतंजलि[2]

१ मोदिन्यमर मालाच त्रिकांडो रत्नमालिका ।
रंतिदेवोभागुरिश्च व्याडिः शब्दार्णव स्तथा ॥
द्विरूपश्च कालिंगश्च रभसः पुरुषोत्तमः ।
दुर्गोभिधानमालाच संसारावर्त शाश्वतौ ॥
विश्वोबोपालितश्चैव वाचस्पति हलायुधौ ।
हारावली साहसांको विक्रमादित्य एवच ॥
हेमचन्द्रश्च रुद्राश्चा प्यमरोऽयं सनातनः ।
एते कोशाः समाख्याताः संख्या षड्विंशतिः स्मृता ॥

२ पतंजलीचा काल इ. स. पू. १४३ वर्षे.

महाभाष्यकारानें सुध्दां वारंवार उल्लेख[1] केलेला आढळून येतो. इतकेंच नव्हे तर, ऋग्वेद प्रातिशाख्यांत देखील शौनकानें त्याला प्रमाणभूतच[2] मानलें आहे.

तथापि, सर्व कोशांत, अमरसिंहाचा[3] अमरकोष श्रेष्ठतम असून अग्रणी आहे, यांत संशय नाहीं.

अग्रणी अमरसिंह.

अस्तु. शेवटीं, संस्कृत कोशकार व त्यांजवरील टीकाकार यांनीं भाषाशास्त्रविषयक बरेच परिश्रम केले असल्यामुळें, त्यांचीं उपलब्ध असलेलीं नांवें देऊन, भाषाशास्त्राची ही तिसरी शाखा पुरी करतों. हीं नांवें खालीं लिहिल्याप्रमाणें होतः—

संस्कृत कोशकारांची नामावली.

१ अजय. २ अनेकार्थध्वनिमंजरी. ३ हेमचंद्रकृत अभिधानचिंतामणि. ४ अभिधानमाला. ५ अमरदत्त. ६ अमरसिंहकृत अमरमाला. ७ अरुण. ८ इन्दुकोश. ९ उत्पलिनी. १० उष्मविवेक. ११ जैनपुरुषोत्तमदेवकृत एकाक्षरकोश. १२ कलिंग. १३ कल्पतरु. १४ केशवकृत कल्पद्रु. १५ कात्य. १६ कात्यायन. १७ गंगाधर. १८ गोवर्धनकोश. १९ चन्द्रकोश. २० चरककोश. २१ तारपल. २२ जैनपुरुषोत्तमदेवकृत त्रिकांडशेष. २३ त्रिविक्रम. २४ दामोदर-

१ संग्रहे एतत् प्राधान्येन परीक्षितम्। ( महाभाष्य. अ० १. पा० १. आ० १. )

२ व्याडेः सर्वत्राभिधानं लोपः।

३ मागील पान २९४. ग्रंथकर्त्यांचें भाषाशास्त्र. पा. २४९ पहा.

कोश. २५ दुर्गकोश. २६ देशीकोश. २७ द्विरूपकोश. २८ धनंजय. २९ धनपाल. ३० धन्वंतरी. ३१ धरणीदासकृत धरणीकोश. ३२ धर्मदास. ३३ नानार्थध्वनिमंजरी. ३४ भास्करकृत नानार्थरत्नमाला. ३५ नामनिधान. ३६ नाममाला. ३७ अमरसिंहकृत नामलिंगानुशासन. ३८ पालकोश. ३९ पुद्गलकोश. ४० भरतमाला. ४१ भागुरिकोश. ४२ भुग्नकोश. ४३ भोगींद्रकोश. ४४ मंखकोश. ४५ माधवकोश. ४६ मुकुट. ४७ श्रीधरकृत मुक्तावली. ४८ मनुकोश. ४९ मेदिनी. ५० यादव. ५१ रत्नकोश. ५२ दंडाधिनाथोपनामक—इरुगप्पकृत रत्नमाला. ५३ हलायुधकृत रत्नमाला. ५४ रंतिदेव. ५५ रभस. ५६ राजदेव. ५७ राजमुकुट. ५८ रुद्रकोश. ५९ वररुचि. ६० वाचस्पति. ६१ विक्रमादित्य. ६२ विश्वकोश. ६३ विश्वप्रकाश. ६४ विश्वरूप. ६५ विश्वलोचन. ६६ वैजयन्ती. ६७ वो (बो) पालित. ६८ व्याडी. ६९ मयुरेशकृत शब्दरत्नावलि. ७० शब्दार्णव. ७१ शाश्वत. ७२ शुभांक. ७३ संसारावर्त. ७४ सज्जनकोश. ७५ सर्वधर. ७६ साहसांक. ७७ सुभूतिकोश. ७८ सोमनन्दि. ७९ हरकोश. ८० जैनपुरुषोत्तमदेवकृत हारावली.

---

# भाग ६७ वा

## शास्त्रविषयक-ग्रंथभांडार.

### धर्मशास्त्र.

धर्मशास्त्राविषयक भरत खंडांतील वाङ्मय.

धर्मशास्त्र हें राष्ट्रोन्नतीचा मूळपाया, खरें जीवन, व मजबूत आधार असल्याकारणानें, तद्विषयक ग्रंथसंपत्तीची आमच्या भरतखंडांत खचित्‌च वाण नाहीं. किंबहुना, येथें तिचें प्राचुर्यच दृष्टीस पडतें, असेंही म्हटलें असतां चालेल. कारण, सर्व सुधारलेल्या देशांत, आणि प्रत्येक उन्नतावस्थेप्रत पावलेल्या राष्ट्रांत, एकंदर जनसमूहास नीतीचें वळण उत्तम प्रकारचें लागावें ह्मणून, व सामाजिक व्यवस्था उत्कृष्ट रीतीनें, अबाधित, आणि यथान्याय चालावी यासाठीं, धर्मशास्त्राचें अवलंबन करण्याची मोठीच आवश्यकता असते. मग, भरतखंडासारख्या नीतिविशारद देशांत, त्याची भवतिनभवति विशेषेंकरून व्हावी, यांत तर कांहींच आश्चर्य नाहीं.

त्यासंबंधाचे प्राचीन प्रयत्न.

धर्मशास्त्र ह्मणजे ईश्वरनिष्ठा, नीतिनैपुण्य, व्यवहारदाक्षिण्य, संप्रदायपटुत्व, व आचारशीलन, इत्यादींचें विवेचन होय. तेव्हां, अशा महत्वाच्या आणि

आवश्यकतेच्या बाबतींत, आम्हां आर्यहिन्दूंचे प्रयत्न निः-संशय प्रथमारंभींचे व प्राचीनतम असावेत, हे त्यांच्या शीलानुरूपच होय.

ह्या भूतलावर, जीं जीं धर्मशास्त्रें उदयास आलीं, अथवा लोककल्याणार्थ ज्या ज्या स्मृतींचा उपयोग होऊं लागला, त्यासर्वांत आम्हा आर्य हिंदूचें धर्म-शास्त्र प्राचीनतम आहे, यांत काडीमात्र देखील शंका नाहीं. आणि म्हणूनच, ती गोष्ट पाश्चात्य कायदेपण्डितांस सुद्धां कबूल[1] करणें भाग पडतें.

हिंदुधर्मशास्त्राचें प्राचीनत्व.

सर्वांत आद्य स्मृतिकार मनु असून, त्याचा काळ इ. स. पूर्वी एक हजार वर्षांवर असावा, असें वाटतें. सर विल्यम् जोन्सच्या मतें, तो इ. स. पूर्वी १२८० वर्षें झाला असल्याचें कळतें. श्लेजेल म्हणतो कीं, तो इ. स. पू. १००० वर्षे झाला असावा. एलफिन्स्टन इतिहासका-

आद्यस्मृतिकार मनु.

---

१ एके ठिकाणी मेननें असें ह्मटलें आहे कीं,

", Hindu law has the *oldest pedigree of any known system of jurisprudence*, and *even now it shows no signs of decrepitude. At this day, it governs races of men, extending from* Cashmere to Cape Comorin, who agree in nothing else except their submission to it."

सदरहू अवतरणांतील इतालिक वर्ण आमचे आहेत.

( John D. Mayue. On Hindu Law and Usage Preface First Edn. July 1876. P. IX. )

राच्या समजुतीप्रमाणें, तो इ. स. पू. ९०० वर्षे होऊन गेला. मॉनियर विल्यम्स म्हणतो कीं, तो इ. स. पू. ५०० वर्षें झाला. आणि मॅक्समुलर असें लिहितो कीं, तो इ. स. पू. २०० वर्षें उदयास आला. तथापि, स्मृतिविषयक बीजांकुर इ. स. पूर्वी एक हजार वर्षांच्याही पलीकडील काळांत दृग्गोचर होतात, यांत बिलकुल संशय नाहीं. कारण, वेदांचीं जीं सूत्रें आहेत, त्यांत नीति, व्यवहार, संप्रदाय, आचार, इत्यादींचें सामान्य विवेचन केलेलें दृष्टीस पडतें. आणि सामाजिक स्थितीचीं सर्वत्र व्याकीर्ण झालेलीं हीं जीं मूलतत्वें व प्रथमांकुर, तेच आमच्या दूरदृष्टि ऋषींनीं मानवी कुटुंबांच्या व्यवस्थेसाठीं एकत्र केलें, आणि ते सुलभ रीतीनें स्मरणांत राहवे, म्हणून त्यांस स्मृति असें नामधेय दिलें. पुढें, ह्या स्मृती रचणारांसच स्मृतिकार म्हणूं लागले, हें उघड आहे.

स्मृतिशास्त्राचे प्रथमांकुर.

एकंदर लहान मोठे, विशेष प्राचीन आणि अर्वाचीन स्मृतिकार, बरेच आहेत. तथापि, त्यांपैकीं जे सुप्रसिद्ध व निरनिराळ्या प्रकारानें नांवाजलेले आहेत, त्यांचींच नांवें येथें देतों.

प्राचीन स्मृतिकार.

१ मनु. २ याज्ञवल्क्य. ३ अत्रि. ४ विष्णु, ५ हा-

---

१ मानवगृह्यसूत्रें, अपस्तंबकृत धर्मसूत्रें, शौनककृत प्रातिसांख्यसूत्रें, पारस्करकृत कात्यायनगृह्यसूत्रें, अश्वलायन श्रौत व गृह्यसूत्रें, सांख्यगृह्यसूत्रें, बौध्यायनसूत्रें, कात्यायनकृत कर्मप्रदीप, इत्यादींत, धर्मशास्त्राचीं मूलतत्वें साचितच आढळून येतात.

रित. ६ उशनस. ७ अंगिरस. ८ यम. ९ अपस्तंब. १० संवर्त. ११ कात्यायन. १२ बृहस्पति. १३ पराशर. १४ व्यास. १५ शंख. १६ लिखित. १७ दक्ष. १८ गोतम किंवा गौतम. १९ शीतातप. २० वाशिष्ठ. २१ नारद. २२ भृगु. २३ बौधायन. २४ मेधातिथि. २५ गोविंदराज. २६ पारस्कर. २७ आश्वलायन. २८ भारद्वाज. २९ बुध. ३० देवल. ३१ जाबालि. ३२ जैमिनि. ३३ जमदग्नि. ३४ काश्यप. ३५ कौशकी. ३६ कोकिल. ३७ लौगाक्षी. ३८ नारायण. ३९ प्रजापति अथवा ब्रह्मा. ४० प्रवर्तक. ४१ शौनक. ४२ वामन. ४३ वृद्धशातातप. ४४ प्रशेत. ३५ योगी. ४६ सुबन्तु. ४७ बभ्रू. ४७ पैथीन. ४९ व्याघ्र. ५० सत्यव्रत. ५१ गार्ग्य. ५२. ब्रह्मसंभव. ५३ शूलपाणि. ५४ नन्दपंडित; इत्यादि.

हिंदूंच्या धर्मशास्त्राचा अम्मल, व त्याची व्यापकता.

आर्यहिंदूंच्या साम्राज्यांत, हें धर्मशास्त्र अखिल भरतखंडभर, एकछत्राखालींच प्रचारांत असे. म्हणजे, हिन्दुकूशपासून तों तहत ब्रह्मपुत्रानदीपर्यंत, आणि हिमालयापासून तों थेट कन्याकुमारीभूशिरा पावेतों, केवळ आर्यावर्त्तान्तर्गत संप्रदायास अनुसरूनच त्याची अंमल बजावणी होई. मात्र, निरनिराळ्या परगण्यांतील स्थिती-प्रमाणें, व त्या त्या देशांतील परिवेष्टनानुरूप, आमच्या धर्मशास्त्रांतल्या कित्येक गोष्टींत फेरफार करणें अत्यवश्य

झालें, आणि त्याच कारणानें भिन्न भिन्न प्रांतांत पृथक् पृथक् संप्रदाय अमलांत आले.

भिन्न देशानुरूप संप्रदायभिन्नत्व.

हे देशविभागविषयक संप्रदाय खालीं लिहिल्याप्रमाणें होत.

१ वंग अथवा बंगाल, म्हणजे उत्तर हिंदुस्थान.

२ वाराणशी किंवा बनारस, म्हणजे मध्य हिंदुस्थान.

३ मिथिला अगर उत्तर बहार व तिरहूट, म्हणजे पूर्व हिंदुस्थान.

४ महाराष्ट्र अथवा मुंबईइलाखा, म्हणजे पश्चिम हिंदुस्थान.

५ द्राविड किंवा मद्रासइलाखा, म्हणजे दक्षिण हिंदुस्थान.

वंगसंप्रदाय.

१ बंगाल्यांत, मनुस्मृति, याज्ञवल्क्यस्मृति, आणि जीमूतवाहनकृत दायभाग, इतके प्रचारांत आहेत. मनूवर, १ कुल्लूकभट्ट, २ गोविंदराज, ३ मेधातिथि, ४ धरणीधर, व ५ भागुरि, यांची टीका असून, याज्ञवल्क्यावर १ विज्ञानेश्वर, २ अपरार्क, ३ शूलपाणि, ४ देवबोध, आणि ५ विश्वरूप, यांची व्याख्या आहे. मनूचा काल पूर्वी सांगितलाच आहे, (मागें पान ३४८ पहा); व याज्ञवल्क्य हा इ. स. च्या पहिल्या शतकाच्या पूर्वार्धांत झाला असल्याचें दिसतें. जीमूतवाहन हा सिलार घराण्यांतील राजपुत्र असून, तो इ. स. च्या पंधराव्या शतकांत होऊन गेला. ह्याच्या कृतीला धर्मरत्न अशी संज्ञा आहे. याज्ञवल्क्यावरील टीकाकारांत, अपरार्क हा सर्वांत पुराणतम होय. शूल-

पाणीच्या कृतीला दीपकलिका म्हणतात. मिताक्षरावर, विश्वेश्वरभट्टाची सुबोधिनी नांवाची टीका आहे, व हा इ. स. च्या १४ व्या शतकांत होऊन गेला, असें कोलब्रूकादि पाश्चात्य पंडित लिहितात. कोणी एक बाळंभटाची देखील हिजवर दुसरी टीका आहे. तिसरी टीका नन्दपंडिताची असून, तिला प्रतीताक्षरा म्हणतात. वीरमित्रोदय नांवाची मित्रमिश्राची चौथी टीका होय; आणि कमलाकराची विवादतांडव नांवाची पांचवी टीका समजावयाची. जीमूतवाहनकृत दायभागावर सुद्धां बऱ्याच टीका झाल्या आहेत. सबब, त्यापैकीं फक्त महत्वाच्या मात्र येथें देतों. श्रीकृष्णतर्कालंकारकृत दायक्रमसंग्रह. २ श्रीनाथाचार्यचूडामणीची टीका. ३ अच्युतचक्रवर्तीची टीका. ४ महेश्वराची टीका. व ५ रघुनन्दनकृत टीका. रघुनन्दनाला स्मार्तभट्टाचार्य देखील म्हणत, आणि हा इ. स. च्या सोळाव्या शतकाच्या प्रारंभीं उदयास आल्याचें सांगतात. ह्यानें एकंदर सत्तावीस ग्रंथ केल्याचें सुप्रसिद्ध असून, ते स्मृतितत्व, तिथितत्व, आचारतत्व, इत्यादि नांवांनीं सर्वास महशूर आहेत. ह्याची दायभागावरील टीका सर्वोत्कृष्ट व सर्वमान्य आहे, हें विशेष रीतीनें सांगण्याची आवश्यकता नाहीं.

काशीसंप्रदाय.

२ काशीप्रांतांत, अथवा मध्यहिंदुस्थानांत, फक्त मिताक्षरेलाच मान आहे.

मिथिलासंप्रदाय.

३ मिथिला देशांत, १ याज्ञवल्क्य, २ मिताक्षरा, ३ विवादचिंतामणि, ४ वाचस्पतिमिश्रकृत व्यवहारचिंतामणि, ५

चंडेश्वरकृत विवादरत्नाकर, आणि ६ लखिमादेवीकृत विवादचंद्र, असे प्रचारांत आहेत. चंडेश्वर हा इ. स. १३१४ मध्यें उदयास आल्याचें कळतें; व लखमादेवी ही एक विदुषी स्त्री असून, तिनें अनेक ग्रंथ केले आहेत. मात्र, मिसरूमिश्र नांवाचा जो तिचा आप्त, त्याच्या नांवावर ते विकले जातात, असें कित्येकांचें म्हणणें आहे.

महाराष्ट्रसंप्रदाय.

४ महाराष्ट्रांत, अगर मुंबई इलाख्यांत, १ मिताक्षरा, आणि २ व्यवहारमयूख, हेच स्मृतिग्रंथ विशेषेंकरून प्रचारांत आहेत. मिताक्षरा ही विज्ञानेश्वराची याज्ञवल्क्यावरील टीका असल्याचें, आम्हीं पूर्वीच सांगितलें आहे. आतां, व्यवहारमयूख नांवाची कृति मात्र नीलकंठभट्ट याची असून, तिलाच येथें सर्वत्र मान आहे.

द्राविडसंप्रदाय.

५ द्राविडांत, १ मिताक्षरा, २ देवनभट्टकृत स्मृतिचंद्रिका व ३ दत्तकचन्द्रिका, ४ माधवाचार्यकृत पराशरस्मृतिव्याख्या, ५ नन्दपंडितकृत वैजयन्ती, ६ पराशरस्मृति टीका, आणि ७ दत्तकचन्द्रिका, इतके स्मृतिग्रंथ प्रचारांत आहेत.

आतां, ह्या धर्मशास्त्राचा आमच्या पुराणतम हिंदूराष्ट्रावर कसा व कोणत्या प्रकारचा परिणाम झाला, याविषयींचा विचार करूं.

आमच्या धर्मशास्त्राचा हिंदूराष्ट्रावर परिणाम.

हें धर्मशास्त्र ऐहिक सुखाचें माहेरघरच असून, त्यांतील आज्ञा पाळल्यानें आमचें सर्वतोपरी कल्याणच होतें, अशी आह्मा भारतीयांची बालंबाल खात्री झाली

आहे. त्या योगानें, ते त्यांतील वचनांस मान देतात, आणि तीं मनोभावानें पाळतात. इतकेंच नव्हे तर, त्यांचें उल्लंघन करण्यास ते कोणत्याही कारणानें केव्हां देखील प्रवृत्त होतच नाहींत. शिवाय, आमची गृहस्थिति, आमचें नेहमींचें आचरण, खाद्यपेयादिनियम, मनःसंयमन, लोकशिक्षण, स्त्रीवात्सल्य, प्रकृतिसौजन्य, नीतिबंधन, मातृसेवा, पितृभक्ति, इत्यादिसंबंधाचें यथावत् शिक्षण आम्हांला आमच्या धर्मशास्त्रांतूनच मिळालें असल्याकारणानें, तें आर्यहिन्दूंच्या पिंडांत जणूकाय खिळलेलेंच आहे, असें वाटतें.

पाश्चात्यांची विघातक संगति, व तिचा हिंदुधर्मानें केलेला प्रतिकार.

आतां, सांप्रतकाळीं, पाश्चात्यांचा व आमचा दिवसानुदिवस अहोरात्र निकट संबंध पडल्या कारणानें, कित्येक बाबतींत यांच्या संघट्टनाचा आमच्यावर निःसंशय अनिष्ट परिणाम घडून येत आहे; व त्याचा बुरदंडही आम्हांला दिल्यावांचून खचितच सुटका नाहीं. इतकेंच नव्हे तर, तो आम्ही थोड्याबहुत प्रमाणानें आजपर्यंत देतही आलों आहों. परंतु, असें असूनही, इतर सर्व राष्ट्रांच्या तुलनेनें आम्ही ज्यास्त नीतिमान आहोंत. अन्य लोकांपेक्षां, आम्हां हिंदूंची आपल्या धर्मावर जास्त श्रध्दा आहे. आणि सहिष्णुतेच्यासंबंधानें तर, "आर्यहिंदूंची कीर्ति अजरामर झाली असून, असा सहनशील स्वभाव अन्यत्र कोठेंही दृष्टीस पडत नाहीं. तात्पर्य, हा सर्व

परिणाम† आमच्या धर्मशास्त्रांतील अपूर्व शिक्षणाचा होय, हें कोणासही कबूल केलें पाहिजे.

स्त्रियांच्या बाबतींत स्मृतिकारांनीं बजाविलेली इतिकर्तव्यता, व पाश्चात्यांचें भ्रांतिमूलक अज्ञान

आमच्या स्मृतींत, वर्णाश्रमधर्म[1]; स्नानादि नित्यविधि[2]; खाद्यपेयादि नियम[3]; मनःसंयमन[4]; लोकशिक्षण[5]; अभिवादन[6]; स्त्रीधर्म[7]; स्त्रीवात्सल्य[8]; आणि स्त्रीसंरक्षण[9]; लग्नकाल[10]; अनुरूपवर; पतिसेवा; संततिशिक्षण[11]; स्त्रीप्रभाव[12]; नीति[13] व प्रकृतिसौजन्य[14]; साहस[15] आणि शौर्य; इत्यादींचें विवेचन असून, तत्संबंधीं तपशिलवार हकीकत आम्ही भारतीय साम्राज्याच्या सहाव्या पुस्तकांत विशेष विस्तारानें दिली आहे. सबब, त्याबद्दलचा आणखी ज्यास्त ऊहापोह करण्याची येथें आवश्यकता नाहीं. मात्र, या ठिकाणीं इतकें सांगणें फार जरूरीचें आहे कीं, आमच्या धर्मशास्त्रानें भारतीय अबलांस स्वातंत्र्य असें बिलकुल केव्हांही दिलेंच नाहीं; किंवा त्यांजला आमच्या भरतखंडांत लेशभरही मान नसून, त्या केवळ जनावरांप्रमाणेंच इकडे वागविण्यांत येतात; म्हणून जी कित्येक

---

† भारतीय साम्राज्य. पु. ७ वें. पान ५ ते २१, पु. ८ वें. भाग ४९, पु. ६ वें.

१ (भारतीय साम्राज्य पु. ६ वें. पान २-३४). २ (पु. ६. पा. ३४-४०). ३ (पा. ४०). ४ (पा. ४१.). ५ (पा. ४३-५९). ६ (पा. ५०-५१). ७ (पा. ५३-७०.). ८ (पा. ७१-७५.). ९ (पा. ७६-८१.). १० (पा.८२-९०.). ११ (पा. ९१-९४.). १२ (पा. ९५-९९). १३ (पा. १००-१५३.). १४ (पा. १५४-१६१.). १५. (पा. १६२-२००.).

पाश्चात्यांनीं ओरड केली आहे, ती अगदीं निष्कारण असून, निःसंशय अज्ञानमूलक आहे. आणि ह्या गोष्टीची सत्यता पाश्चात्य विद्वानांस मुद्दां भासमान होऊन, कालान्तरानें त्यांच्या ती प्रत्ययासही आल्यामुळें, त्यांजला ती कबूल करणें देखील भाग पडलें आहे.

तद्विषयक पाश्चात्य प्रत्यय.

शिवाय, ह्यासंबधानें ज्यांनीं ज्यांनीं म्हणून आमची गृहस्थिति पाहिली आहे, त्यांजला हिंदूस्त्रियांची इत्थंभूत हकीकत माहीत आहे. कारण, हिंदूसमाजावर त्यांचें किती प्राबल्य असतें; त्या आमच्या धर्मानेंच किती पूजनीय मानल्या आहेत; प्रत्येक गृहकृत्यांत त्यांच्या

---

१ ह्या संबंधानें मॉनियर विल्यम्स हा एके ठिकाणीं असें लिहितो कीं,

"The influence of Hindu Mothers in their own families, and the respect paid to them by their children have always been greât."

( Indian Wisdom. P. 257. )

२ ह्या संबंधानें मिस् फ्लॉरेन्स नाइटिंगेल ही एके ठिकाणीं म्हणते,

"We English women *understand as little the lives and circumstances, the ideas and feelings of these* hundred millions of women of India, as if they lived in another planet. They are *not reached* by us, not *even by those* of us, who have lived in powerful positions in India. Yet, *the women of* India *possess influence, the most unbounded.*" "*In their*

( पुढें चालू )

अभिप्रायाखेरीज कसें पान देखील हालतें[1] नाहीं; आम्ही त्यांजला आर्योन्नतीचें आदिकारण, व समाजाचे अलंकार[2] कसे मानतों; प्रजेचें उत्पादन, झालेल्या प्रजेचें परिपालन, पालन केलेल्यांचें शिक्षण, आणि शिक्षितांची उन्नति, इत्यादि सर्व गोष्टी केवळ भार्याधीनच असल्यामुळें, आमचें त्यासंबंधानें प्राचीनें[3] काळापासूनच कसें लक्ष्य वेधलेलें होतें; इत्यादि गोष्टी शोधक माणसास पूर्णपणें अवगत आहेत. परंतु, जेथें अज्ञान आहे, तेथें सर्वच तिमिर भासतें; ज्याला कावीळ झाली आहे, त्याला यच्चावत् हळ-

---

( मागील पृष्ठावरून पुढें चालू. )

*own house-holds*, be it *in hut* or *palace, even though never seen*, they hold the most important strong-holds of any women on earth. * * It was Easier to dely the Secretary of State, than to defy one's own mother-in-law. Supported by ancient custom, Indian women are absolute within their sphere."

( Miss. Florence Nightlngale's Introduction to an English Edition of B. M. Malabari. )

१ सुप्रसिद्ध इतिहासकार टॉड् म्हणतो,

" Like the magnetic power, however latent, their attraction is not the less certaiu."

( Tod's Rajasthan. vol. I P. 523 )

२ प्रजनार्थं महाभागाः पूजार्हा गृहदीप्तयः ।
स्त्रियः श्रियश्च गेहेषु न विशेषोऽस्तिकश्चन ॥२६॥
(म. स्मृ. अ. ९.)

३ मनुस्मृति. अ० ९. २७।२८.

दीसारखेंच दिसतें; ज्यानें केशरी रंगाचा चष्मा लाविला आहे, त्याला सर्वच पिंवळें दृग्गोचर होतें; आणि म्हणूनच कित्येक **पाश्चात्य**, केवळ अज्ञानमूलक भ्रांतीनें, निव्वळ रज्जूसच **साप साप** म्हणून धोपटतात.

दोषमूलक दृष्टि, व तुटक तुटक वाक्यांची विसंगति.

त्याचप्रमाणें, कित्येक **पाश्चात्य** केवळ **हिंदूधर्म**दोषैकदृक्च असल्यामुळें, ते **मनुस्मृती**तील तुटक तुटक वचनें घेऊन, त्यांचा पूर्वापार संबंध ध्यानांत न आणितां, **स्मृ**तिकारांस निष्कारण दोष देतात. ह्यांचा विशेष कटाक्ष म्हटला म्हणजे, **न स्त्री स्वातंत्र्य मर्हति ।** या **मनु**स्मृतींतील एकाच वचनावर होय. परंतु, ह्याचा वास्तविक अर्थ ते बिलकुल ध्यानांत आणीत नाहींत. त्याचा मूळ हेतु इतकाच आहे कीं, स्त्रियांस वाजवीपेक्षां ज्यास्त स्वतंत्रता देणें, अथवा त्यांनीं तरी अशा प्रकारच्या **स्वा**तंत्र्याचा अभिलाष करणें, विघातक आहे. सबब, तें तसें देणें, किंवा इच्छिणें, उभयपक्षकारांसही बिलकुल इष्ट नाहीं. आणि ही गोष्ट खुद्द **पाश्चा**त्यांच्याही अनुभवास आल्यामुळें, ते त्याप्रमाणेंच अमलबजावणीही करीत आहेत.

अबलांविषयीं पाश्चात्यांच्या कृतीची धरसोड, आणि बोलणें एक व करणें एक.

कारण, ते जरी तोंडानें हवें तेवढें ब्रह्मज्ञान सांगतात, आणि कागदीं यथेष्ट घोडे नाचवून "स्त्रियांचे व पुरुषांचे हक्क अगदीं समसमानच आहेत," इत्यादि मनसोक्त वल्गना करितात, तरी वाचाळतेपेक्षां त्यांचें पाऊल निःसंशय पुढें नाहीं; किंवा बाह्य

देखाव्या पलीकडे त्यांची मजल सुद्धां खचितच ज्यास्त गेलेली नाहीं; असें कोणालाही कबूल केलें पाहिजे. ह्याचा दाखला व प्रत्यक्ष उदाहरण पाहणें असल्यास, आपण क्षणभर पाश्चात्य राष्ट्रांकडेच वळूं, आणि इंग्लंड, फ्रान्स, अमेरिका, इत्यादि देशांतील अहवाल पाहूं.

वचनाप्रमाणें, पाश्चात्य स्त्रियांची मागणी, व तिला लागलेली नकाराची ठेंच.

स्त्रियांची योग्यता पुरुषांप्रमाणेंच आहे, अशा विषयींची चर्चा अपरगोलार्धांत रात्रंदिवस चालत असते, ही गोष्ट वाचकास श्रुत आहेच. शिवाय, स्त्रियांना पुरुषासारखेच सर्व प्रकारचे हक्क मिळाले पाहिजेत; कारण, बुद्धि, साहस, कल्पकता, शिक्षण, धैर्य, सहनशक्ति, इत्यादि गुण पुरुषांप्रमाणेंच अबलांतही आहेत, अशाबद्दल कित्येक पुढारी वर्गांचें प्रबळ मत आहे. तेव्हां, ह्या गोष्टीवरच विशेष कटाक्ष ठेऊन, कित्येक सुशिक्षित स्त्रियांनीं, आपणांस राजकीय, सामाजिक, व धार्मिक हक्क मिळावे म्हणून, आपल्या सरकारास थोड्या वर्षांपूर्वीं विनंती केली होती. इतकेंच नव्हे तर, राजपरिषदांत[1], अथवा प्रतिनिधि[2] मंडळांत, आपणांस लोकतर्फे किंवा सरकार मार्फतीचे प्रतिनिधी निवडून घ्यावें, आणि सरकारच्या हातांत असलेल्या मोठमोठ्या हुद्याच्या, जबाबदारीच्या, व श्रेष्ठ जागाही द्याव्या, असें त्यांचें मागणें होतें. परंतु, आश्चर्याची गोष्ट ही कीं, जे पाश्चात्यलोक स्त्रियांच्या

---

1 Parliament. 2 House of Representatives.

हक्काचा केवळ देव्हाराच माजवितात; जे अबलोन्नत्यर्थ स्त्रियांचें वाजवीपेक्षां फाजिल गौरवही गातात; व जे त्यांजला कोठें ठेवूं आणि कोठें साठवूं, असें करतात; त्यांच्याचपुढें, त्यांच्याच देशांत, त्यांच्याच अमलांत, व त्यांच्याच स्त्रियांस, पुरुषांप्रमाणें योग्य आणि सर्व हक्क देण्याविषयींचा जेव्हां जेव्हां प्रश्न येतो, तेव्हां तेव्हां त्यांचें धाबें एकदम दणाणतें! फार तर काय सांगावें, पण, अशा प्रकारच्या अधिकारदानाला ते तत्काल पराङ्मुख होतात, व कांहीं तरी सालापाला लावून, ते ह्या अबलांच्या हक्कांची निव्वळ पायमल्लीच करितात!! अर्थात्,—अशा तऱ्हेच्या वर्तनानें, अंगीकृत काजाला हरताळ लावून तें ते यथेष्ट झुगारून देतात, आणि " **लोकां सांगे ब्रह्मज्ञान आपण कोरडे पाषाण,** " या उपहास्यतेला मात्र अचुक पात्र होतात.

त्यांची झालेली निराशा.

अशा तऱ्हेनें, पाश्चात्य देशांत, स्त्रियांच्या हक्काविषयीं अकांडतांडव चालून, आणि त्यांतही वर वर हवी तेवढी साखर पेरली असतांही, अथवा " **यंव करूं आणि त्यंव करूं** " म्हणून कागदीं घोडे हवे त्या प्रकारें नाचविले असून देखील, त्यांचें घोंगडें केवळ भिजतच पडलें आहे; व अजूनसुद्धां त्याचा तिळमात्रही उपयोग झालेला नाहीं. राजकीय हक्क त्यांजला मिळालेले नाहींत. राजपरिषद् किंवा प्रतिनिधिमंडल, यांत त्यांचा केसाएवढा देखील शिरकावच झाला नाहीं. मोठमोठ्या हुद्यास त्यांजकडून स्पर्शही करविला नाहीं. जबाबदारीच्या जागांस त्यांजला शिऊन सुद्धां दिलें नाहीं.

आणि श्रेष्ठ व नियामक[1] सत्तेची आणि त्यांची, चाललेल्या भवातिनभवर्तीत, गांठही पडूं दिली नाहीं.

तिचें कारण.

ह्यावरून, इतकें खचित सिद्ध होतें कीं, स्त्रियांची वृत्ति विशेष चंचल असल्याविषयीं, पाश्चात्य लोकांच्या प्रत्ययास आतां तरी निःसंशय आलें असावें. त्यांचें मानसिक सामर्थ्य पुरुषापेक्षां पुष्कळ कमी असतें, अशाबद्दल त्यांच्या मनानेंच घेतलें असावें. त्यांची शारीरिक शक्ति पुरुषाची बरोबरी केव्हांही करीत नाहीं, अशी या राष्ट्रांची आतां बालंबाल खात्री झाली असावी. आणि सारासार विचार, मनोनिग्रहशक्ति, व नीतिधैर्य, हीं अबलाजनांत बहुतकरून पूर्णत्वानें वास करीत नाहींत, ही गोष्ट सुध्दां कालान्तरानें त्यांच्या लक्षांत आली असावी. अर्थात्, ह्याच कारणांनीं, स्त्रियांनीं मागितलेले हक्क पाश्चात्यांनीं त्यांस दिलें नाहींत, हें उघड दिसतें.

भारतीयांची दूरदृष्टि.

आतां, जी गोष्ट पाश्चात्य राष्ट्रांस आज कळून आली, तीच गोष्ट आमच्या भारतीय आर्यपूर्वजांस सुमारें तीन हजार वर्षांपलीकडील कालांतच भासमानें[2] झाली होती. सबब, एकंदर समाजाची नीतिमत्ता उत्तम असावी; स्त्रियांची पवित्रता कायम रहावी; त्यांच्या पातिव्रत्यानें भावी संततीवर चांगला परिणाम घडून यावा; आणि सर्व देशाचें व अतएव राष्ट्राचें अपरिमित कल्याण व्हावें; इतकाच हेतु मनांत

1 Executive Authority or Power.

२ मनुस्मृति. भारतीय साम्राज्य. पु. ६ वें. पान ५३ ते ९९ पहा.

धरून, आमच्या पुराण स्मृतिकारांनीं केवळ स्त्रीसंरक्षणार्थच जे कित्येक नियम करून ठेविले, त्यांत " न स्त्री स्वातंत्र्यमर्हति, " एवढ्याच कारणानें मनूला दोष देणें अगदीं योग्य होत नाहीं.

स्त्रियांचें शिक्षण, संगोपन, व आदरातिथ्य, यासंबंधानें आमचें प्राचीन काळापासून लक्ष्य.

स्त्रियांचें शिक्षण, त्यांचें संगोपन, त्यांचें पूजन, आणि त्यांचें योग्य आदरातिथ्य, यासंबंधानें, आमचें अति प्राचीन काळापासून विशेष लक्ष्य असून, तेंच व्रत आम्हीं अजून देखील चालविलें आहे.

तत्संबंधाचें वेदकालापासून तों आजपर्यंतचें प्रमाण.

वेदकालांतील स्त्रीशिक्षणाविषयीं, आमचे प्रत्यक्ष वेदच प्रमाण होत. इतकेंच नव्हे तर, पाश्चात्यांनीं[1] देखील ती गोष्ट निर्विवाद कबूल केली आहे. मनुस्मृतिकालांत तर, स्त्रीशिक्षणाबरोबर लोकशिक्षणाची देखील विशेष सक्ती होऊन, ब्राह्मण, क्षत्रिय, आणि वैश्य, या वर्णत्रयांचें

---

१ ह्यासंबंधानें वेबर म्हणतो,

" We must at any rate assume among the Brahmans *of this* ( Vedic ) *period a very stirring intellectual life, in which even the women took an active part,* * * * women—*who with enthusiastic ardour plunge into the mysteries of speculation, impressing and astonishing men by the depth and loftiness of their opinions, and who solve the questions* proposed to them on sacred subjects. "

( Weber. H. I. L. P. P. 21-22 ).

सदरहू अवतरणांतील इतालिक वर्ण आमचे आहेत. ( ग्रंथकर्ता ).

शिक्षण झालेंच पाहिजे, असा मनूनें कडक नियम केला.[1] त्याच-प्रमाणें, भाऊबंद, सगेसोयरे, दीर, व खुद्द नवऱ्यानें सुध्दां, आपल्या बायकोस प्रेमानें, आदरानें, व सन्मानानें वागविलेंच पाहिजे, अशी खसूस मन्वाज्ञा[2] आहे. कारण, स्त्रिया म्हणजे केवळ गृहभूषणच[3] असून, त्यांच्या संतोषानेंच देशाचें आणि राष्ट्राचें कल्याण होतें, असें मनुस्मृतिकाराचें स्पष्ट वचन असल्याचें दिसून येतें. तसेंच, ज्या देशांत स्त्रियांची हेळसांड होते, तेथें त्या राष्ट्राची उन्नत्ति न होतां, तें आपो-आप मागासतें, व शेवटीं अवनतीप्रत पावून, कालान्तरानें लयासही[4] जातें, असें त्यानें स्पष्टच सांगितलें आहे.

---

१ अधीयीरं स्त्रयो वर्णाः स्वकर्मस्था द्विजातयः ॥ १ ॥
(म. स्मृ. अ. १० )

२ पितृभिर्भ्रातृभिश्चैताः पतिभिर्देवरैस्तथा ।
पूज्या भूषयितव्याश्च बहुकल्याणमीप्सुभिः ॥ ५५ ॥
यत्र नार्यस्तु पूज्यन्ते रमन्ते तत्र देवताः ॥ ५६ ॥
तस्मादेताः सदापूज्या भूषणाच्छादनाशनैः ।
भूतिकामैर्नरैर्नित्यं सत्कारेषूत्सवेषुच ॥ ५९ ॥
(म. स्मृ. अ० ३. )

३ प्रजनार्थं महाभागाः पूजार्हा गृहदीप्तयः ।
स्त्रियः श्रियश्च गेहेषु न विशेषोऽस्तिकश्चन ॥२६॥
(म. स्मृ. अ० ९. )

४ ह्यासंबंधानें स्मृतिकार असें लिहितात कीं,
यत्रैतास्तु न पूज्यन्ते सर्वास्तत्राफलाः क्रियाः ॥ ५६ ॥
(म. स्मृ. अ. ३. )

ह्यावरून, भारतीय स्त्रियांस उचित असें सर्व प्रकारचें स्वातंत्र्य असतें, ही गोष्ट कोणालाही कबूल केली पाहिजे. इतकेंच नव्हे तर, हिन्दु साम्राज्यांत त्यांची सर्व प्रकारें उन्नतीचीच स्थिति असल्यामुळें, त्या निरंतर सुखांत व आनंदांत आपले दिवस घालवीत, आणि हल्लींही घालवितात, ही गोष्ट सांप्रतकाळीं देखील पाश्चात्यांस नाहीं म्हणवणार नाहीं. कारण, त्या गोष्टीचा त्यास प्रत्ययच आला आहे; व ती प्रत्यक्ष अनुभवानें ही सिद्ध झाली

त्याला मिळालेलें पाश्चात्य मताचें पुष्टीकरण.

१ ही गोष्ट वेबरसारख्या अतितीक्ष्ण गुणदोषविवेचकाला सुद्धां कबूल करणें भाग पडल्यामुळें, तो म्हणतो :—

" The *free position, held by* ( Hindu ) *women at this* ( Vedic ) *time, is remarkable.* We find songs of the most *exquisite kind attributed to poetesses and queens,* among whom the daughter of Atri appears in the foremost rank. "

( Weber's H. S. I. L. P. 38. )

२ लेडी डफरिनला ह्या बद्दलचा पुष्कळ व चांगला अनुभव आला होता. कारण, ती आमच्या संभावित स्त्रियांस वारंवार भेटून, हरएक प्रकारचा तपास करी. आणि त्यामुळेंच, भारतीय अबलांच्या सुशीलतेविषयीं तिची पूर्ण खात्री झाली होती. सबब, पाश्चात्यांच्या माहितीसाठीं, तिचा अनुभव येथें देतों. ती ह्मणते,

" But, deeply as I feel for an Indian woman's sorrows, *I cannot ignore her joys, and I certainly am able to have a more kindly sentiment towards the* ( Hindu ) *nation as a whole, because I have seen happy wives* and *happy mothers in* India, and *because I believe in happy Indian homes.* " ( Lady Dufferin's article in the Nineteenth Century. )

आहे. अर्थात, एतद्विषयक सूर्य आणि जयद्रथासारखीच वस्तुस्थिति असल्यामुळें, त्याबद्दल कोणत्याही प्रकारचा आक्षेप न घेतां, त्या गोष्टीला ग्रॅण्टडफ[1] सारख्या इतिहासकारासही मान डोलविणें भाग पडलें.

पाश्चात्य नीतिशैथिल्य व त्याचा पाश्चात्यांस आलेला कंटाळा.

अशा प्रकारचें आम्हा भारतीयांचें शिक्षण, आमच्या स्त्रियांचे तें अपूर्व सौजन्य, आणि आमच्या चाली रीती, ह्या पुष्कळ पाश्चात्यांस फारच पसंत पडतात; व खुद्द त्यांच्याच समाजव्यवस्थेला ते[2] मनापासून नाकें मुरडतात. कारण, पवित्रता, सरलता, निर्मलता, आणि साधेपणा, हेंच हिंदुस्मृतिकारांचें मूलतत्व असून, पाश्चात्य समाजांत तें विशेषेंकरून दिसूनच येत नाहीं. तिकडे डामडौल, छानछोकी, नट्टापट्टा, भलभलती चैन, दुराचरण,

---

१ हा मराठ्यांचा इतिहासकार असून, हिंदुस्थानांत पुष्कळ दिवस राहिला होता; व त्यानें अनेक जबाबदारीचीं व हुद्याचीं कामें बजाविलीं होतीं. हा असें लिहितो कीं,

"The women in the Maratha Country are *well treated; they are the help-mates but by no means the slaves, of their husbands; nor are they in the degraded state, in which some travellers have described the condition* of the *women* in other parts of India." (Grant Duff's History of the Marathas. P. 8)

सदरहू अवतरणांतील इतालिक वर्ण आमचे आहेत. (ग्रंथकर्ता.)

२ फ्रेडरिकपिंकॉट. भारतीय साम्राज्य. पु. ६ वें. पा. ७९-८२.

रूपरंग, व अयेष-आराम, यांतच स्त्री पुरुष दंग असल्यामुळें, नीतिशैथिल्य सहजींच उत्पन्न होतें; आणि तें पाहून किंवा ऐकून सुद्धां, कंटाळवाणी वाटतें. इतकेंच नव्हे तर, तिकडील नीति कित्येक प्रसंगीं अशा तऱ्हेच्या अवनतीप्रत पोहोंचली आहे, असें मनांत येऊन, मनुष्यमात्राच्या नीतिभ्रष्टतेबद्दल निव्वळ तिरस्कारच उत्पन्न होतो, यांत संशय नाहीं.

हिंदूंचें अतुल नीतिवर्तन, व तें स्मृतिकारांच्या श्रमाचें फळ.

असो. तात्पर्य म्हणून इतकेंच कीं, आमच्या स्मृतिकारावर निष्कारण दोष न ठेवतां, हिंदुसमाजांतील नीतिबंधनाचें अध्ययन करण्याविषयीं, मिस्तर फ्रेडरिक पिकॉटनें कित्येक पाश्चात्यांस जी सल्ला दिली आहे, ती अगदीं यथार्थ आहे. आणि ह्मणूनच सर जॉर्ज बर्डवूड यांनीं आमच्या समाजबंधनाविषयीं मोठ्या प्रेमानें

१ आंग्ल समाजपद्धति, स्त्रीनीति, धर्मबंधन, इत्यादिविषयक पुस्तकांत, या बाबतींचा भरपूर उजेड पडलेला दिसतो.

"Side lights on English Society. Sketches from Life, Social, & Satirical." By E. C. Grenville. Murray. 1885., इत्यादि पुस्तकें पहावीं.

२ ह्यांचें असें मत असे कीं, हिंदुसमाजांतील स्पृहणीय स्थिति म्हटली म्हणजे, पति व पत्नी यांचें परस्पर अप्रतीम प्रेम; तिची सर्वोत्कृष्ट अवस्था म्हटली म्हणजे दृढानुबंधन; आणि तिचें सुमनोहर रूप म्हटलें म्हणजे कुटुंबवात्सल्य होय. सबब, संमति कायद्यावर आक्षेप घेतांना, त्यांनीं असें स्पष्टपणें बोलून दाखविलें कीं,

"Above any other subject affecting the Hindus,

( पुढें चालू )

व मार्मिकतेनें लिहून, ते सर्वांस असें स्पष्टपणें आणि निक्षून सांगतात कीं, हिंदूंच्या इतका साधेपणा, त्यांची सरळता, त्यांचें प्रेम, त्यांचा आदर, व त्यांची पवित्रता, हे गुण पृथ्वीवरील दुसऱ्या एका राष्ट्रांत देखील दृष्टीस पडत नाहींत. अर्थात्, हें निवळ आमच्या स्मृतिकारांच्या श्रमाचें, त्यांच्या दूरदृष्टीचें, आणि त्यांच्या नीतिनियमाचेंच फळ होय, हें कोणालाही कबूलच केलें पाहिजे.

---

( मागील पृष्ठावरून पुढें चालू. )

this ( marriage-law-reform ) is the one, they should be left to deal with themselves.. * * * The marriage laws of the Hindus have served to create the highest type of family life known. For its *simplicity, affection, reverence,* and *purity, it is absolutely inapproachable by ony other nation.* "

सदरहू अवतरणांतील इतालिक वर्ण आमचे आहेत. (ग्रंथकर्ता)

# भाग ६८ वा

## शास्त्रविषयक--ग्रंथभांडार.

## वेदान्तशास्त्र.

वेदान्तशास्त्र व त्याचीं सहा अंगें.

धर्मशास्त्रानन्तर, दुसरा महत्वाचा शास्त्रीय विषय म्हटला म्हणजे, वेदांतशास्त्र होय. ह्या शास्त्राचीं मुख्यत्वेंकरून सहा अंगें असून, तीं पुढें निवेदन केल्याप्रमाणें, षड्दर्शनें या नांवानें सुप्रसिद्ध आहेत. [1] १ सांख्यदर्शन. २ योगदर्शन. ३ जैमिनिदर्शन; ह्यालाच कर्मकांड, किंवा पूर्वमीमांसा म्हणतात. ४ वेदान्तदर्शन; ह्याला ज्ञानकांड, शारीरकमीमांसा, ब्रह्ममीमांसा, अथवा उत्तरमीमांसा, असें देखील म्हणण्याचा परिपाठ आहे. ५ वैशेषिकदर्शन. आणि ६ न्यायदर्शन. आतां, ह्या सर्वांचा आपण क्रमशः विचार करूं.

---

१ ह्यासंबंधाचा साद्यन्त तपशील आम्ही भारतीय साम्राज्याच्या चवथ्या पुस्तकांतील २१ व्या भागांत दिला आहे. मात्र, संस्कृत वाङ्मयाची अवश्य ती ज्यास्त हकीकत येथें दिल्यानें, ती सर्व एकत्र पाहण्यास सुलभ पडेल असें मनांत येऊन, तितकीच या ठिकाणीं नमूद केली आहे. शिवाय, संस्कृत भाषेच्या सविस्तर इतिहासांत ती दाखल करणें देखील जरूर आहे.

## १ सांख्यदर्शन.

सांख्यदर्शन.

ह्या सर्वांत, अति पुराण असें **सांख्यदर्शन** असून, **सत्कार्यवाद** अथवा **परिणामवाद** हेंच त्याचें मूळ बीज होय. म्हणजे कार्य हेंच कारणामध्यें सूक्ष्म रूपानें असतें; आणि कारणसामग्रीच्या सन्निधानानें तें व्यक्त होतें. अथवा, कारण हेंच कार्यस्वरूपानें परिणामाप्रत पावतें; परंतु तें कार्य नवीन उत्पन्न होत नाहीं; असा ह्या दर्शनाचा सिद्धान्त आहे. उदाहरणार्थ, दहीं दुधामध्यें, पट तंतूमध्यें, व घट मृत्तिकेमध्यें, अशीं सूक्ष्मरूपांनीं मुळचींच राहत असून, तीं केवळ कारणसामग्रीच्या योगानेंच आविर्भूत होतात, आणि परिणाम पावतात. अर्थात्, दूध, तंतू, व माती, हीं यथानुक्रमें, अम्ल व काल, तुरी आणि वेम, दंड व कुलाल, इत्यादि कारण-सामग्रीच्या सान्निध्यानें परिणामाप्रत पावून, तीं दधि, पट, आणि घट, या अवस्थांप्रत पोहोंचतात.

सांख्य शब्दाची व्याख्या.

**सांख्य** शब्द प्रथमतः **तैत्तिरीय** व **अथर्वोपनिषदांत** आढळतो. त्याचप्रमाणें, तो **निरुक्तांत** आणि **भगवद्गीतेंत** देखील दृष्टीस पडतो. हें नांव **सांख्य**-दर्शनांतील पदार्थविषयक **सांख्यमीमांसेवरून** विशेषतः पडलें असावें, असें कित्येक म्हणतात. तथापि, **कपिल**

---

१ ह्यांचें तपशिलवार विवेचन **भारतीय** साम्राज्याच्या चवथ्या पुस्तकांत केलें आहे. पान ४३ पहा.

भाष्यांत **सांख्य** शब्दाची जी व्याख्या दिली आहे, तिजवरून, सदसद्विचारानें जी आत्म्याची ओळख होते, तेंच **सांख्यदर्शन** होय, असें वाटतें.

सांख्यदर्शनाचे भेद.

**सांख्यदर्शनाला निरीश्वरवाद** सुद्धां म्हणतात. परंतु, त्यांत **निरीश्वर** व **सेश्वर** असा भेद आहे. **कपिल**, **आसुरि**, आणि **पंचशिख**, इत्यादि **निरीश्वर** मतांतले असून, **पतंजलि**, **व्यास**, व **याज्ञवल्क्य**, वगैरे तत्ववेत्ते सेश्वरवादी होत. आणि म्हणूनच, ह्यांच्या मताचा **योगदर्शन** हा स्वतंत्र भाग झाला आहे.

निरीश्वर सांख्यदर्शनाचा प्रवर्तक, व त्याची कृति, आणि काळ.

**सांख्यदर्शनाचा** आदि प्रवर्तक **कपिल**[1] महामुनि होय. ह्यानें "**अथ त्रिविधदुःखात्यन्तनिवृत्तिरत्यन्तपुरुषार्थः।**" या सूत्रापासून तों "**यद्वा तद्वा तदुच्छित्तिः पुरुषार्थस्तदुच्छित्तिः पुरुषार्थः।**" या सूत्रापर्यंत, षडध्यायी **सांख्यप्रवचन** नांवाचा ग्रंथ केला, व तो आपल्या **असुरि** नामक शिष्यास सांगितला. पुढें, **असुरीनें पराशर** गोत्रांतील **पंचशिख** नांवाच्या शिष्यास उपदेश केला; आणि ह्या शिष्यपरंपरेपासून जें **सांख्यदर्शन** प्राप्त झालें, त्याचें सार, व सिद्धान्त, वगैरे अवलोकन करून, **ईश्वर कृष्ण** पंडितानें **सांख्यकारिका** नांवाचा सुबोध

१ ह्याच्या कालाबद्दल भा० सा० च्या ४ थ्या पुस्तकांत विवेचन आहे; व तो इ. स. पू. २००० वर्षांपलीकडे झाला असावा, असें वाटतें.

ग्रंथ रचला. ह्या सांख्यकारिकेवर, शंकराचार्यांचा परमपूज्य गुरु जो गौडपाद, त्यानें भाष्य केलें आहे.

तिच्यांतील विषय.

पूर्वोक्त सांख्य प्रवचनाचे १ विषयाध्याय, २ प्रधान-कार्य, ३ वैराग्य, ४ आख्यायिका, ५परपक्ष निर्जय, आणि६ तंत्राध्याय, असे सहा अध्याय असल्यामुळें, त्याला षडध्यायी सांख्य-प्रवचन असें नामधेय पडलें असून, ह्याजवरच कपिलभाष्य अथवा सांख्यभाष्य नांवाची टीका आहे. तत्त्वसमास हा देखील कपिलाचाच ग्रंथ आहे.

## २ योगदर्शन.

सेश्वर सांख्यदर्शन.

पूर्वी निर्दिष्ट केल्याप्रमाणें, योगदर्शन हें सांख्यदर्श-नाचाच एक भाग होय. आणि म्हणूनच त्याला कोठें कोठें सांख्य-योग सुद्धां म्हणतात. योग शब्दाचा अर्थ ईश्वरसायुज्य, निर्वाण, किंवा परब्रह्मांत लय, असा असल्याचें दिसतें. कारण, तैत्तिरीयारण्यक व काठकोपनिषद्, यांत तो शब्द सदरहू अर्थानेंच आढळतो.

ईश्वराचें लक्षण.

पतंजलि हा योगदर्शनाचा प्रवर्तक असून, त्यानें ईश्व-राचें लक्षण खालीं लिहिल्याप्रमाणें दिलें आहे. "क्लेशकर्म विपा-काशयै रपरामृष्टः पुरुषविशेष ईश्वरः।"

पतंजलीचे[1] ग्रंथ म्हटले म्हणजे, १ योगशास्त्र, व

---

१ हा इ. स. पू. १४३ वर्षांच्या सुमारास उदयास आला होता.

पतंजलीचा काल, त्याची कृति, व तिजवरील व्याख्या.

२ ब्रह्ममीमांसाभाष्य, असे होत. ह्यांजवर १ सांख्यसार, आणि २ योगवार्तिक नांवाच्या विज्ञानभिक्षूनें केलेल्या दोन टीका असून, ब्रह्ममीमांसाभाष्य ही वेदान्तावरील व्याख्या होय.

## ३ जैमिनिदर्शन अथवा पूर्वमीमांसा.

जैमिनिदर्शन किंवा कर्मकांड.

खरें ज्ञान प्राप्त होण्यासाठीं, प्रथमतः कर्मच केलें पाहिजे, अशाविषयीं ह्या दर्शनाचा पूर्ण कटाक्ष आहे. आणि म्हणूनच त्याला कर्मकांड अथवा कर्ममीमांसा असेंही म्हणतात. पूर्वमीमांसेचे बारा अध्याय सूत्रबद्ध असून, त्यांजवर शबर स्वामींचें भाष्य आहे. ह्याचीं एकंदर सूत्रें २,६५२ आणि ९१५ अधिकरणें असल्याचें कळतें. एतद्विषयक ऊहापोहांत, अनेक ऋषींचीं नांवें प्रमाणादाखल नमूद केलेलीं आढळून येतात. तथापि, त्यांतही खालीं लिहिलेलीं मुख्य होतः—१ आत्रेय. २ बादरि. ३ बादरायण. ४ लाबुकायन. ५ ऐतिशायन. ६ अस्मरथ्य. ७ औदुलोमि. ८ कार्ष्णाजिनि. ९ कासकृत्स्न. व १० पतंजलि.

---

१ ह्या षड्दर्शनांचा व तत्वविचारांचा मुख्य हेतु म्हटला म्हणजे आत्मस्वरूपाची ओळख, नित्यानित्यवस्तूचा विवेक, वासनांचा त्याग, व जन्ममरणापासून मुक्ति, हा होय. आणि हेंच तत्व ग्रीक लोकांनीं आमच्यापासून उचललें, यात बिलकुल शंका नाहीं.
( Vide Enfields History of Phillosophy. I. 233-382. )

पूर्वमीमांसा व शबर भाष्य, यांजवर भट्ट कुमारिलस्वामी, प्रभाकर[1], पार्थसारथिमिश्र[2], चंदनदेव[3], भवनाथमिश्र[4], राघवानंद, विद्यारण्यस्वामी, मुरारिमिश्र, इत्यादींच्या टीका आहेत. ह्या खेरीज माधवाचार्यकृत न्यायमालाविस्तार[5] नामक ग्रंथ देखील सुप्रसिद्ध आहे.

जैमिनीची कृति, व तिजवरील भाष्य.

जैमिनि हा पूर्वमीमांसेचा प्रवर्तक असून, तो सामवेदाचाही प्रकाशक असल्याचें पुराणांवरून कळून येतें. ह्याचा काल अजून निश्चित झालेला नाहीं. परंतु, तो इ. स. पू. १५०० वर्षांच्या सुमारास झाला असावा असें वाटतें. ह्या दर्शनाच्या मूलतत्वांची सविस्तर हकीकत, भारतीय साम्राज्याच्या चवथ्या पुस्तकांतील एकविसाव्या भागांत दिली आहे. सबब, तत्संबंधानें येथें आणखी ज्यास्त विचार करण्याचें प्रयोजन नाहीं.

जैमिनीचा काळ.

---

१ ह्याला गुरु असेंही उपपद दिलेलें आढळतें.

२ हा कुमारिल भट्टाच्या दीक्षेंतला होता. मीमांसेवरील ह्याची टीका शास्त्रदीपिका नांवानें सुप्रसिद्ध आहे. हिच्यावर देखील सोमनाथ नांवाच्या कर्नाटकी ब्राह्मणानें मयूखमाला नांवाची व्याख्या केली असल्याचें दिसतें.

३ ह्याची भट्टदीपिका नांवाची मीमांसेवर टीका आहे. मीमांसा कौस्तुभ नांवाचा ग्रंथ देखील ह्याचाच होय.

४ ह्यानें मीमांसान्यायविवेक नांवाची टीका केली आहे.

५ "न्यायमाला दीधिति" ही ह्याचीच व्याख्या होय.

तथापि, जैमिनिदर्शनांत, म्हणजे पूर्वमीमांसेंत, एका अत्यन्त महत्वाच्या प्रश्नाचा ऊहापोह फारच मार्मिक रीतीनें केला आहे. यासाठीं, त्याबाबतींत अवश्य तें विवेचन करणें विशेष जरूरीचें दिसतें. म्हणून, क्षणभर तिकडे वळतों.

जैमिनिदर्शनांतील एक महत्वाचा प्रश्न.

बहुतेक पाश्चात्यांची आतां अशी ठाम समजूत झाली आहे कीं, भारतीय हे फार बुद्धिमान असल्याकारणानें, त्यांनीं ज्ञानाच्या असंख्य शाखांत, नानाविधशास्त्रांत, आणि अनेक कलांत, सखोलान्वेषण करून, मोठ्या परिश्रमानें पुष्कळ शोध केले आहेत. परंतु, शासनकला, किंवा राजा व प्रजा यांची परस्पर इतिकर्तव्यता, याविषयींचा त्यांनीं बिलकुल केव्हांही विचारच केला नाहीं, असा त्यांचा आक्षेप आहे. पण, थोडीशी मेहेनत घेऊन जरा काळजीपूर्वक अवलोकन केलें, तर कोणालाही असें सहजीं दिसून येईल कीं, ही त्यांची समजूत केवळ भ्रान्तिमूलक असून, अगदीं चुकीची आहे. कारण, वस्तुस्थिति याहून निःसंशय भिन्न आहे. एवढेंच नव्हें तर, [1]यासंबंधानें आम्ही फार प्राचीनकाळींही बराच विचार केला असल्याबद्दल, ग्रंथान्तरीं आणि शास्त्रीय लेखांत देखील मुद्देसूत प्रमाण आहे.

शासनकला.

एतद्विषयक पूर्वमीमांसेंत जें विवेचन आहे, तें खरोखर

---

१ मनुस्मृति; पूर्व मीमांसा. (६. ७. १–२); भारतीय साम्राज्य पु. ५ वें, भाग ३२ वा; पहा.

तद्विषयक मनूच्या वेळीं झालेला खल.

विचार करण्यासारखें असून, तें सांप्रत काळच्या नूतन राज्यपद्धतिविचाराला सुद्धां लाजविणारें आहे. ज्या राजकीय विचारासंबंधीं पाश्चात्य देशांत आतांशाच कोठें चळवळ होऊन भवतिनभवति चालली आहे, त्याबद्दल आमच्या भरतखंडांत मनूच्या वेळीं, म्हणजे सुमारें तीन साडेतीन हजार वर्षांपूर्वी, विचार होत होता, ही गोष्ट विशेष रीतीनें ध्यानांत ठेवण्यासारखी आहे. शास्त्याची आवश्यकता, आमच्या आर्यपूर्वजांचें तत्संबंधीं दूरदार्शित्व, राजाची इतिकर्तव्यता, दुर्गुणांपासून त्याचें अलिप्तत्व, त्याची प्रजापालनदक्षता, त्याचा विनय, त्याचे मंत्री, त्याचे दूत, प्रजेचें संरक्षण, बाह्य परचक्राचा बंदोबस्त, अन्तःसंक्षोभ न होऊं देण्याविषयींची तजवीज, शांततेचे उपाय, साम, दाम, दंड, व भेद, यांची प्रसंगानुसार योजना, उचितकाळीं शत्रूवर चाल, युद्धासाठीं लढवय्ये लोकांची सैन्यात भरती, सैन्याचे विभाग व त्यांचें आधिपत्य, व्यूहरचना, वध्यावध्य विचारांत अनुकंपा, जिंकलेल्या देशाची व्यवस्था, युद्धजितद्रव्याचा विनियोग, खर्चासाठीं करभाराची व्यवस्था, धंदेवारीप्रमाणें कराचा यथान्याय विभाग, जकात व दस्तुरी, लष्करी व मुलकी बंदोबस्त, तत्संबंधीं कामगारांचा मुशाहिरा, धर्म, अर्थ, काम, आणि मोक्ष, यांसंबंधाची प्रजेची इतिकर्तव्यता, राजाचा पुरुषार्थ, राजनीति, आणि अखिल देशांतील शान्तता, इत्यादि

बाबतींत आमच्या आर्य पूर्वजांनीं पुष्कळ मेहेनत घेऊन खचितच चांगला विचार केला होता.

असो. ह्यासंबंधानें जैमिनिदर्शनांत याहून अगदीं भिन्न दिग्दर्शन असून, तींत भूमिदानासंबंधीं राजाच्या हक्काची पूर्णमीमांसा केली आहे.

तत्संबंधीं जैमिनीचे विचार.

भूमीवरील सत्तेविषयीं लिहितांना, जैमिन्याचार्य असें म्हणतात कीं, सार्वभौमराजा अगर मांडलिक, यांची भूमीवर कोणत्याही प्रकारची मालकी किंवा हक्कसंबंध नाहीं. कारण, जयप्राप्तीनें त्यांजला जी सत्ता मिळते, ती पृथिवीपालन, राज्यसंरक्षण, व अनाथरक्षणार्थच असते. इतकेंच नव्हे तर, हरएक अपराध्यास योग्य शासन करून, अन्यायाचें निर्मूलन करण्यासाठींच त्याची योजना असते, हें विशेष रीतीनें सांगावयास नको. फार तर काय लिहावें, पण, अशा प्रकारच्या साम, दाम, दंडादि विधीनेंच प्रजेचें संगोपन करावें लागतें; आणि यासंबंधाची एकंदर व्यवस्था सुरेख राखण्यासाठीं, व अबाधित बंदोबस्त ठेवण्याकरतांच, राजाला करभार मिळतो, आणि गुन्हेगारांकडूनही दंड वसूल करावा लागतो.

राजाचे हक्क आणि प्रजेची सत्ता.

परंतु, हे वसूलबाबीचे हक्क प्राप्त झाल्यानें, राजाला भूमीवरील सत्ता मात्र उपलब्ध होत नाहीं. कारण, तसें झाल्यानें अन्याय होईल, व त्याच्या राज्यांत

१ ह्या सर्व गोष्टींची साद्यन्त हकीकत आम्ही भारतीय साम्राज्याच्या पांचव्या पुस्तकांतील ३२ व्या भागांत, सप्रमाण दिली आहे.

जे कोणी सुखवस्तू राहत असतील, त्यांच्या घरादारावर, आणि जमीनजुमल्यावर देखील, तो आपला हक्क सांगेल. अर्थात्, असा प्रकार घडून आल्यानें निव्वळ अन्याय होईल. सबब, जैमिन्याचार्य असें म्हणतात कीं, ही पृथिवी राजाची नसून, तींत प्रत्येक मनुष्याचे साधारणतः एकसारखेच हक्क आहेत. आणि जो तो यथाशक्ति कष्ट करून, आपापल्या मेहेनतीच्या फळाचा यथेष्ट उपभोग घेतो, व ह्याच कारणासाठीं, आपल्या राज्यांतील जमीन, सार्वभौम राजाला अगर मांडलिक प्रभूला, केंव्हांही दान म्हणून करताच येत नाहीं. मात्र, कांहीं जमीन किंवा शेतें राजानें विकत घेतल्यास, फक्त त्याचाच विनियोग त्याला आपल्या मर्जीप्रमाणें करतां येतो, हें उघड आहे.

**स्वदाने सवमविशेषात् ॥ १ ॥**
**यस्यवाप्रभुः स्यादितरस्याशक्यत्वात् ॥ २ ॥**
**नभूमिः स्यात्सर्वान्प्रत्याविशिष्टवात् ॥ ३ ॥**

( जैमिनीय न्यायमाला विस्तरः । अ. ६ पा. ७. अधि. १-२-३. )

इत्यादि सूत्रांत, राजाचे हक्क, आणि प्रजेची सत्ता, यांविषयींचें मोठें मार्मिक[1] विवेचन जैमिनीनें केलें आहे. त्यावरून, तितक्या पुरातन काळीं देखील, आमच्या आर्यपूर्वजांची राजकीय सत्ताविषयक किती उदात्त कल्पना

---

१ ह्या बद्दलचें, बड्या बड्या पाश्चात्य पंडितांस सुद्धां, विलक्षण नवल वाटतें. एतद्विषयक विवेचन करतांना, कोलब्रूकनें एके ठिकाणीं असें म्हटलें आहे कीं,

( पुढें चालू )

व दीर्घ दृष्टि होती, त्याबद्दलची पौरस्त्य आणि पाश्चात्य राष्ट्रांची खात्री होऊन, त्यांजला कौतुक वाटल्याशिवाय खचितच राहणार नाहीं.

## ४ वेदांतदर्शन.

वेदान्त म्हणजे ज्ञानाचा अन्त किंवा सीमा होय. हा शब्द तैत्तिरीय आरण्यकांत, काठकोपनिषदांत, आणि मुंडकोपनिषदांत आढळतो. ह्या दर्शनाचा प्रवर्तक बादरायण असून, तो इ. स. पू. १४०० वर्षांच्या सुमारास, परंतु जैमिनीनंतर, झाला असावा, असें कित्येकांचें मत आहे. तथापि, हा व्यास बादरायण कोणता, याविषयींचा निश्चय झाला नसल्यामुळें, त्याच्या कालाचा निर्णय करता येत नाहीं.

वेदान्तदर्शन व त्याचा प्रणेता.

ह्या दर्शनांत, इच्छाशक्ति, कर्मविपाक, पुनर्जन्म, श्रद्धामाहात्म्य, आणि ईशप्रसाद, यांबद्दलचें विवेचन असून, अद्वैतमताचें प्रतिपादन उत्तम प्रकारें केलेलें दिसतें.

वेदान्त दर्शनाचें निरूपण करतांना, मुख्यत्वेंकरून

( मागील पृष्ठावरून पुढें चालू. )

" A question of considerable interest, as involving the important one concerning property in the soil in India, is discussed in the 6 th lecture"(of the पूर्व मीमांसा. )

" It is here asked, whether paramount sovereign shall give all the land to the priests."

( Colebrooke. i. 320. )

उपनिषदांवरच हवाला देण्यांत येतो. तथापि, त्यांतही, १ छान्दोग्य, २ कौषीतकी, ३ बृहदारण्यक, ४ ऐतरेयक, ५ तैत्तिरीयक, ६ काठक, ७ कठवल्ली, ८ मुंडक, ९ प्रश्न, १० श्वेताश्वतर, ११ ईशावास्य, १२ केन, इत्यादि प्रमुखत्वानें गणलीं जातात.

त्याजवरील टीका.

ब्रह्मसूत्रावर बौधायनऋषि, उपवर्ष, आणि शंकराचार्य, यांची टीका आहे. परंतु, शंकराचार्यांचें भाष्य सर्वांत उत्तम असून, तें सर्वमान्य आहे. ह्याला शारीरकमीमांसाभाष्य म्हणतात. ह्या भाष्यावर देखील अनेक पंडितांची टीका आहे. तथापि, त्यांत सुध्दां वाचस्पति मिश्राची टीका सर्वोत्कृष्ट आहे, व हिला भामति किंवा शारीरक भाष्यविभाग म्हणतात. ह्याखेरीज, दुसरे सामान्य टीकाकार खालीं लिहिल्या. प्रमाणें होत:—

अनलानन्दव्यासाश्रमकृत वेदान्त कल्पतरू. २ अद्वैतानन्दकृत ब्रह्मविद्याभरण. ३ गोविन्दानंदकृत भाष्यरत्नप्रभा. ४ रामानुजभाष्य. ५ वल्लभाचार्यभाष्य. ६ भट्टभास्करभाष्य. ७ अनन्ततीर्थमधुभाष्य. ८ नीलकंठभाष्य ९ ब्रह्मानन्दसरस्वतीकृत वेदान्तसूत्रमुक्तावलि. १० भास्कराचार्यकृत ब्रह्मसूत्रभाष्य अथवा मीमांसाभाष्य. ११ भावदेवमिश्रकृत वेदान्तसूत्रव्याख्याचन्द्रिका. १२ रंगनाथकृत व्याससूत्रवृत्ति. १३ गंगाधरकृत सुबोधिनी अथवा शारीरसूत्रसारार्थचन्द्रिका. व १४ रामानन्दकृत ब्रह्मामृतवर्षिणी.

## ५ वैशेषिकदर्शन.

ह्या दर्शनास औलूक्यदर्शन, किंवा पदार्थविज्ञानशास्त्र म्हणतात. ह्यांत द्रव्यभेदक असा एक प्रकारचा विशेषपदार्थ मानण्यांत येतो. सबब, त्याला 'वैशेषिकदर्शन असें नामधेय पडलें आहे. ह्याचा प्रणेता कणाद नांवाचा ऋषि काश्यप गोत्रांतील असून, त्याला वेदान्तवादी थट्टेनें कणभुक अथवा कणभक्ष्य हें उपपद देतात. ह्या शास्त्राचें सूत्रबद्ध विवेचन कणादानें दहा अध्यायांत केलें आहे, व तत्संबंधीं दुसरी अवान्तर माहिती आणि तपशिलवार हकीकत भारतीय साम्राज्याच्या चवथ्या पुस्तकांत दिली[1] आहे. वैशेषिक सूत्रांवर सुप्रसिद्ध पादाचार्यांचें भाष्य आहे, व त्याजवर उदयनाचार्यांची टीका आहे. न्यायकुसुमांजलि वगैरे प्रख्यात ग्रंथ ह्याचेच असून, त्यांत त्यांनीं यथावत् नास्तिक मताचें यथार्थ खंडन केलें आहे. वैशेषिक सूत्रांवर उपस्कार नांवाची शंकरमिश्राची देखील टीका आहे; आणि तिजवर नारायण तर्कपंचाननाची व्याख्या आहे.

वैशेषिकदर्शन, व त्याचा प्रणेता.

वैशेषिक सूत्रांवरील भाष्य, कणादाचा काल.

कणाद हा पाणिनीच्याही पूर्वींचा असल्याचें दिसतें.

१ भा. सा. पूर्वार्ध. पु. ४ थें. पान ५० ते ५२ पहा.

२ मॉक्समुलर, वेबरकृत संस्कृत वाङ्मयाचा इतिहास, इत्यादि पहा. पाणिनीचा काल इ. स पूर्वीं ७०० वर्षें असल्याविषयीं भट भांडारकर यांचें मत आहे. ( दक्षिणचा इतिहास. )

## ६ न्यायदर्शन.

न्यायदर्शन, व त्याचा प्रवर्तक, आणि काळ

ह्या दर्शनाचा प्रवर्तक **गौतम** असून, त्याला **अक्षपाद** अशी देखील संज्ञा आहे. त्याचप्रमाणें, ह्या दर्शनाला **आन्वीक्षकी विद्या**, **न्यायशास्त्र**, किंवा तर्कशास्त्र सुद्धां म्हणतात. **गौतम** हा **कणादानन्तरच** **पाणिनीच्या** सुमारास उदयास आला असावा, असें वाटतें. कारण, वेदान्त-सूत्रांत वैशेषिक दर्शनाचें खंडन अनेक वेळा केलें असल्याचें दिसत असून, त्यांत **गौतम** दर्शनाचा म्हणजे अर्थात्च **न्याय**दर्शनाचा किंवा तर्कशास्त्राचा कोठेंही उल्लेख केल्याचें आढळून येत नाहीं.

न्यायावरील ग्रंथ व टीका

न्यायदर्शन हें सूत्र बद्ध असून, त्याचे एकंदर पांच अध्याय[१] आहेत, आणि ह्या प्रत्येक अध्यायाची दोन आन्हिकें आहेत. ह्या दर्शनांवर[२] अनेक वार्तिकें, टीका, दीपिका, व अन्य ग्रंथ असल्याचें दिसून येतें. सबब, त्यांपैकीं फक्त महत्वाच्या ग्रंथांचाच तपशील येथें देतो.

---

१ यांतील तपशीलाची साद्यन्त हकीकत भारतीय साम्राज्याच्या चवथ्या पुस्तकांत दिली आहे. ( पान ५३ पहा. )

२ ह्या संबंधानें कोलब्रूकनें एके ठिकाणीं असें ह्मटलें आहे कीं,

" No department of Science or Literature has more engaged the attention of the Hindus, than the न्याय; and the fruit of their lucubrations has been an infinity of volumes, among which are compositions of celebrated schoolmen. "

( Colebrooke. vol. i. P. 264, )

१ उदयनाचार्यकृत वार्तिकतात्पर्यपरिशुद्धि. २ वाचस्पतिमिश्रकृत वार्तिकतात्पर्यटीका. ३ गौतमसूत्रांवरील विश्वनाथाची टीका. ४ वल्लभाचार्यकृत न्यायलीलावती. ५ केशवमिश्रकृत तर्कभाषा. ६ गौरीकंठकृत भावार्थदीपिका. ७ ह्यानेंच सद्युक्तिमुक्तावली नांवाचा ग्रंथही केला आहे. ८ गोवर्धनमिश्रकृत तर्कभाषाप्रकाश. ही तर्कभाषेवरील टीका होय. ९ माधवदेवकृत तर्कभाषासारमंजरी. १० ह्याचाच न्यायसार नांवाचा दुसरा ग्रंथ आहे. ११ रामलिंगकृति. १२ न्यायसंग्रह. १३ बलिभद्राचा न्यायावरील ग्रंथ. १४ कोंडभट्टकृत पदार्थ दीपिका. वैयाकरण भूषण हा याचाच ग्रंथ आहे. १५ नारायणतीर्थकृत कुसुमांजली, व १६ कारिका. १७ गोविंदभट्टाचार्यकृत न्याय संक्षेप; इत्यादि.

षड्दर्शनाचें परिशीलन, व त्यापासून होणारें ज्ञान.

असो. तात्पर्य इतकेंच कीं, ह्या षड्दर्शनाच्या परिशीलनानें आपल्या मनाला मोठा आनन्द होतो, व आपल्या ज्ञानांत विशेष भर पडल्यासारखेंच वाटतें. इतकेंच नव्हे तर, आमच्या आर्यपूर्वजांचें बुध्दिवैभव किती विलक्षण होतें, त्यांची विचारसरणी किती गंभीर असे, आणि त्यांचे सिध्दांत किती अचुक आहेत, हें लक्षांत येऊन, त्याबद्दल कौतुक व आश्चर्य वाटल्यावाचून कोणालाही राहवत नाहीं. आणि म्हणूनच मॉक्समुलरनें[१] त्यांचें

---

१ मीमांसेसंबंधीं हा एके ठिकाणीं असें लिहितो कीं,

" To me, these Mimansaka discussions are extremely attractive, and for accuracy of reasoning they have no equal any where. "

मोठें गौरव केलें, व रा० रा० महादेव[1] मोरेश्वर कुंटे, यानीं त्याबद्दलचा विशेष जोराचा अभिप्राय दिला. अर्थात्, षड्दर्शनांतील अपूर्व ज्ञानभांडार, त्यांतील विलक्षण कोटिक्रम, त्यांतील विषयपारंगता, आणि त्यांतील सतेजता, इत्यादि योगानें अर्वाचीन पाश्चात्य लोकांच्या तत्वविचाराला व शास्त्रीय प्रतिपादनाला जो आविर्भाव आणि तजेला आला आहे, तितकाच तजेला षड्दर्शनांतही केवळ मूर्तिमंतच भासमान होतो, असें लिहिण्यास आम्हांला बिलकुल हरकत वाटत नाहीं. फार तर काय सांगावें पण, ह्या षड्दर्शनांच्या अवलोकनानें जगांतील कोणत्याही लोकांस कमीपणा न येतां, उलट त्यांची उन्नतीच होईल, असेंही म्हटल्यास खचितच बाध नाहीं.

## नास्तिक दर्शनें.

नास्तिक दर्शनें.

हीं दर्शनें मुख्यत्वेंकरून सात आहेत. १ चार्वाकदर्शन. २ बौद्धदर्शन. ३ योगाचारदर्शन. ४ माध्यमिकदर्शन. ५ सौत्रांतिक-

---

१ हे असें म्हणतात कीं,

" Yet, the six schools of philosophy are decidedly in advance of him ( the Hindu of modern times ), and inculcate *principles which have all the freshness of modern European thought, and possess truths, of which no nation ought* to be ashamed. "

( कुंटेकृत षड्दर्शन चिंतनिका. प्रस्तावना. पा. २. )

सदरहू अवतरणांतील इतालिक वर्ण आमचे आहेत. (ग्रंथकर्ता.)

दर्शन. ६ वैभाषिकदर्शन. आणि ७ दिगंबर किंवा जैन-दर्शन. ह्या सर्वांचें मूळबीज कपिलमुनीच्या सांख्य-दर्शनांतच दृग्गोचर होतें. तथापि, कालान्तरानें त्याचाच वृक्ष बनून, तो बुद्धाच्या वेळीं अति विस्तृत झाला होता.

चार्वाकदर्शन.

१ आतां, चार्वाक व बौद्धादि निरीश्वर मतांत, १ चार्वाकदर्शन तर केवळ नीतिभ्रष्टच असल्यामुळें, ते निःसंशय अति दोषार्ह आहे. आणि म्हणूनच लोकसमाजावर त्याचा परिणाम केव्हांही चांगला होण्याचा बिलकुल संभवच नाहीं. कारण, या मतांत, पुण्य, पाप, स्वर्ग, नरक, आत्मा, परमेश्वर, इत्यादि कांहींच मानलेलें नाहीं. शिवाय, ह्या मतांत प्रत्यक्ष प्रमाण असें एकच मानिलें असून, त्याचे विषय म्हटले म्हणजे १ पृथिवी, २ आप, ३ तेज, व ४ वायु, असे चारच भासमान होणारे पदार्थ होत. अर्थात्, आनुमानिक आणि शाक्तिक पदार्थ, म्हणजे आकाश, काल, दिक्, मन, वगैरे त्यांनीं त्याज्य केल्याचें दिसतें. त्या कारणानें, दुराचरण, परपीडा, व पापकर्म, इत्यादिकांस दंडाची भीति; अथवा, सदाचरण, परोपकार, आणि पुण्य-कर्म, ह्यांस उत्तम फलप्राप्ति; वगैरे कांहींच सांगितलेलें नाहीं. त्यायोगानें, सामाजिक नीतीवर, किंवा लोकांच्या आचरणावर, हितकारक दाब राहण्यास यत्किंचित् देखील साधन मिळत नाहीं, असें ह्मणणें प्राप्त येतें.

२ बौद्धदर्शनाचे मुख्यत्वेंकरून चारच सिद्धान्त आहेत.

बौद्धदर्शन.

१ **सर्वं क्षणिकं क्षणिकम्. २ सर्वं** दुःखं दुःखम्. ३ सर्वस्वलक्षणं स्वलक्षणम्. व ४ **सर्वं शून्यं शून्यम्.** ह्या चाऱ्ही सिद्धान्तांस **भा**वना अशी संज्ञा आहे. अर्थात्, हें जगत क्षणिक, दुःखरूप, स्वलक्षण, आणि शून्यवत् मानावें, म्हणजे, सर्व संकल्पाचा क्षय होऊन, काम, क्रोध, लोभ, मोह, मद, व मत्सर, यांचा सुद्धां नाश होतो. आणि अशा प्रकारें वासनादिकांचा लय झाला, म्हणजेच शून्य स्वरूपी उत्तम निर्वाण किंवा मोक्षाचा ठेवा सांपडला, असा या मताचा मोठा कटाक्ष आहे.

योगाचार, माध्यमिक, सौत्रान्तिक, आणि वैभाषिक दर्शनें.

ह्या मतांतच ३ **योगाचार**, ४ **माध्यमिक**, ५ **सौत्रान्तिक**, व ६ **वैभाषिक**, या चार दर्शनांचा समावेश होतो. कारण, हे बुद्धाचे चार शिष्ये असून, त्या वृद्ध गुरूच्या उपदेशावरूनच त्यांस विद्या प्राप्त झाली होती. मात्र, प्रत्येकाच्या बुद्धिमत्तेप्रमाणें, त्यांच्यांत मतवैचित्र्य होऊन, त्याचीं भिन्न भिन्न दर्शनें झालीं, हें उघड आहे.

दिगंबर दर्शन.

७ **दिगंबर** किंवा **जैनदर्शनांत**, आत्मा हाच जगाचा कर्ता, नित्य, आणि सर्वव्यापी आहे, असें मानतात; व सम्यग्दर्शन, सम्यग्ज्ञान, आणि सम्यक्चरित्र, हींच समुदायरूपानें मोक्षाचीं साधनें होत, असें हे मतवादी समजतात.

ह्या नास्तिकदर्शनांत, बौध्ददर्शन विशेष महत्वाचें असून, त्याचे मुख्यत्वेंकरून खालीं लिहिलेले ग्रंथ फार प्रसिध्द आहेत.

बौद्धदर्शनांतील ग्रंथ.

सूत्रें. महावैपुल्य अथवा महायानसूत्रें. ललितविस्तार; ह्याचे सत्तावीस अध्याय आहेत. सध्दर्म पुंडरीक. प्रतिहार्य (अवदान). करंडव्यूह. ब्रह्मजालसूत्र; इ. स. ४२०. सामजातक; ह्याचीं भाषान्तरें संस्कृतांतून किंवा पालींतून, इ. स. ७० पासून तों ६०० पर्यंतच्या कालांत, निरनिराळ्या विद्वानांनीं केलीं आहेत. अभिनिष्क्रमणसूत्र; याचें समग्र भाषान्तर बीलनें इ. स. १८७५ सालीं केलें असून, त्याला त्यानें "साक्यबुध्दाचें अद्भुत चरित्र" असें नामधेय दिलें आहे. अवदान; अथवा पौराणिक कथा. अद्भुतधर्म. गेय. गाथा. उपदेश. निदान. जातकें. सूत्रपितक. विनयपितक. अभिधानपितक. इत्यादि.

ह्या खेरीज, इ. स. १८३३ पासून १८४३ पर्यंत, हॉड्सन् हा नेपाळांत असतांना, त्यानें सुमारें ३८१ रुमाल, ह्मणजे अनेक कागदांचीं पुडकीं, बंगाल फ्रान्स, व इंग्लंड देशांस, बौद्धधर्मग्रंथविषयक सविस्तर हकीकत उपलब्ध व्हावी याहेतूनें, पाठविलीं; आणि चीन व जपान देशांतून देखील असंख्य बौद्धधर्मग्रंथ इंग्लंडास रवाना केले.

नेपाळ, चीन, व जपान, येथून रवाना झालेले ग्रंथ.

ह्या निरीश्वर मताची तपशिलवार व साद्यन्त हकी-कत आम्ही भारतीय साम्राज्याच्या पूर्वार्धांतील चवथ्या पुस्तकांत[1] दिली असून, बौद्धधर्माचें इत्थंभूत विवेचन आम्ही भारतीय साम्राज्याच्या उत्तरार्धांतील सातव्या पुस्तकांत[2] केलें आहे. सबब, तत्संबंधीं आतां जास्त ऊहापोह करण्याचें येथें प्रयोजन नाहीं.

---

१ पान ५७ ते ६४ पहा.　२ भाग ४१ वा पहा.

# भाग ६९ वा.

## शास्त्रविषयक–ग्रंथभांडार.

## इतर शास्त्रें व नानाविधकला.

इतर शास्त्रें व कला आणि यां चें पूर्वी झालेलें वर्णन.

आतां, संस्कृत भाषेच्या इतिहासांत, म्हणजे प्रस्तुत पुस्तकांत, इतिहास[1] व भूगोलशास्त्र, ज्योतिःशास्त्र[2], भूमितिशास्त्र[3], अंकशास्त्र, बीजशास्त्र, वैद्यशास्त्र,

---

१ ह्या बद्दलचें सायन्त विवेचन भारतीय साम्राज्याच्या तिसऱ्या पुस्तकांत केलें आहे.

२ ह्या संबधाची माहिती भारतीय साम्राज्याच्या "आर्यशास्त्र व कला" नामक चवथ्या पुस्तकांत दिली आहे. ( भाग २२. पान ६५ ते ९६ पहा ).

यूरोपांत भिन्न भिन्न स्थलीं असलेल्या संस्कृत पुस्तकांच्या सुमारें एकोणीस १९ याद्या, आणि भरतखंडांतील पुस्तकांच्या सदतीस ३७ याद्या, मिळून छपन्न ५६ याद्यांवरून, थिओडर आफ्रेच नामक जर्मन विद्वानानें तयार केलेली एक मोठी जंत्री किंवा पुस्तकावली, जर्मन ओरिएण्टल सोसायटीनें इ. स. १८९१ सालीं लैप्झिक येथें छापविली. त्यावरून, संस्कृतांत दोन हजार तर फक्त ज्योतिषग्रंथच असल्याचें कळून येतें. मग, ह्याखेरीज ज्ञानाच्या इतर शास्त्रांतील ग्रंथ किती असतील, याची कल्पना वाचकांनींच करावी.

३ भूमितिशास्त्राची उत्पत्ति आमच्या यज्ञांतील वेदींवरून झाल्याचें दिसतें. कारण, यज्ञांत वेदींची मोठी आवश्यकता असून,

( पुढें चालू )

नीतिशास्त्र, संगीतशास्त्र, तालशास्त्र, पाकशास्त्र, वगैरे शास्त्रीय विषय, आणि आर्यकलासमूहांत[१] युद्धकला, गायनकला, वाद्यकला, नाट्यकला, चित्रकला, शिल्पकला,

---

( मागील पृष्टावरून पुढें चालू. )

त्या केवळ रेखलेल्या, भिन्न भिन्न आकृतींच्या, आणि अगदीं प्रमाणसिद्धंच असल्या पाहिजेत, अशी आमच्या आर्यपूर्वजांची समजूत असे. सबब, ते नेहमीं काळजीपूर्वकच यज्ञमृत्तिका लावीत, व फारच टापटिपीनें स्थंडिलें तयार करीत. त्यामुळें, नियमित प्रमाणाची जरूर पडून, सूक्ष्ममापन देखील त्याचवेळीं पहावें लागे. अशा स्थितींत, भूमिमापनाचा बीजांकुर सहजीं रोवला गेला, आणि त्याचाच पुढें वृक्ष बनून, हें भूमितिशास्त्र भरतखंडांतच प्रथमतः उद्यास आलें.

( भा. सा. पु. ४थें. पा. ९६ ते १०२; व एलफिन्स्टनकृत इतिहास पहा. )

ह्या वेदींच्या आकृतीचा एक नमुना, मासल्याकरितां खालीं दाखवितों.




यावरून, स्थंडिलाकृति कशी पाहिजे, व त्याच्यांतील भिन्न भिन्न विभाग कशाप्रमाणाचे असणें आवश्यक आहे, हें स्थूलमानानें वाचकाच्या लक्षांत सहजीं येईल. ह्या स्थंडिलावर जे हविर्भाग आहूतदेवतांस द्यावयाचे, ते सदरीं निर्दिष्ट वर्तुळांत नमूद केलेल्या आंकड्यांच्या अनुक्रमानें देण्याचे आहेत, हे वाचकांनीं लक्षांत ठेवावें.

१ एकंदर चौसष्टकलांचें विवेचन भा. सा. पु. ४ थें पा. २ वर केलें आहे.

निर्माणकला, वास्तुकला, तंतुकला, तंत्रकला, लेखनकला, द्यूतकला, व गंधद्रव्यकला, इत्यादींचें विवेचन, करणें राहिलें आहे. परंतु, तद्विषयक ऊहापोह आणि ग्रंथविवेचन "आर्यशास्त्र व कला" नामक भारतीय साम्राज्याच्या चवथ्या पुस्तकांत (पान ६९ ते २४४ वर) केलें आहे. सबब, ह्या विषयांची पुनरुक्ति करण्याचें विशेष प्रयोजन दिसत नाहीं.

मात्र, शुक्रनीतींतील कित्येक विषय फारच महत्वाचे असून उपयुक्त आहेत. यासाठीं, तत्संबंधाचा अवश्य तो उल्लेख येथें करणें अगदीं अगत्याचें आहे. कारण. त्यावरून आमच्या आर्यपूर्वजांनीं कोणकोणत्या दिशेनें, कशा प्रकारचे, आणि किती दीर्घ परिश्रम केले होते, हें वाचकाच्या लक्षांत सहजीं येईल.

शुक्रनीतींतील विषय, व त्यावरून आमच्या आर्यपूर्वजांच्या बुद्धिमत्तेचें होणारें दिग्दर्शन.

ह्यांतील मुख्य विषय म्हटले म्हणजे खालीं लिहिल्याप्रमाणें होत.

१ राजांची इतिकर्तव्यता. २ भूमिमापन. ३ नगर्यादिप्रतिष्ठान, म्हणजे नगरें वसविणें. ४ गृहादि कृतिकल्पन,

१ यांत सामंत, मांडलिक, स्वराट्, सम्राट्, सार्वभौम, इत्यादि राजांचेंही वर्णन आहे.

२ यांत गांवशीव कशी असावी हें सांगितलें आहे.

३ ह्यांतच रस्ते कसे असावे, व पाणी तुंबू नये म्हणून गटारें कशीं काढावीं, इत्यादींचें फारच मार्मिक विवेचन आहे.

**कूर्मपृष्ठामार्गभूमिः कार्यग्राम्यैः सुसेतुका ।**
**कुर्यान्मार्गान्पार्श्वखातान्निर्गमार्थं जलस्य च ॥६९॥**

(शुक्रनीति. अध्याय १ ला.)

म्हणजे घरें बांधणें. ५ युवराज व प्रधानादिकांचीं कामें व त्यांचीं लक्षणें. ६ सेवक जनाचें वेतन. ७ जमाखर्च ठेवणें. ८ न्यायपरिवर्तन, म्हणजे सर्व लोकांनीं न्यायानें वागणें. ९ सुहृदाचें लक्षण. १० गजाश्वादि परीक्षण. ११ रत्नधातुपरीक्षा. १२ प्रजाभागहरण. १३ कला-विद्याप्रभेदन. १४ श्रमविभागवर्णन. १५ धर्मपरिकल्पन. १६ ग्रामरक्षानिवेदन. १७ प्रासादादि प्रकल्पन, म्हणजे महाल वगैरे बांधणें. १८ मूर्ति घडविणें. १९ व्यवहार-चातुर्य. २० किल्ले बांधणें. २१ सैन्य ठेवणें. २२ रथ तयार करणें. २३ मनुष्याच्या आयुष्याचें मान. २४ यात्रा प्रकल्पन. २५ यंत्र लक्षण. २६ अग्निचूर्णक्रिया म्हणजे दारूगोळा तयार करणें. २७ यंत्रप्रपात, म्हणजे निशाण लावणें. २८ शस्त्रास्त्रक्रिया. २९ षड्गुणलक्षण. ३० व्यूहप्रकल्पन, म्हणजे सैन्यरचना आणि कवाइत-चातुर्य. ३१ कापट्यकरण. इत्यादि.

वैद्यकांतील नवीन शोध, व त्याची आमच्या वेदकालीन ऋषींस माहिती.

त्याचप्रमाणें, वैद्यकाच्या संबंधानें देखील, आम्हीं "**आ**र्यशास्त्र व **कला**" नामक **भार**तीय **साम्रा**ज्याच्या चवथ्या पुस्तकांतील २३ व्या भागांत साद्यन्त विवेचन केलें आहे. परंतु, **जर्म**नींतील डाक्तर **कुन्हे** नांवाच्या शोधकानें **जलसंजीवनीं**, **जलसेचन**, इत्यादि क्रियांनीं, गेल्या एकोणीसाव्या शतकांत, The new Science of Healing म्हणून जी चिकित्साशास्त्राची नवीन माहिती जगापुढें ठेविली, तीच आज दहा पंधरा

हजार वर्षांच्या पलीकडील कालांत, आमच्या ऋक्कालीन पूर्वजांस किती अंशानें माहीत होती, हें वाचकांस अवश्य समजलें पाहिजे. सबब, ती येथें थोडक्यांत देतों:—

बाष्पस्नान, स्नेहविधि, अवगाहन किंवा बस्तिस्नान, मार्जनविधि अथवा आप्लनस्नान, इत्यादि वाग्भटाला ( म्हणजे सुमारें १५०० वर्षांपलीकडील कालांतील भारतीयांस ) चांगलें माहीत होतें.

> स्नेहक्लिन्नाः कोष्टगा धातुगा वा ।
> स्रोतोलीना येच शाखास्थि संस्थाः ॥
> दोषाः स्वेदैस्ते द्रवी कृत्य कोष्ठं ।
> नीताः सम्यक् शुद्धिभिर्निर्ह्रियन्ते ॥ २९ ॥
>
> ( वाग्भट. सूत्रस्थान. अ. १७. )

आतां, वाग्भटानें आपलें वैद्यक, चरक व सुश्रुत यांनीं केलेल्या ग्रंथांच्या आधारेंच रचलेलें असल्यामुळें, त्यांजला सुद्धां ही क्रिया माहीत होती. अर्थात्, चरकाचा काल पाणिनीच्या पूर्वींचा होय, ( ग्रंथकर्त्याचें भाषाशास्त्र पान २३३ पहा ); आणि त्यावरून त्याला होऊन गेल्याला आज तीन चार हजारांवर वर्षे झाल्याचें दिसतें.

परंतु, जे शोध, आणि जें चिकित्साशास्त्र, इ. स. च्या एकोणीसाव्या शतकांत प्रसिद्धीस आलें, तेंच आमच्या आर्यपूर्वजांस याच्याही अगोदर, म्हणजे सुमारें पंधरा हजार वर्षांपलीकडील कालांत, चांगलें माहीत असल्याचें उघड होतें. कारण, त्याबद्दलचें प्रत्यक्ष प्रमाणच आपणांस मिळतें.

ह्या पृथिवीवरील यच्चावत् औषधींत, जल हें निव्वळ अमृत व महौषधीच आहे, असें आमचे ऋक्कालीन पूर्वज पूर्णपणें जाणून होते. इतकेंच नव्हें तर, पाण्यापासून अखिल जगाला, किंबहुना सर्व विश्वालाच सुख मिळून, शरीराचें संरक्षण आणि रोगाचें निवारण होतें, असा त्यांचा स्वतःचा अनुभव असल्याकारणानें, त्यांनीं ती गोष्ट ऋग्वेदासारख्या पुराणतम इतिहासांत फारच मोठ्या अक्षरांनीं, व अत्युज्ज्वल मुद्रांकानीं लिहून ठेविली आहे.

त्याचा ऋग्वेदांत उल्लेख.

प्रथमतः आपो देवीची प्रार्थना करून, आमचे पुराणपूर्वज असें म्हणतात कीं, उदकांत अमृत[1] आहे, आणि महौषधी देखील आहेत. तसेंच, त्यांत सकल कल्याणकारक अग्नि व सर्व औषधांचे गुण असून, तें सुखाचें ही मूळ आहे.

अप्स्व१न्तरमृतमप्सु भेषजमपामुत प्रशस्तये[2] ।
देवा भवत वाजिनः ॥ १९ ॥
अप्सु मे सोमो अब्रवीदन्तर्विश्वानि भेषजा[3]
अग्निंच विश्वशंभुवमापश्च विश्वभेषजीः ॥२०॥१॥

१ कारण, उदधिमंथनाच्या वेळीं, समुद्रांतूनच अमृत व दुसरीं तेरा रत्नें निघालीं होतीं.

२ पाण्यांत अमृत असून, औषधी देखील आहे. सबब, अहो देवांनो, त्या आपोदेवीची स्तुति करण्यासाठीं उत्साह धरा.

३ उदकांत सर्व औषधी असतात; आणि सर्वांचें कल्याण करणारा जो अग्नि, तो सुद्धां त्यांतच असतो; असें सोमानें मला सांगितलें आहे.

आपः पृणीत भेषजं वरूथं तन्वे २ मम ।
ज्योक्च सूर्यं दृशे ॥ २१ ॥
( अ १. अ २. व १२. मं. १. अ. ५ सू. २३. )
आपो हि ष्ठा मयोभुवस्ता न ऊर्जे दधातन ।
महे रणाय चक्षसे ॥ १ ॥
यो वः शिवतमो रसस्तस्य भाजयतेहनः ।
उशती रिव मातरः ॥ २ ॥
तस्मा अरं गमाम वो यस्य क्षयाय जिन्वथ ।
आपोजनयथाचनः ॥ ३ ॥
शंनोदेवीरभिष्टय आपोभवंतु पीतये ।
शंयोरभि स्रवंतु नः ॥ ४ ॥
( ऋ. मं. १०. सू. ९. )

---

१ अहो उदकानो, मच्छरीर संरक्षणार्थ रुक्‌शांतीचें औषध मला द्या; व सूर्य बहुत दिवस माझ्या दृष्टीस पडेल, असें करा.

२ अहो उदकानो, तुम्ही सुखाचें निवासस्थान आहांत. सबब, आम्हांला अन्न मिळविण्याची शक्ति देऊन, ज्ञानप्राप्त्यर्थ योग्य करा. कारण, मातेच्या स्तनपानानें ज्याप्रमाणें बालकास पुष्टी येऊन सुख होतें, त्याचप्रमाणें उदकानें मनुष्याला पुष्टि येते.

३ अहो उदकानो, तुमचा कल्याणकारक व सुखदायक रस मातेप्रमाणें आम्हांला प्यावयास द्या.

४ अहो उदकानो, रोग शमनानें तुम्हांस आनन्द होतो. यासाठीं, आम्ही तुमचा स्वीकार करून, मस्तकावर घेतों. सबब, आम्हांवर पुत्रपौत्रादि प्रसादाची कृपा करा.

५ हीं उदकें आम्हाला सुख देणारीं आणि आमचे रोग दूर करणारीं आहेत.

याप्रमाणें, पाण्याचे खरे गुणधर्म आमच्या आर्यपूर्वजांस, आज सुमारें पंधरा हजार वर्षांपलीकडील काळांतसुद्धां चांगले माहित असून, त्यांचा त्यांनीं सुविनियोग केला; आणि डा० कुन्हेनें त्याचाच योग्य अनुभव घेऊन त्याला शास्त्रीय स्वरूप आणिलें, यांत तिळमात्र देखील शंका नाहीं. सबब, आम्ही त्याचे फार आभारी आहों.

पाश्चात्यांनीं आर्यांचें घेतलेलें ऋण, व त्याचा सदुपयोग.

ह्यावरून, आमच्या आर्यपूर्वजांनीं, तितक्या प्राचीन काळीं देखील, प्रत्येक शास्त्र आणि कला, यांत किती महत्वाचे शोध

सिंहावलोकन.

---

१ ही गोष्ट कबूल करून मॉक्डोनल्ड म्हणतो, " In various branches of scientific literature, in phonetics, grammar, mathematics, astronomy, medicine, and law, the Indians also achieved notable results. In some of these subjects their attainments are, indeed, far in advance of what was accomplished by the Greeks. " ( P. 10 ).

" The Vedic age * * * reached a high standard of merit in Lyric poetry, and later made some advance towards the formation of a prose style. "

" The Sanskrit period * achieved distinction in many branches of literature, in national as well as court Epic, in lyric and specially didactic poetry, in the drama, in fairy tales, fables, and romances.
( P. 9. Sanskrit Literature ).

" Though it has touched excellence in most of its branches, Sanskrit Literature has mainly achieved greatness in religion, and philosophy. " ( P. 7. )

केले होते, हें वाचकाच्या लक्षांत पूर्णपणें आल्यावांचू- खचितच राहणार नाहीं. ह्या सर्व शास्त्रांचें द्वार व कलांचें भाजन म्हटलें ह्मणजे संस्कृतच असे. आणि ह्मणूनच ह्या अपूर्व भाषेचें योग्य लालनपालन होऊन, हिनें पृथ्वीवरील सर्व भाषावर, व मी मी ह्मणविणाऱ्या आणि विशेष नांवाजलेल्या ग्रीक भाषेवर देखील आपला पगडा[1] बसविला इतकेंच नव्हें तर, हें दिव्य, सुमनोहर, अतुल, व आश्चर्य कारक संस्कृत वाङ्मय, आमच्या आर्यपूर्वजांनीं केवळ स्वपराक्रमानें, आपल्या स्वतःच्या हिमतीवर, आणि कोणाचें लेशमात्रही ऋण किंवा सहाय्य न घेतां उदयास आणिलें ही गोष्ट विशेष रीतीनें ध्यानांत ठेवण्यासारखी आहे

आमच्या संस्कृत वाङ्मयांत, इतर भाषांतील किंवा राष्ट्रांतील इतिहासाप्रमाणें, लांबलचक नृपावळी, त्यांच्या पोषाकांचा थाट, त्यांचा क्षणभंगुर चकचकाट, त्यांचें एक- मेकांत भांडण, त्यांच्या असंख्य लढाया, इत्यादींची हकी- कत जरी नाहीं, तरी त्यांत भारतीय आर्य राष्ट्राच्या, म्हणजे अखिल हिंदू महाराष्ट्राच्या मानसिक उन्नतीचा खरा व साद्यन्त इतिहास दृग्गोचर होतो, यांत संशय नाहीं. कारण,

---

१ ह्यासंबंधानें मॉक्‌डोनल्ड असें लिहितो कीं, " To the latter ( Greece ), it ( India ) is, as a source for the study of human evolution, even superior. " ( P. 6. The importance of ancient Indian literature as a whole, largely consists in its ... * and " a national culture of th आणि आमचे ...cted by foreign influences. "

( Sanskrit Literature. P. 7. )

त्यांचें मूलनिवासस्थान[1] कोठें होतें; ते तेथून कोणत्या दिशांनीं कोठें पसरले; त्यांची वृद्धी कशी झाली; त्यांची उन्नति कोणत्या प्रकारें होत गेली; त्यांनीं आपल्या संस्कृत भाषेला किती परिपक्वदशेप्रत पोहोंचविलें; अनेक शास्त्रें कशीं उदयास आणिलीं; नानाविध ललितकलांत अभिनिवेश करून, त्यांस त्यांनीं कसें उत्तेजन दिलें; अध्यात्म विद्येंत किती अश्रान्त परिश्रम चालविले; धर्माची परंपरा कशी एकसारखी राखली; त्यामुळें, त्यांनीं आपलें राष्ट्रत्व असंख्य राजक्रांतींत, अपरिमित परिवर्तनांत,

---

१ आमचें जन्मस्थान आर्यावर्त्तच असल्याविषयीं, आम्हीं मागें (पृष्ट ६१-६२ वर) सांगितलें आहे. मनुस्मृतींत देखील त्यांचें वर्णन आहे.

सरस्वती दृषद्वत्योर्देवनद्योर्यदन्तरम् ।
तं देवनिर्मितं देश ब्रह्मावर्त प्रचक्षते ॥ १७ ॥
आसमुद्रात्तुवै पूर्वा दासमुद्रात्तु पश्चिमात् ।
तयोरे वान्तरं गिर्योरार्यावर्तं विदुर्बुधाः ॥ २२ ॥
(मनुस्मृति. अ० २).

त्याचप्रमाणें, आम्ही आर्यावर्तातूनच बाहेर पडून पूर्व, पश्चिम, व उत्तर दिशेकडील प्रदेशांत संचार केला असल्याचें, ऋग्वेदऋचेवरूनही व्यक्त होतें.

उप प्रेत कुशिकाश्चेतयध्वमश्वंराये प्रमुंचता सुदासः ।
राजा वृत्रंजंघनत् प्रागपागुदगथा यजाते वर आपृथिव्याः ११
(ऋ. वे. अ. ३. अ. ३. व २१. मं. ३. अ. ४. सू. ५३-२८७).

अर्थात्, पूर्व, पश्चिम, आणि उत्तर, या तीन दिशा सूचित झाल्याकारणानें, आम्ही te राहिलेल्या दक्षिणप्रदेशांत, म्हणजे हिमालयाच्या दक्षिणेकडील ar आर्यावर्त्त देशांत जन्मलों असल्याचें

उघड दिसतें

अमर्याद उलथापालथींत, आणि आज सुमारें दहा पंधरा हजार वर्षांच्या घडामोडींत, कसें कायम राखलें; इत्यादींच्या साग्र इतिहासाचें अपूर्व आणि हुबेहुब चित्रच आमचें संस्कृत वाङ्मय प्रत्यक्ष दाखवितें. अर्थात्, त्या योगानें अन्य राष्ट्रांच्या इतिहासांत बिलकुल उपलब्ध न होणारें असें साद्यन्त इतिवृत्त व कुलपरंपरा, भाषेचें मूळ आणि शास्त्राचें आदिकारण, धर्माचें अधिष्ठान व अध्यात्म-विद्येचें तत्व, इत्यादि सर्व केवळ आमच्या संस्कृत महोदधींतच प्राप्त होतें, हें निर्विवाद होय.

आतां, कदाचित्, ह्या लेखामुळें, आपल्याच भाषेचें मिथ्या गौरव केल्याविषयीं, मजवर निष्कारण दोषारोपण होण्याचा संभव आहे. तथापि, तत्प्रतिकारार्थ, नांवाजलेल्या पौरस्त्य

---

१ ह्या संबंधानें सुप्रसिद्ध रोमेशचन्द्रदत्त म्हणतात;

"On the other hand, they ( ancient Hindu Works) give us a full, connected and clear account of the advancement of civilization, of the progress of the human mind, such as we shall seek for invain, among the records of any other equally ancient nation. The literature of each period is a perfect picture—a photograph, if we may so call it—of the Hindu civilization of that period, ** and the great heights to which the genius of Brahmans and Kshatriyas soared in the infancy of the world's intellectual life."

(History of civilization in Ancient India P. 1-2-3)

पंडितांचे व पाश्चात्य[1] विद्वानांचे अभिप्राय आम्ही वेळोवेळीं, आणि योग्य त्या स्थळीं, नमुद केले आहेत. त्यावरून, खरी वस्तुस्थिति कशी आहे, हें वाचकाच्या ध्यानांत पूर्णपणें आल्यावांचून खचितच राहणार नाहीं.

---

१ मॉक्समुलर ह्मणतो,

" Sanskrit Literature, if studied only in the right spirit, is full of human interests, full of lessons which even Greek could never teach us."

( What can India teach us ? )

मॉक्डोनल्डचा सुद्धां असाच अभिप्राय आहे. ( मागे पान ३९५-९६ पहा ).

# शुद्धिपत्रक.

—*:o:*—

| पृष्ट. | पंक्ति. | अशुद्ध. | शुद्ध. |
|---|---|---|---|
| १२ | १६ | differenco | difference |
| ३१ | २७ | cvery | a very |
| १२८ | १२ | Cretylus | Cratylus |
| १३९ | ४ | केलीं | केलें |
| १४८ | ९ | स्वशास्त्राविषयीं | स्वरशास्त्राविषयीं |
| १५२ | ४।५ | आहे आहे | आहे. |
| २०० | १४ | उपग्रंथस्थ | उपग्रंथस्य |
| २२५ | ४ | वेदृज्ञा | वेदाज्ञा |
| २४० | २५ | it | its |
| २४१ | १८ | rssearch | research |
| २५० | ६ | निरयन | निखन |
| २५७ | ४ | प्रत्येक | कित्येक |
| २८९ | २४ | जर | सर |
| ३०९ | ११।१८ | इ. स. | हि. स. |
| ३३६ | ९ | माधवीब | माधवीय |
| ३३८ | ९ | preceision | precision |
| ,, | २७ | लिहितांता | लिहितांना |
| ३५७ | १५ | dely | defy |
| ३६८ | १४ | क्रमशः | क्रमशः |
| ३७७ | १४ | सवर्माविशेषात् | सर्वमविशेषात् |
| ,, | १६ | प्रत्याविशिष्टवात् | प्रत्याविशिष्टत्वात् |

